[ भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला पुस्तक १८ वें ]

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ

# चतुर्थ-संमेलन-वृत्त

शके १८३८


संपादक व प्रकाशक

खंडेराव चिंतामण मेहेंदळे, बी. ए.

दत्तो वामन पोतदार, बी. ए.

चिटणीस





भाद्रपद शु० १।१८३९

किंमत ४ रुपये

# लक्ष्य द्या !

भारत इ. सं. मंडळाच्या पाक्षिक सभांतून नानाविध विषयांवर नवीन माहितीनें भरलेलीं जीं टांचणें किंवा जे निबंध वाचून चर्चा होऊन पसंत ठरतात त्यांचा समावेश **अहवाल किंवा इतिवृत्त** या पुस्तकांत केला जातो. या अहवालांतून प्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. वि. का. राजवाडे, रा. शंकरराव देव, रा. गो. का. चांदोरकर, श्री. मुजुमदार, रा. वि. ल. भावे, रा. पां. न. पटवर्धन, रा. मुंडले, रा. पोतदार, श्री. मेहेंदळे, रा. आचार्य, रा. ब. साने, रा. पां. मा. चांदोरकर, मिया शिकंदर लाल आतार, रा. वा. वि. जोशी वगैरे अनेक संशोधकांचीं टांचणें प्रसिद्ध झालीं असून पुष्कळ **महत्त्वाची माहिती** नवीन च प्रसिद्ध करण्यांत आली आहे. महाराष्ट्रीय सारस्वत व इतिहास यांचा अभ्यास करूं इच्छिणाऱ्या कोणा हि गृहस्थास हे ग्रंथ **बिनमोल** वाटतील यांत शंका नाहीं. सर्व पुस्तकसंग्रहालयांतून तर यांची एक एक प्रत तरी पाहिजे च पाहिजे. **सरकाराकडून** हीं पुस्तकें विकत घेण्यांत आलीं आहेत.

# कविकाव्यसूची

धुळ्याचे प्रसिद्ध संशोधक रा. गो. का. चांदोरकर बी. ए. एल. एल. बी यांनीं प्रसिद्ध केलेली व महाराष्ट्रसारस्वतभक्तांस अत्युपयुक्त अशी ही महाराष्ट्र कवींची व त्यांच्या कृतींची सूचि मंडळाचे कचेरींत विकत मिळेल. या पुस्तकाची पृष्ठसंख्या सुमारें २०० असून यांत गेल्या सहाशें वर्षांतलि हजारों संतकवि व त्यांचे ग्रंथांची माहिती फार परिश्रमपूर्वक जुळवून दिली आहे. किं. रु. २

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें
## चतुर्थ-सम्मेलन-वृत्त
## (शके १८३८)

भा इ. सं. मं. चें चतुर्थ-संमेलन शके १८३८ वैशाख वा। ११।१२।१३ मे ना २७।२८।२९या तीन दिवशी रोज सकाळ दुपार बैठकी होऊन मोठ्या यशस्वितेनें ार पडलें. सदर संमेलनप्रसंगी १ रा. वि. का. राजवाडे, २ रा. वासुदेवशास्त्री खरे, ३ रा. पां. न. पटवर्धन, ४ श्री. आबासाहेब मुजुमदार, ५ श्री. तात्यासाहेब मेहें-दळे, ६ रा. द. वा. पोतदार, ७ रा. अनंतराव फडणीस, ८ रा. स. मा. दिवेकर, ९ रा. वि. ल. भावे, १० रा. केशव आप्पा पाध्ये, ११ रा. द. वि. आपटे, १२ प्रो. भानु, १३ रा. अ. वि. पटवर्धन, १४ प्रो. लिमये, १५ प्रो. काळे, १६ रा. ह र. भागवत, १७ रा. गो का. चांदोरकर, १८ रा. भा. वा. भट, १९ रा. रु. वि. आचार्य, २० रा. सोमण, २१ रा. भुसकुटे, २२ रा. वा. प. मेहेंदळे, २३ रा. आबा चांदोरकर, २४ प्रो. शि. म. परांजपे, २५ श्री. आप्पा-साहेब फडणीस, २६ रा भा. रा भालेराव, २७ रा. किरपेकर, २८ रा. रा. दा. देसाई, २९ रा. अ ह. गद्रे, ३० डॉ. पळमुले, ३१ वै. कृष्णशास्त्री कवडे, ३२ वै. पुणतांबेकर, ३३ रा. गो. वि. आपटे, ३४ रा. कृ. प्र. खाडिलकर, ३५ रा. रा. द पराडकर, ३६ रा. ग श्री. साठे, ३७ रा. दा. वि. गोखले, ३८ रा. वे. बा. अक्कलकोटकर, ३९ रा. ज. वि. ओक, ४० डॉ. ह. श्री. देव, ४१ रा. ग. स. खरे, ४२ रा. का कृ. लेले, ४३ शेट दामोदर सावळाराम, ४४ रा. गोपाळराव गोगटे, ४५ ना. केशवराव वकील, ४६ रा. नरसोपंत केळकर, ४७ रा. ब. साने, ४८ रा. अ. ना. भागवत, ४९ रा. भवाळकर, ५० प्रो. गोखले, ५१ रा. साठे वगैरे सभासद व वॅ. कुकडे, रा. फडके वकील, प्रो. ताह्मनकर, रा. कृ. अ. एकबोटे, रा. फातरफेकर, रा. जोशी वगैरे बाहेरील मंडळी हजर होती. यातील बरी च मंडळी औंध, फोंडा--गोंवा, वांई, जळगांव, बेळगांव, कऱ्हाड, नाग-पूर, खांडवा, दक्षिण हैद्राबाद, जयपूर, ठाणें, धुळे, भुसावळ, उमराबती, मुंबई, अक्कलकोट, सातारा, धार, मिरज, कल्याण, तळेगांव वगैरे दूर दूर ठिकाणांहून मुद्दाम संमेलनाकरितां आली होती.

मंडळाचे अध्यक्ष रा. ब. साने यांचे शरीरास स्वास्थ्य नसल्यामुळें, प्रथम दिवशी मंडळाचे एक उपाध्यक्ष रा. विश्वनाथपंत राजवाडे यांनीं सभासदांचें सम-

योचित स्वागत केलें. नंतर रा. दत्तो वामन पोतदार, चिटणीस यानी १८३७ सालचा अहवाल वाचला, तो मंजूर झाला. तो शके १८३७ चे इतिवृत्तास जोडला आहे. संमेलनाचे तिन्ही दिवसांत मिळून नवीन सभासद २० मंडळास मिळाले. नतर निबंधवाचनास सुरवात झाली. पहिले दिवशी ८, दुसरे दिवशी १२, व तिसरे दिवशी ७ व संशोधनवृत्त ४ मिळून **एकतीस** लहान मोठे विविध माहितीनें भरलेले, व चिकित्सक पद्धतीने सजविलेले निबंध वाचण्यांत आले त्यांपैकी एकंदर वीस लहानमोठे निबध प्रस्तुत पुस्तकात छापले आहेत रा. गो का. चांदोरकर व रा. भा. वा. भट यानी प्रत्येकी वाचलेल्या दोन दोन निबंधांचा समावेश प्रस्तुत त्यांचे नांवावर छापलेल्या एक एक निबधात च त्यांनी केला आहे. म्हणजे या हिशेबाने वरील वाचलेल्या एकतिसांपैकी बाविसाची विल्हे लागली. आतां पुढील ९ निबंध राहिले. त्यातील कित्येक अपूर्ण असून दुरुस्त करावयाचे आहेत. सर्वांचा यथोचित परामर्ष यथावकाश होईल. निबध येणेप्रमाणें:—

(१) आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर—रा. वा प. मेहेंदळे, (२) मानाजी फांकडा—रा. भा. रा. भालेराव, (३) गोमांतकाच्या इतिहासाची साधने खंड२ —रा. द वि. आपटे, (४) शके १७३९ तील छत्रपतींची बारनिशी—रा. पा. न पटवर्धन, (५) खंडेराव हरींची पूर्वपीठिका—रा. भा रा भालेराव, (६) संशोधन व फारशी भाषा—रा. कृ. वि. आचार्य, (७) ग्रांट डफच्या चुकांचा हिशेब—रा. वासुदेवशास्त्री खरे, (८) नेऊरगांवचा शिलालेख—श्री ग. ना. मुजुमदार, (९) कामकोटीपीठाची हकीकत—रा. का. कृ लेले.

तिसरे दिवशी शके १८३८ सालाकरितां कारभारी मंडळाची नेमणूक कायम झाली. मंडळाचे नियम मराठींत हि छापावे, असे ठरले समेलनवृत्ता ऐवजी सर्व सभासदांस इतिवृत्त मोफत देण्याबाबतचा ठराव मंजूर झाला. मंडळाच्या कारभारी मंडळांत पांचा ऐवजी ७ सभासद नेमावेत असे हि ठरले, व त्याप्रमाणे नेमणुका करण्यांत आल्या. दोन हिशेबतपासनीस नेमण्यात आले. नंतर निरनिराळ्या कार्यांकरिता पुढील १ द्रव्योत्पादक व कार्यप्रसारक मंडळ, २ मंदिरोपमंडळ, ३ ग्रंथप्रसारकमंडळ अशी निरनिराळ्या योग्य गृहस्थांची उपमंडळे नेमण्यांत आली. द्रव्योत्पादक उपमंडळाकडे नियम ७ यातील a, f या कलमांतील कामें व अधिकार सोंपविण्यात आले. मंदिरोपमंडळाकडे ‘ सरस्वतीमंदिरा ’ करितां जागा बघणें, मिळविणे व इमारत उभारण्याची कामे बघणें वगैरे कामे दिली. ग्रंथ प्रसारक मंडळाकडे नियम ७ पोट नियम k आणि l प्रमाणें सर्व अधिकार सोंपविण्यांत येऊन, मंडळाचे इतिवृत्त मासिकरूपाने काढण्याविषयी निश्चय झाला होता. मंडळाच्या कामाकरितां एक कारकून व ग्रंथप्रसारक मंडळाकरितां एक मुद्रित-

शोधक जरूरीप्रमाणें नेमण्याविषयी परवानगी देण्यांत आली. येणें प्रमाणें मोठ्या उत्साहानें पुढील कार्यक्रमाचा पल्ला ठरविण्यांत आला. मंडळाचे अध्यक्ष रा. ब. साने हे पहिले दिवशीं दुपारीं च हजर झाले त्यांनी मंडळाचा सर्व कार्यक्रम खलास झाल्यावर पुढीलप्रमाणें समारोप केला. ते म्हणाले, "यदांचे संमेलन सर्वत्रांचे मदतीनें मोठ्या उत्साहानें पार पडले, याबद्दल मी सर्वत्रांचे अभिनंदन करितों. खरोखरी च आपणामध्ये रा. राजवाडे यांच्या सारखी माणसें अत्यंत दुर्मिळ होत. संशोधनाचे काम पुढे नेटानें चालण्याकरिता माझ्या मते 'फेलोशिप्स्' ठेवणे जरूर आहे. यासाठीं आपणांस कोणी 'प्रतापशेट' मिळणे अवश्य आहे निरनिराळ्या निबंधकारांनी जे निबंध वाचले व जी मते प्रतिपादिली ती त्यांची त्यांची वैयक्तिक मतें होत, सर्व मंडळाची नव्हत हे लक्ष्यांत ठेविले पाहिजे मंडळाच्या कामासंबंधानें सरकारची वक्रदृष्टि असण्याचे कांहीं च कारण नाहीं. सरकारी नोकर असतांना हि काव्येतिहाससंग्रह काढण्यास आम्हास सरकारांकडून परवानगी देण्यात आली होती. गुदस्ता मे. कलेक्टर साहेब यांची व माझी मुलाखत झाली, त्या वेळी मंडळाच्या हेतूं-बद्दल मी स्पष्टीकरण केले सरस्वतीमंदिराकरिता मंडळानें चालविलेली खटपट व मिळविलेली आश्वासनें ही सर्व युद्धाच्या पूर्वी च केलेल्या संकेताचे फळ आहे. सरकारास काम पसंत आहे, कारण सरकारानें आपली पुस्तकें हि घेतली आहेत. मंडळाचा उपक्रम चांगला असल्याबद्दल कलेक्टरसाहेबांनी समाधान व्यक्त केले. दर संमेलनप्रसंगीं मी एक गोष्ट सांगत आलों आहे, व ती च पुनः पुनः सांगतों की, प्रस्तुतच्या राजकारणाशी मंडळाचा कांहीं एक संबंध नाहीं. मंडळाचे काम फक्त संशोधनाचे आहे. आता गेल्या दोन दिवसांत येथे जे निबंध वाचण्यांत आले त्यासंबंधी पर्यालोचनपर दोन शब्द सांगण्याचे काम रा. राजवाडे याजवर सोपवितों." नंतर

## रा. राजवाडे

म्हणाले, "अध्यक्षाच्या आज्ञेवरून दोन शब्द सांगतों. रा. गोविंदराव चांदोरकर यांनी पुष्कळ नवीन प्रकरणांचा शोध करून लिहिलेला निबंध अश्रुतपूर्व आहे. मानभावांत इतिहासज्ञान नाहीं. आपल्या हि त्यांजविषयींच्या कल्पना निवळत चालल्या आहेत. पांच सात वर्षांपूर्वीचा काळोख मावळत चालला आहे व असा अंदाज आहे की, पुढील पांच सहा वर्षांत मानभावी शोधाचा अंत पाहूं. पुढे आपले मित्र रा. भट यांनी धर्मशास्त्राचा अभ्यास करून मोठा नामांकित निबंध आपल्या पुढें वाचला. त्यांना या अभ्यासाची संवय फार जुनी आहे. धर्मशास्त्रविषयक व व्यवहार संबंधी कागदपत्र वगैरे सामुग्री आहे या पेक्षां जास्ती वाढत जाईल तर मी असा तर्क करितों की, आमचे मित्र कदाचित् दर पंधरवड्याला मंडळावर हल्ला करितील.

धर्मशास्त्र म्हणजे कायदा, समाजशास्त्र, इतिहासशास्त्र, राज्यशास्त्र इ. शास्त्रांचा अभ्यास आपल्याकडे होत नाही. सगळ्या जगाची हिंदुस्थानाबद्दल ही तक्रार आहे. राजतरंगिणीचे वगैरे आधार पुढें आणून ही तक्रार खोडण्यांत हंशील नाही. पूर्वी जर गोडी नसेल तर नवीन उत्पन्न केली पाहिजे, आणि अशी धांव मारिली पाहिजे की, अमेरिका आणि युरोप यात असतील तीं सर्व शास्त्रे अभ्यासून तिकडील विद्वानांच्या स्वप्नी हि आलें नाही असें नवीन शास्त्र आपण निर्माण करूं. आतां माझ्या निबंधांबद्दल म्हणाल तर मी च काय बोलावें ? तथापि, माझी माझ्यावर च कशी टीका साधते तीं पाहतों. मी लिहिलेले निबंध बहुशः जितके ऐतिहासिक, तितके च सामाजिक व तितके च राजकीय हि आहेत.पहिल्या निबंधांतील प्रमेय असें:— जाति अगोदर, नंतर व्यक्ति; युरोपचें त्याच्या उलट आहे. आधुनिक समाजशास्त्राप्रमाणें Inheritance म्ह० आनुवंशिक संस्कार Disposition म्ह० स्वभाव, आणि Education म्ह० शिक्षण या तीन साधनांच्या द्वारें माणसांची प्रगति व्हावयाची आहे. म्हणून समाजशास्त्रविषयक प्रश्नांचा मोठा आस्थापूर्वक अभ्यास होणें अत्यंत आवश्यक आहे. दुसरा विषय कायद्यांबद्दल; त्यांतील मुद्दा वर्णोन्नति झाली पाहिजे हा होता. तिसरा निबंध हिंदु शब्दाबद्दल आहे.

या सर्व निबंधांतून हिंदु धर्मावर विशेष कटाक्ष ठेवला आहे. जैन, लिंगायत हे हिंदु च आहेत. पाखंडी देखील हिंदु च आहेत, हे विसरता कामा नये. हिंदुधर्म हा देवधर्मवाचक म्ह० Religion वाचक शब्द आहे. एकदां रा. गणपतराव जोशी मला म्हणाले, " Institutions चा अभ्यास मी अत्यंत महत्वाचा समजतो " मी म्हणालों, Fact finding आधी झालें पाहिजे. त्यांना हें मान्य झालें. जाति या संस्थेचा अभ्यास करून मी हे निबंध लिहिले आहेत. संस्कृतपरंपरा जगविण्याचा आपणा सर्वांचा हेतु आहे. तत्प्रीत्यर्थ यत्न झाला पाहिजे. सर्वांनी या बाबीचा विचार करावा. म्हणजे जरूर वाटल्यास मला माझे म्हणण्याची दुरुस्ती करितां येईल. श्री. मुजुमदार यांनी वाचिलेला शिलालेख महत्वाचा होता. त्यावर अधिक प्रपंच करून त्यांनीं तो सादर केल्यास जास्त उपयोग होईल. रा. पटवर्धन यानी एका वीराचे प्रतिवीराला लिहिलेलें कौतुक उत्पन्न करणारे पत्र आपल्या पुढें वाचले. इतर संशोधकांनीं हि आपली कामगिरी चांगली बजावली एकंदरीनें पाहतां, जगांतील इतर ऐतिहासिक संस्थांच्या निबंधांच्या तोलाचे निबंध आपल्या या संमेलनांत वाचण्यांत आले. नवीन मडळीची कामगिरी पाहून थट्टेने नव्हे तर परमार्थतः बोलतों की, जुन्यांनीं संस्था सोडिली तरी चालेल. आपण उपमंडळें नेमिली ही मोठ्या जबाबदारीची योजना झाली. आपले चिटणीस श्री. तात्यासाहेब मेहेंदळे यांचें काम फार उत्तम झालें. आपले अध्यक्ष रा. ब. साने यांचे आपण अवश्य आभार मानिले पाहिजेत. असले अध्यक्ष आपणास दहा वीस वर्षें असावेत, आपल्या सं-

शोधकांनीं साठ साठ वर्षें कामें करावीत व इतिहाससंशोधन च करावें असें नाहीं, तर इतिहास करून दाखवावे."

त्यानंतर रा. वि. ल. भावे म्हणाले, "श्री तात्यासाहेब मेहेंदळे यांनी आज पांच वर्षें जागा दिली, व साहाय्य केलें याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडे आहेत. त्यांनीं आपल्या स्थितीतील लोकास फार चांगला धडा घालून दिला आहे. पूर्वजांनीं नवीन इतिहास केला, आपण तो नुसता गाणार. श्री. तात्यासाहेब सरदार आहेत, विद्वान आहेत वगैरे सर्व विशेष आहे. कळकळीमुळें सर्व होतें. येथे पाहिजे जातीचें, मनाचें वेड लागलें पाहिजे, म्हणजे तो च काम करील. या साठीं मीं पुनःपुनः त्यांचे आभार मानतों."

रा. ग. सानेः—चिटणिसांचें काम केल्याबद्दल रा. दत्तोपंतांचे आभार मानिले पाहिजे.

सरदार मेहेंदळेः— साने, भावे वगैरेंनी आमचे आभार मानिले, परंतु आम्ही चिटणिसांनी कर्तव्य केल्याबद्दल आभार कशाला ! मला सल्ला मसलत देऊन साहाय्य केलें त्यांचे व हजर राहून हें संमेलन यशस्वी करणाऱ्या सर्व मंडळीचे मी फार फार आभार मानतो.



भारत-इतिहास-संशोधक-मंडळ

चतुर्थ संमेलनवृत्त

( शके १८३८ )

# अनुक्रमणिका


| विषय | लेखक | पृष्ठें |
|---|---|---|
| १ हिंदू समाजांत हिंद्वितरांचा समावेश | रा. वि. का. राजवाडे | १– २६ |
| २ श्रीगागाभट्टकृत शिवराजप्रशस्ति व कायस्थ धर्मदीप | रा. वि. का. राजवाडे | २७– ४९ |
| ३ हिंदू शब्दाचा इतिहास | रा. वि. का. राजवाडे | ४९– ५३ |
| ४ दामाजीपंत व विठ्या महार | रा. वि. का. राजवाडे | ५३– ६७ |
| ५ श्री. छत्रपति शिवाजी महाराज यांची शक १५६८ तील दोन पत्रे | रा. वि. का. राजवाडे | ६७– ७१ |
| ६ संस्कृत व मराठी कवी परशराम त्र्यंबक प्रतिनिधि | रा. वि. का. राजवाडे | ७१– ७२ |
| ७ औरंगजेबाचें शिवाजीस पत्र | रा. पां. न. पटवर्धन | ७३– ७८ |
| ८ शिवाजीचें एक पत्र | रा. द. वा. पोतदार | ७८– ७९ |
| ९ अंबाबाई उदो अथवा नाथसंप्रदायांतील एक महत्त्वाचा नवीन दुवा | रा. द. वा. पोतदार | ७९– ८१ |
| १० भक्तमंजरीमालेचें ऐतिहासिक महत्त्व | रा. रा. द. पराडकर | ८१– ८३ |
| ११ महादजी शिंदे यांची शेवटची दोन वर्षें | रा. चिं. गं. भानू | ८३– ९७ |
| १२ मुसलमानांचा संजीवनी मंत्र | रा. पां. मा. चांदोरकर | ९७– ९९ |
| १३ साष्टीची बखर | रा. स. म. दिवेकर | १०० |
| १४ व्यवहारनिर्णयपद्धति, वाक्पारुष्यादि व ऋणदानादि व्यवहारस्थानें | रा. भा. वा. भट | १००–१५४ |

| | | |
|---|---|---|
| १५ मानभावोत्पत्ति ( चक्रधराचा काल ) | रा. गो. का. चांदोरकर | १५४–१७४ |
| १६ जेधे यांची शकावली | रा. बा. गं. टिळक | १७५–२०७ |
| १७ शक १८३७ तील संशोधनाची हकीकत | रा, वि. का. राजवाडे | २०७–२१३ |
| १८ गेल्या दिवाळीतील संशोधन | रा. द. वा. पोतदार | २१३–२१५ |
| १९ माझे संशोधनवृत्त | रा. पां. न. पटवर्धन | २१५–२२२ |
| २० संशोधनवृत्त | रा. स. मा. दिवेकर | २२२ |

## विनंति.

चतुर्थ संमेलनवृत्ताची सूचि तयार झाल्यावर मागाहून पाठवूं इलाज नाहीं.

**चिटणीस.**

# हिंदू समाजांत हिंद्वितरांचा समावेश

इंग्लिश्, अमेरिकन् मुसुलमान्, जपानी, व हिंदू वगैरे पृथ्वीच्या पाठी वरील निरनिराळे समाज स्वेतर लोकांना कोणकोणत्या निरनिराळ्या पद्धतींनीं आत्मसात् करून घेतात, ह्या बाबीचा शोध करणें हें समाजशास्त्राचे एक काम आहे. पैकीं यूरोपीयन् व अमेरिकन् समाज कोणत्या पद्धतीनी स्वेतर समावेशन करतात, तें यूरोपीयन् व अमेरिकन् समाजशास्त्रयांनी सूक्ष्मपणें शोधिलेलें आढळतें. यूरोपीयन् व अमेरिकन् समाज तीन निरनिराळ्या पाद्यऱ्यानी स्वेतरांचें समावेशन करून घेतात. ( १ ) नुसतें जुजबी राजकीय समावेशन ह्मणजे, कोणी इसम कांहीं काल देशांत राहिला असतां, स्थानिक स्वराज्यांतील व राष्ट्रीय स्वराज्यांतील उमेदवार निवडण्याचा हक्क देऊन आणि देशांतील कायद्यांचा पाठिंबा देऊन, त्या इसमाला आपला प्रजाजन ह्मणून समाविष्ट करणे. ( २ ) धार्मिक समावेशन ह्मणजे देशांतील राष्ट्रानें जो देवधर्म आपला ह्मणून जाहीर केला तो देवधर्म कोणी इसम स्वीकारील तर नुसत्या राजकीय प्रजाजनाहून तो धार्मिक प्रजाजन राष्ट्राला प्रियतर होतो. ( ३ ) सामाजिक समावेशन ह्मणजे समाजांतील स्त्रीपुरुषांशीं बेटीव्यवहार करण्याची मोकळीक देणें. हें तिसरें समावेशन झालें ह्मणजे तो इसम त्या राष्ट्रांतील सर्व धार्मिक, राजकीय व सामाजिक हक्क तद्देशज प्रजाजना प्रमाणें भोगूं लागतो, आणि तो व त्याची संतती पूर्णपणें तद्देशज ह्मणजे अभिजन बनतात. सर्वांत श्रेष्ठ व प्रेष्ठ असें हें सामाजिक समावेशन यूरोपीयन् व अमेरिकन् राष्ट्रें पृथ्वीवरील वाटेल त्या इसमाला देतात असें नाहीं. ह्या कामीं ते निवड करतात. ती निवड ते दिसण्याला एका अगदी क्षुल्लक मुद्या वर करतात. तो मुद्दा ह्मणजे दुसरातिसरा कांहीं एक नसून निव्वळ कातडीच्या रंगाचा व चेहऱ्याच्या ठेवणीचा. काळी, पिवळी, किंवा सांवळी कातडी घेऊन जो इसम जन्मास आला त्याला ते सामाजिक समावेशन करूं देत नाहींत. त्यांना गोरी कातडी प्राणाहून हि प्रिय वाटते. ती ज्याजवळ नसेल तो इसम बेटीव्यवहार करण्याला व कधीकधीं रोटीव्यवहार करण्याला ते लायक समजत नाहींत. यदाकदाचित् कातडी गोरी असली, तत्रापि जर त्या इसमाचें नाक फेपटें किंवा केस लोंकरीसारखें किंवा डोळे तिरके किंवा गालफडाची हाडें पुढें आलेली असली, तर त्या इसमाशी ते बेटीव्यवहार करण्याला कांकू करतात. कातडीच्या रंगाचा व चेहऱ्याच्या ठेव-

णीचा हा अपवाद वर्ज्य केला, तर असें ह्मणतां येईल कीं, यूरोपीयन् व अमेरिकन् समाजांत पृथ्वीच्या पाठी वरील वाटेल त्या मनुष्यास प्रविष्ट होतां येतें. इतकें खरें की, अपवादांत पडणाऱ्या माणसांची संख्या अपवादांत न पडणाऱ्या माणसांच्या संख्ये हून बेसुमार जास्त आहे. यूरोपीयन् समाज बोलण्यांत मात्र समतेचे मोठमोठे व्यापक सिद्धांत बोलतो, परंतु त्याच्या करणीत फरक जमीन-अस्मानाचा असतो.

२ मुसुलमान् समाज स्वेतर लोकांचें समावेशन करून घेण्यांत यूरोपियन् समाजा इतका चवचालपणा दाखवीत नाहीं. राजकीय, धार्मिक किंवा सामाजिक अश्या समावेशनाच्या तीन पाह्यऱ्या हि मुसुलमान समाजाला माहीत नाहीत. एक धार्मिक समावेशन तेवढें त्याला माहीत आहे. मुसुलमान् देवधर्म कोणी स्वीकारिला ह्मणजे तो इसम मुसुलमान् समाजांतील एकोन एक श्रेष्ठ व प्रेष्ठ हक्क भोगण्यस लायक होतो. त्याच्या आड कातडीचा रंग किंवा चेहऱ्याची ठेवण येऊं सकत नाहीं. वाटेल तो शुद्ध किंवा मिश्र वंश असो, हवी ती उच्च किंवा नीच संस्कृति असो, कोण्या हि इसमाने मुसुलमानी देवधर्म स्वीकारला कीं तो एकजात मुसुलमान् झाला. मुसुलमान् समाजांत समावेशन इतकें अगदीं पराकाष्ठेचें साधें व सरळ आहे.

३ चिनी किंवा जपानी समाजांस बाह्यांचा समावेश करून घेण्याचा प्रसंग च फारसा आलेला नाहीं. त्यांचे देश त्यांच्या स्वतःच्या च लोकसंख्येनें इतके खचून भरले आहेत की, बाह्यांच्या वसाहती तेथे फारशा झाल्या नाहींत. चिनांत किंवा जपानांत कोणी इसम योग्य काळ जाऊन राहिला, तर त्याचे राजकीय समावेशन यूरोपांतील राष्ट्रांतल्या प्रमाणे च बहुतेक होते. बौद्ध धर्म स्वीकारिला, तर धार्मिक समावेशन हि होईल. सामाजिक समावेशन ह्मणजे कायदेशीर शरीर-संबंध होऊन एकजातपणा येण्यास चिनी व जपानी समाजांत तत्वदृष्टीनें वंशाची किंवा रंगाची किंवा चेहऱ्याची आडकाठी नाहीं. इतकें च कीं बाह्यांचा संसर्ग च त्या देशांना इतका थोडा पोहोचला आहे की, हे प्रश्न तेथें उत्कटत्वानें अद्याप पर्यंत उद्भवले नाहीत.

४ ह्या सर्व समाजां हून हिंदुसमाजाची बाह्यांच्या समावेशना संबंधानें रीती पूर्वीं अगदी भिन्न होती व सध्यां हि आहे. समजा कीं, कोणी अनार्य बाह्य व्यापाराच्या किंवा अन्य कोणत्या हि मिषानें भरतभूमींत येऊन कायम रहाण्याची इच्छा करूं लागला. तर राजकीय दृष्टीनें त्याची गणना नागरिकांत किंवा ग्रामजनांत होणे अशक्य असे. ग्राम किंवा नगर ह्मटले ह्मणजे तें अठरा पगड जातीं खेरीज इतरांचें बनलेलें नसे. प्रत्येक धंद्याची स्वतंत्र जात असून, त्या जातींचें ग्राम बने. प्रत्येक जात आपापल्या धंद्याची वतनदार होती. ज्याला वृत्ति ह्मणजे वतन नाही, असा मनुष्य ग्रामांत हक्काने राहूं शकत नसे. इतर ग्रामांतच कोणी

बेकार आर्य मनुष्य ग्रामांत रहाण्याची इच्छा करू लागला, तर ग्रामांतील वृत्तिवंतांची ह्मणजे वतनदारांची ग्रामसभा भरून त्यांनी एकमतानें, बहुमताने नव्हे, परवानगी दिली तर त्याची स्थापना गावांत होई व ती हि उपरि ह्मणून होई. उपरीचा मिरासी ह्मणजे पिढीजात ग्रामस्थ होण्यास कित्येक पिढ्या जाव्या लागत. ही कथा आर्य उपरींची झाली. अनार्य लोकांचा समावेश ग्रामसंस्था कांहीं विशेष संस्कार झाल्या खेरीज, होऊं देत नसत. अनार्य दोन प्रकारचे असत. एतद्देशज अनार्य व बहिर्देशज अनार्य. एतद्देशज अनार्यांत नाग, कोळ, भिल्ल, गोंड, पुक्कस, कातकरी, ठाकूर, वगैरे लोक येत. बहिर्देशज अनार्यांत शक, यवन, पारसीक, बाल्हीक, मुसुलमान वगैरे लोक येत. आर्यांना आर्यावर्तात व दक्षिणेत प्रथम अनार्य लोक जे भेटले ते एतद्देशज नाग वगैरे अनार्य लोक भेटले. ह्या अनार्यां पैकीं कित्येक नागवंशा पैकी होते, कित्येक कोलवंशा पैकी होते व कित्येक राक्षस वंशा पैकी होते. नाग, कोल व राक्षस हे ह्या देशांत आर्यांच्या पूर्वींचे लोक होत. आर्यावर्तांत व दक्षिणारण्यांत व अपरान्तांत आर्यांनीं ग्रामस्थापना जेव्हां केल्या, तेव्हां ह्या एतद्देशज अनार्यांना ग्रामसंस्थेंत कोणतें स्थान कसे द्यावें याचा विचार पडला. ह्या विचारांतून सुरक्षितपणें पार पडण्यास आर्यांचा पूर्वींचा एक प्रघात उपकारक झाला. गुणानीं व कर्मांनीं भिन्न इसमांचे निराळे वर्ण करण्यास आर्य फार पुरातन काला पासून शिकले होते. ह्या शिक्षणाचा ऊर्फ सतत मनःप्रवृत्तीचा परिणाम चातुर्वर्ण्य होय. चातुर्वर्ण्यातील चारी वर्ण बीजक्षेत्रानें नितांत पृथक् होण्या पूर्वी, अनुलोम व प्रतिलोम शरीरसंबंध घडत. त्या शरीरसंबंधा पासून जी प्रजा निर्माण होई तिला तीन पिढ्यांनीं, किंवा पांच पिढ्यांनी किंवा सात पिढ्यांनीं मूळ पित्याच्या वर्णांत परत जातां येई. कालान्तरानें चातुर्वर्ण्यातील लोकसंख्या बरीच वाढल्या वर, अनुलोम व प्रतिलोम शरीर संबंधाची प्रजा हि बरीच वाढूं लागली. अनुलोमज व प्रतिलोमज प्रजा बरीच वाढल्या वर त्या अनुलोमजांत किंवा प्रतिलोमजांत आंतले आंत शरीरसंबंध होऊं लागले. अशा रीतीनें अनुलोमज व प्रतिलोमज संकरांचे पोट समाज अस्तित्वांत आले. आईबाप, भाऊबंधु, सगेसोयरे, असा कौटुंबिक मायेचा पसारा संकरसमाजांत झाला. अशा संकरसमाजांतून मूळवर्णांत ह्मणजे मूळब्राह्मणक्षत्रियादि वर्णांत परत जाण्याची कोण्या संकरज व्यक्तीनें इच्छा व प्रयत्न केला, तर तो सिद्धीस जाणें मायाजाळामुळें केवळ अशक्य झालें. समजा की ब्राह्मण बीज व क्षत्रिय क्षेत्र ह्यांच्या संयोगा पासून एक मुलगा व एक मुलगी अशी दोन अपत्ये झालीं. पैकी मुलगा हा सदा च संकरांत राही. त्याला पित्याच्या वर्णांत जातां येत नसे. मुलगी राहिली, तिचें पाणिग्रहण ब्राह्मणानें केले आणि त्या जोडप्याला मुलगी झाली, आणि त्या मुलीचे पाणिग्रहण ह्मणजे तिसऱ्या पिढींतील मुलीचें पाणिग्रहण जर पुनः ब्राह्मणानें केलें तर त्या जोडप्याला जी संतती होई ती—मुलगे व मुलग्या—पूर्ण ब्राह्मण-

वर्णाची गणिली जाई. ह्या तीन पिढ्यांच्या ज्या तीन मुली—आजी, आई व स्वतः मुलगी—ह्यांचा पूर्वीच्या संकरजातींतील मायबापाशी, बंधुभगिनींशीं किंवा सग्यासोयऱ्यांशीं मायेचा संबंध अजीबात तुटे. संकरजांची लोकसंख्या जसजशी वाढली तसतशी वर्णोन्नत्यर्थ जिवलगांची ही अस्वाभाविक ताटातूट असह्य भासूं लागली आणि ती सोसून वर्णोन्नति साधण्याचा ह्व्यास माजी पडत पडत अजीबात बंद पडला. ही बंदी ज्या कालीं पडली तो च काल संकरजातीचा स्थिर होण्याचा होय. मनुस्मृतींत व याज्ञवल्क्यस्मृतींत संकरांच्या वर्णोन्नतीच्या पद्धती दिल्या आहेत. त्यां वरून ताडतां येतें कीं मनु व याज्ञवल्क्य यांच्या कालीं संकरजांची वर्णोन्नति होण्याची पद्धती समाजांत प्रचलित होती. समाजांत एखादी रूढी प्रचलित असल्या विना धर्मशास्त्रांत आज्ञा ऊर्फ कायदा ह्मणून तिचे प्रख्यापन सहसा होऊं शकत नाहीं. अर्थात्, मनु व याज्ञवल्क्य ह्यांच्या नंतर वर्णोन्नतीचें सायास संकरजांच्या अनुभवास येऊन, संकरसमाज स्थिर झाला. संकर स्थिर होणें ह्मणजे संकरसमाजबाह्य शरीरसंबंध होण्याचें थांबणे. बाह्य शरीरसंबंध होण्याचें ज्या संकरसमाजांत थांबतें तो समाज जाति ह्या पदवीला पोहोचतो. ज्या समाजाची वृद्धि, फक्त बीजक्षेत्राचा व्यवहार त्या समाजांतल्या समाजांत होऊन, होते, अन्य कोणत्या हि रीतीनें होत नाहीं, त्या समाजास जाति ह्मणतात. जाति फक्त जन्मानें प्राप्त होते, इतर कोणत्या हि तऱ्हेनें प्राप्त होत नाहीं. संकरजाती ह्मणून ज्या ह्मणतात त्या ह्या अश्या आस्तित्वांत आल्या. जातिसंस्थेनें एक कार्य अगदीं बेमालूम होतें. तें हें कीं बीजक्षेत्राची शुद्धि परिपूर्ण रहाते व जिवलगांची ताटातूट होत नाहीं. संकरांच्या वर्णोन्नतीचा प्रश्न सोडवितां सोडवितां, आर्यांना ही जातिसंस्था निर्माण करण्याची क्लृप्ति सुचलेली आहे. ती च क्लृप्ति एतद्देशज अनार्य समाजांची स्थापना ग्रामसंस्थांत करतांना, आर्यांनी अमलांत आणिली. जो जो ह्मणून अनार्य समाज दक्षिणेत व उत्तरेत वसाहत करतांना आर्यांना भेटला, त्या त्या अनार्य समाजाची आर्यांनीं स्वतंत्र जात ह्मणून गणना केली. प्रायः आपापल्या समाजांतील संस्था जेते जित लोकांशी व्यवहार करतांना जित लोकांत स्थापीत असतात. आणि ती स्थापना करण्याच्या प्रयोगांत जे नूतन अनुभव येतात त्यांचा स्वसमाजाची नूतन घटना करण्यांत उपयोग करतात. संकरांची व्यवस्था करण्यांत जातिसंस्थेची कल्पना सुचली. आणि ती कल्पना आर्यांनीं अनार्यांची व्यवस्था करतांना अनार्यसमाजांना लाविली, इतकें च नव्हे तर स्वतःच्या चातुर्वर्ण्यसंस्थेला हि लाविली. संकरांतून बीजक्षेत्रशुद्धी झाल्यावर व्यक्तींना चातुर्वर्ण्यांतील कोणत्या हि मूळवर्णांत जसें परत जातां येत असे, तसें च चातुर्वर्ण्यांतील कोणत्या हि खालच्या वर्णाच्या व्यक्तीला गुणकर्मांचा उत्कर्ष साधल्यास, ह्मणेज तपश्चर्या केल्यास, ब्राह्मणवर्णात प्रविष्ट होतां येत असे. जातिसंस्थेची

कल्पना सुचल्या वर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, हे चारी वर्ण हि जाति बनले. सध्यां, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण असून शिवाय ह्याच चार जाती हि आहेत. खेरीज, सुतार, चांभार, लोहार, सोनार, वगैरे स्थिर झालेल्या संकर-जाति हि आहेत. शिवाय, नाग, कोळ, राक्षस, वगैरे एतद्देशज अनार्यांच्या संसर्गा पासून झालेल्या अंत्यज व बाह्य जाति झाल्या त्या वेगळ्या च. संसर्ग हा शब्द येथे मुद्दाम योजिला आहे. नाग, कोळ, राक्षस, वगैरे जे मूळचे अनार्य समाज ह्या देशांत होते, त्यांशी अन्त्यांचा ह्मणजे शूद्रांचा संबंध होऊन जी संकरप्रजा उत्पन्न झाली तिला अंत्यजन्म किंवा अंत्यज ही संज्ञा मिळाली. ह्या अंत्यजांना नामशूद्र, पंचम वगैरे प्रांतपरत्वें संज्ञा आहेत. जातिविवेकाच्या ग्रंथांत महार, मांग, गारुडी, बुरूड, चांडाल, वगैरे अत्यजांची उत्पत्ति कोणत्या संकरां पासून झाली त्यांची वर्णनें आहेत. ही वर्णनें कल्पित नसून वस्तुस्थितिदर्शक आहेत, हें सांगावयाला नको. एणे प्रमाणे एतद्देशज अनार्यां पासून दोन दोन निराळ्या जाति झाल्या. एक संकरज अंत्यज व दुसरी शुद्ध मूळची अनार्य.

५ ब्राह्मणादि शुद्धजाति, सुतारादि संकरजाति व महारादि अंत्यज जाति ह्यांना ग्रामांत वृत्ति करून दिलेल्या असत. प्रत्येक जातीला स्वतंत्र वृत्ति असे. सर्व हिंदुस्थानांत एक हि व्यक्ति अशी नसे की जिचा अंतर्भाव जातीत झालेला नव्हता. तात्पर्य, हिंदुसमाज जातींना ओळखतो, स्वतंत्र व तुटक व्यक्तींना ओळखत नाही. व्यक्तींना ओळखावयाचें तें जातिद्वारा ओळखले जाते. ह्मणजे हिंदुसमाजांत कोणता हि ग्रामसंबंध ठेवण्यास जाति हा शेवटला राशि आहे, व्यक्ति नाही. अशी स्थिति असल्या मुळे, बहिर्देशज अनार्य जर भरतखंडांत येऊन वसती करण्याची इच्छा करूं लागले, तर व्यक्ति ह्या दृष्टीनें त्यांची स्थापना ग्रामसंस्थांत होणें शक्य नसे. व्यक्ति जेव्हां जाति बनत तेव्हां च त्यांची समाजांत स्थापना होई. जाति ह्मटली की तिला स्वतंत्र वृत्ति ग्रामसंस्था नेमून देत असे. असे बहिर्देशज समाज भरतखंडांत जातिरूपें घेऊन राहिलेले पूर्वीं पुरातन-कालीं हि होते व सध्यां हि आहेत. मीडिया देशांतील मेदां पासून झालेली उत्तर हिंदुस्थानांतील मेध ही जात फार पुरातन आहे. ही जात भंग्याची वृत्ति करून आहे. पश्चिम हिंदुस्थानांतील पारशांची जात बनून बाराशे वर्षे लोटली आहेत. ही पारशी जात वैश्याचा धंदा करते. कोंकणकिनाऱ्या वरील यहुद्यांची हि जात बनून आज दोन हजार वर्षे होत आलीं. ही जात मुख्यत्वें तेल्याचा धंदा करत्ये. निर्भेळ अरब व इंग्रज हे हि हिंदुस्थानांत जात बनून च राहिले आहेत. इंग्रज ह्मटला की तो इंग्रज जन्मावा लागतो आणि अरब ह्मटला ह्मणजे तो अरब जन्मावा लागतो. इंग्रजबीज व अंत्यजक्षेत्र या पासून यूरेजियन जात बनली आहे. ख्रिस्ती बाट्यांची अद्याप जात बनली नाहीं. अद्याप धर्मांतर होऊन बाहेरून हा समाज वाढत आहे. परंतु, जातिबद्ध हिंदू समाजाच्या संसर्गानें थोड्या च कालांत बाटलेल्या ख्रिस्त्यांची पूर्ण

जात बनेल यांत संशय नाहीं, व ह्या जातीला योग्य ती वृत्ति हि हिंदुसमाज देईल, हें निश्चित आहे. अंत्यजादि हिंदू बाटून जो मुसुलमान समाज झाला आहे तो कित्येक प्रांतांत जात बनला आहे व कित्येक प्रांतांत धर्मांतराने त्याची अल्पस्वल्प वृद्धि होत असल्या मुळें अद्याप जात बनला नाहीं. परंतु, कालान्तराने हा हि समाज स्थिर होऊन त्याची हि हिंदुसंसर्गानें जात बनेल यांत संशय नाहीं. एकवर्णेछू हिंदूंची उमेद सर्व हिंदूंना एकवर्णी करण्याची आहे. परंतु, जातिसंस्थेची चिकाटी पहातां व बीजक्षेत्राच्या शुद्धी विषयीं हिंदूंची अपरंपार आसक्ति लक्ष्यांत घेतां, असें भाकीत केलें तर चालेल की एकवर्णेछू हिंदूंची हि पुढे मागें एक स्वतंत्र जात होईल.

६ एतद्देशज अनार्य असोत कीं बहिर्देशज अनार्य असोत, हिंदुस्थानांत त्यांना कायमचें रहावयाचें ह्मणजे जात बनून च त्यांनां हिंदुसमाज राहूं देत असे ह्मणजे अनार्य बाह्य समाजाला जात बनवून त्याचा समावेश हिंदुसमाज आपल्यांत करून घेत असे. जात बनल्या शिवाय नागरिकत्वाचे किंवा ग्रामस्थाचे हक्क मिळत नसत, ह्मणजे स्थानिक स्वराज्याच्या व साम्राज्याच्या छत्राचा आश्रय मिळत नसे. हिंदुसमाजांत बाह्यांचें राजकीय समावेशन, जातीचें रूप घेतल्या नंतर होत असे. बाह्य जातिसंस्थ झाले ह्मणजे त्यांना त्यांच्या अनुरूप वृत्ति मिळून किंवा धंदा मिळून हिंदुसमाजांत व हिंदुदेशांत देशांतील राज्यछत्रा खाली सुखरूप रहातां येत असे. अशी जाति देशांत फार काल राहिली, एथील अभिजन बनली व हिंदुसमाजाचे सामान्य धर्म पाळूं लागली, ह्मणजे त्या जातीला हिंदू हें अभिधान प्राप्त होई. नंतर त्या जातीचा जो देव असेल त्याची स्थापना हिंदूंच्या तेहतीस कोटी देवता-मंडळांत होऊन, पूर्ण हिंदुत्वाचा शिक्का त्या जाती वर कायमचा मारला जाई. अशा रीतीनें राजकीय व धार्मिक समावेशन यद्यपि झाले, तत्रापि सामाजिक समावेशन कधी च होत नसे. कारण, जातिबाह्य शरीरसंबंधाचा हिंदू मनोरचनेला पराकाष्टेचा तिरस्कार आहे. यूरोपीयन् किंवा अमेरिकन् समाजाला नीग्रो किंवा चिनी यांच्याशी रंगबाह्य शरीरसंबंध करण्या पासून जी मनोरचना परावृत्त करते ती च मनोरचना जातिबाह्य शरीरसंबंध करण्या पासून हिंदूंना परावृत्त करत्ये. यूरोपीयनांत व अमेरिकनांत रंगबाह्य शरीरसंबंध केल्यानें जी संकरप्रजा उत्पन्न होते तिला निग्रिटो, मूलाटो, यूरेशियन, वगैरे संज्ञा असून, ती संकरप्रजा संस्कृतीनें व दर्जानें बहुतेक मातेच्या संस्कृतीची व दर्जाची समजतात. आर्यांत फक्त वर्ण जेव्हां होते, तेव्हां वर्णावर्णांत शरीरसंबंध होऊन जी प्रजा होई तिला संकर समजत व तिचा दर्जा मातेच्या किंवा पित्याच्या दर्ज्याहून आनुलोम्यप्रतिलोम्या प्रमाणें जास्त किंवा कमी समजत. अस्सल यूरोपियन स्त्री व अस्सल नीग्रो ह्यांच्या शरीरसंबंधा पासून झालेली संतती मूलाटोहून अत्यन्त नीच समजतात. तो च प्रकार आर्यांत हि होई. ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यां पासून झालेली संतती केवळ चांडाल

समजत. पुढें आर्यांत जेव्हां जातिसंस्था झाल्या, तेव्हां अनुलोमप्रातिलोमसंकर च होण्याचे बंद पडले व एखाद्या स्त्री किंवा पुरुष व्यक्तीनें जातिबाह्य शरीरसंबंध केला व त्या संबंधा पासून प्रजा झाली, तर त्या स्त्रीपुरुषांना व त्यांच्या प्रजेला जातिभ्रष्ट समजत व त्यांना गावांत कोठें हि थारा मिळत नसे. तशांत मुसुलमानादि विधर्मीयांशी संबंध घडला, तर त्या व्यक्तीस आपल्या जातीस व हिंदुत्वास मुकावें लागे. सबंद जात ची जात जर विधर्मीयांशी शरीरादिसंबंध किंवा अन्नापानादिसंबंध ठेवूं लागली, तर ती सबंद जात ची जात हिंदुत्वांतून उठे. चार पांचशे वर्षा पूर्वी खानदेशांत वोहऱ्यांची जात व कोंकणांत गोवेप्रांतीं किरिस्तावांची जात अश्या तऱ्हेनें अस्तित्वांत आली. वोहरी हे मूळचे हिंदू व्यापारी होते व गोव्याचे किरिस्ताव मूळचे ब्राह्मणादिवर्णांतील होते. युरोपियनांना रंगबाह्य शरीरसंबंधाची व हिंदूंना जातिबाह्य शरीरसंबंधाची ओकारी सारखी च येते. अशी जर स्थिति आहे, तर युरोपियनानी मानभावीपणाने हिंदूंना नांवें ठेवावी यांत कोणता शहाणपणा आहे बरें ?

७ उपरिगत तपशिला वरून लक्ष्यांत येईल की यूरोपीयन समाज बाह्यांचे समावेशन व्यक्तिशः करतो व हिंदू समाज जातिशः करतो. ह्या पद्धतींतून बाह्यांचे हित कोणती पद्धती जास्त साधते ते पाहूं. बाह्यांची व्यवस्था करण्याची विवंचना दोघां हि समाजांना परदेश जिकतांना पडलेली आहे. यूरोपीयन लोक अमेरिकेंत वसाहती जेव्हां करूं लागले व आर्य हिंदुस्थानांत व दक्षिणेत जेव्हां ग्रामसंस्था स्थापूं लागले, तेव्हां बाह्याची व्यवस्था लावणे दोघांना हि अपरिहार्य झाले. पैकी, यूरोपीयन पद्धतीचे संक्षिप्त चित्र प्रथम काढतो. स्पानिश लोक अमेरिकेतील पेरू व मेक्सिको ह्या देशांत वसाहत करण्यास इसवी सनाच्या पंधराव्या व सोळाव्या शतकांत गेलें. पेरू व मेक्सिको देशांतील मूळच्या रहिवाशांचा स्वतःच्या समाजांत अंतर्भाव कसा करावा, हे त्यांना प्रथम नीट समजले नाही. कांही व्यक्तींना ख्रिश्चन करून काय होते ते त्यांनी पाहिलें. जम नीट बसेना. तेव्हां, दगाबाजी, क्रौर्य व निर्दयपणाची कमाल करून, पेरू व मेक्सिको तील सबंद गांवचे गाव उद्ध्वस्त करून त्यांतील रहिवाश्यांची त्यांनीं कत्तल केली. त्या कत्तलींचा इतिहास जगप्रसिद्ध आहे. यूनायटेड स्टेट्स् मध्ये इंग्लिश वसाहतवाल्यांनी अमेरिकन इंडियानांची वासलात कशी लाविली ते हि महशूर आहे. इंग्लिश वसाहतवाल्यांच्या क्रौर्या पुढें, मानभावीपणा पुढे, मद्यपानप्रसारा पुढे, आर्थिक कचाटी पुढें, रोगबीजप्रसारा पुढें, ख्रिश्चन संस्कृती पुढें व भूमितृष्णे पुढें, बिचारे इंडियन्स केवळ नामशेष होत आले. ते इतके की यूनायटेड् स्टेट्स् मधील एका लहानशा टापूंत सध्यां कांहीं थोडे इंडियन्स केवळ प्रदर्शनार्थ राखून ठेविल्या सारखे आहेत. रंग, संस्कृति, आचार व धर्म निराळा, ह्या सबबी वर यूरोपियन लोकांनी इंडियन लोकांना उच्छिन्न केलें.

उच्छेदा शिवाय अन्य क्लृप्ति त्यांना त्या काळीं सुचली नाहीं. कमसंस्कृतीच्या यूरोपीयनेतर लोकांचा स्वसमाजांत समावेश यूरोपियन लोकानीं हा असा केला. राजकीय किंवा सामाजिक किंवा धार्मिक समावेशन करण्याचें रानटी समाजांतील एकेका व्यक्तीचें तेवढें अवगत असल्यामुळें सर्व रानटी समाज यूरोपीयन समाजाच्या तोडीचा होण्यास बेसुमार अवधि लागतो. उतावीळ पणानें शेकडों वर्षे वाट पहाण्याचा दम नसल्यामुळें, हें व्यक्तिसमावेशन अत्यंत मंद वाटून, रानटी समाजांना पृथ्वीच्या पाठी वरून समूळ सुधारून ऊर्फ उखडून टाकण्याचा उपक्रम यूरोपियनांनी केला. आतां भरतवर्षातील आर्यांची स्वेतरसमावेशनाची रीति पहा. भिल्ल, कोळ, गोंड, नाग, राक्षस, वानर, गरुड, वगैरे अनार्य बाह्य समाज आर्यांना भारतवर्षांत उत्तरेत व दक्षिणेत भेटले. पैकीं राक्षस समाज संस्कृतीनें आर्यांच्या बहुतेक बरोबरीचा असल्या मुळें, त्याचा युद्ध करून निःपात करणें आर्यांना राक्षसांनीं भाग पाडलें. बाकीचे जे अनार्य समाज होते, ते आर्यांच्या हून संस्कृतीनें सर्वतो प्रकारें निकृष्ट होते. ह्या निकृष्ट समाजांच्या आर्यांनी जाति बनविल्या, व आपल्या चातुर्वर्णिक जातिसंस्थांच्या शेजारीं त्यांची स्थापना केली. अनार्य समाजांशी आर्यांच्या शूद्रादिकांचा शरीरसंबंध होऊन जे अंत्यज संकर उत्पन्न झाले त्यांना ग्रामसंस्थांत स्थान व वृत्त्या मिळाल्या. भिल्ल, कोळ, गोंड वगैरे निर्भेळ अनार्य जाति व संकरोत्पन्न अनार्य अंत्यज जाति अद्याप हि हिंदुस्थानांत नांदत आहेत. अंत्यजांची लोकसंख्या मुसुलमान संकरांच्या लोकसंख्ये इतकी सध्यां हिंदुस्थानांत आहे. मुसुलमान संकर जो हिंदुस्थानांत आहे तो बहुतेक अंत्यज व अनार्य बाटून झालेला आहे. मुसुलमान ह्या देशांत आले नसते किंवा त्यांनीं ह्या अंत्यजांना बाटविलें नसते, तर आज मित्तीस अंत्यजांची लोकसंख्या दहा बारा कोटी असती. यूरोपियनांनी इंडियनांशीं जे क्रौर्याचें आचरण केलें, तसें आचरण जर आर्यांनी अनार्यांशीं केलें असतें, तर आज मित्तीस ही दहा बारा कोट लोकसंख्या दिसली नसती. परंतु भारतवर्षांतील आर्यांची बुद्धि दयार्द्र पडल्या मुळें व क्रौर्यमार्गाचें अवलंबन करणे अन्याय्य व अमानुष वाटल्या मुळें, स्वतंत्र जाति बनवून नागादि अनार्य जातींचें आर्यांनीं संरक्षण केलें. अनार्यांची संस्कृति इतकी निकृष्ट असे कीं त्यांच्यातील व्यक्तिमात्र आर्यसमाजांत घेऊं ह्मटलें तरी घेणें आर्यांना हि फायद्याचें नसे व अनार्यांना हि फायद्याचे नसे. नाना युक्त्यांनीं किंवा अमानुष क्रौर्यानें त्यांचा समूळ नाश करणें आर्यांचें ब्रीद नसे. प्राणिमात्राची हत्या करणें ह्मणजे महत्पाप जे गणीत ते हजारों अयुध्यमान मनुष्यांची हत्या जोडण्यास कसे प्रवृत्त व्हावे? युयुत्सूंशी युद्ध करण्यास आर्य वैदिक काला पासून प्रख्यात आहेत. परंतु, अयुध्यमान अश्या निरपराधी दस्यूंचा वध आर्यांच्या हातून होणें असंभाव्य होतें. तेव्हां,

स्वसमाजांतील वर्णाच्या व पुढें कालान्तरानें झालेल्या जातींच्या धर्ती वर दस्यूंचे ह्मणजे अनार्यांचे आर्यांनीं जातिरूप गट बनविले व ते आस्तेआस्ते सुधारावे व आर्यसंस्कृतीच्या जवळ यावे या सद्धेतूनें आपल्या सान्निध्यास सुखरूप ठेऊन दिले. अनार्यांचे जातिरूप गट झाल्यानें, त्यांच्या समाजाला व निकृष्ट संस्कृतीला प्राण-हारक धक्का बसला नाहीं. त्यांच्या वनदेवता, त्यांचे नाच, व त्यांचे धर्मसंस्कार, त्यांची पारध व त्यांची उपजीविकेची साधनें त्यांचीं त्यांच्यापाशी राहून, आर्यांच्या चालीरीतींचे व देवधर्मांचे अनुकरण यथावकाश व यथाशक्ति करण्यास त्यांना वाव सांपडला. भिल्ल, खोंड, गोंड, कोळ वगैरे अनार्य रानटी लोकांची पूर्व स्थिति व वर्तमान स्थिति ह्यांची तुलना ज्या समाजशास्त्रयांनीं केली आहे, ते वरील विधानाचें पोषण व समर्थन करूं शकतील. आर्यांच्या व अनार्यांच्या शरीरसंबंधा पासून जे अंत्यज संकर झाले, त्यांच्या ठाई आर्यबीज असल्या मुळे, हिंदुत्वांत येणें त्यांना निर्भेळ अनार्यांहून सुकर झालें. हिंदूंचे देव, धर्म, आचार व विचार अंत्यजांत निर्भेळ अनार्यांतल्या हून जास्त लवकर पसरले. ग्रामसंस्थांत अंत्यजांना तत्तदनुरूप वृत्त्या मिळाल्याने तर हिंदू संस्कृतीचे व हिंदुसमाजाचे ते अंशभाक् झाले. हिंदूंचीं शास्त्रे व हिंदूंच्या कला संपूर्णपणें ग्रहण करण्याची लायकी त्यांना कित्येक शतके पर्यंत आली नाहीं, हें खरें. परंतु पृथ्वीवर हा प्रकार सर्वत्र असा च घडत आलेला आहे. गहन शास्त्रे व भानगडीच्या कला रानटी लोकांच्या आंगवळणी पडण्यास फार प्रयास पडतात. तत्रापि, आर्यांच्या ग्रामसंस्थांत कायमचे स्थान मिळाल्या पासून, अंत्यजांची सुधारणा नाना प्रकाराने झालेली आहे. ( १ ) त्यांचा वन्यपणा सुटून, त्यांना ग्राम्यपणा आला. ( २ ) केवळ पारधीनें उपजीविका करण्याचें सुटून, गावांत शेती व इतर धंदे करून ते उपजीविका करूं लागले. ( ३ ) नग्नावस्था जाऊन, वस्त्राच्छादनावस्था त्यांना प्राप्त झाली. ( ४ ) मद्यपाना पासून परावृत्ति झाली. ( ५ ) जीवंत गाईचें मांस खाण्याचें बंद पडलें. ( ६ ) त्यांच्या मूळच्या निकृष्ट भाषां हून श्रेष्ठ ज्या प्राकृत भाषा त्यांच्या द्वारें विचारप्रदर्शन ते करूं लागले. ( ७ ) चोरटेपणा जाऊन संभावितपणा आला. (८) ब्राह्मणां कडून उपाध्येपण करून घेण्याची सवड मिळाली. ( ९ ) वन्यदेवताराधनाच्या ऐवजीं रामकृष्णादि आर्यदेवतांचे उपासकत्व लाभले. ( ९ ) अशी आर्यसंस्कृतीत प्रतिष्ठापना होतां होतां, भक्तिमार्गाच्या सोपानानें कित्येक अंत्यजांना सर्ववर्णवंद्य असें संतपण गांठतां आलें. जातिसंस्थेच्या जादूनें अनार्योत्पन्न अंत्यजांची ही अशी सुधारणा झाली. अंत्यजांच्या वन्यावस्थे पासून सुधारणावस्थे पर्यंतच्या प्रगतीचा हा असा मनोरंजक व आल्हादक इतिहास आहे. तो मनन केला असतां, चातुर्वर्णिकांच्या व विशेषतः ब्राह्मणांच्या नांवानें खडे फोडण्याचे व्रत वृथानिंदक प्रांजलपणे सोडून देतील, अशी नम्र उमेद आहे. ही वृथानिंदा खऱ्या इतिहासाच्या व त्याच्या आधारा वर बांधलेल्या सामाजिक सि-

द्धांताच्या अज्ञानानें झालेली आहे. प्रथम ही निंदा अज्ञ पण कांघावी अशा यूरोपीयन सुज्ञांनी केली. त्यांचें अनुकरण आपल्या इकडील सद्धेतुप्रेरित अश्या मायाळू सुधारकांनी केली. स्वदेशज व परदेशज सुज्ञांनी चालविलेली ही निरर्गल निंदा इतक्या थरास जाऊन पोहोचली की भारतवर्षातील ब्राह्मण ह्मणजे अंत्यजवर्गाचा जन्मोजन्मीचा वैरी ठरला. गेल्या शंभर दीडशे वर्षात असे भासविण्याचा ज्यारीने प्रयत्न चाललेला आहे की, ब्राह्मणक्षत्रियांनी दुष्टबुद्धीने आपल्या च पैकी कांही लोकांना चातुर्वर्णिक समाजसोपानाच्या खाली ढकलून व पराकाष्ठेच्या निकृष्ट स्थितीस पोहोचवून, त्यांच्या हक्कांची अश्रुतपूर्व पायमल्ली केली. महारादि अंत्यज मूळचे उच्च वर्णाचे असून, ब्राह्मणानी दुष्टबुद्धीने त्यांना नीच ठरवून, अनामक, पंचम, अंत्यज, बाह्य, अशी निंदाव्यंजक नावे दिली व त्यांचा स्पर्श हि दूषक गणिला. परंतु, खरा प्रकार ह्या भासाच्या अगदी उलट आहे, हे वरील इतिहासा वरून स्पष्ट आहे. अनार्य स्त्रिया व आर्य शूद्र यांच्या शरीरसंबंधा पासून अंत्यज-संकर उत्पन्न झाले, व संकरांच्या जाति बनवून प्राणहानि न होतां उन्नति करून घेण्याचा मार्ग आर्यानीं अंत्यजांना मोकळा करून दिला, असा खरा प्रकार आहे. यूरोपियनांच्या तावडीत जर हे अंत्यज व अनार्य सांपडते, तर ते अमेरिकन इंडियनांच्या प्रमाणे आज पृथ्वी वरून समूळ नष्ट झाले असते. हिंदुस्थानांत ब्राह्मणादि चातुर्वर्णिकांचा जाणता वर्ण मध्यस्थीस असल्या मुळे, अंत्यजादि अनार्योत्पन्न समाजाचा सामाजिक मृत्यू टळलेला आहे. यूरोपियन व अंत्यज ह्यांच्या मध्यें ब्राह्मणादिवर्ण जर मध्यस्थीस पाचरी दाखल नसते, तर अंत्यजांचा चुराडा होऊन कित्येक शतकें लोटलीं असतीं, हे विधान सिद्ध करण्यास कल्पनाशक्तीची मदत घ्यावयाचें कारण नाही. जेथे ब्राह्मणादींची पाचर मध्ये नाही, अशा यूरोपीयन वसाहतींत मजुरी करण्यास गेलेल्या अंत्यज, मुसलमान व अंत्यजसम मुदतबंद मजुरांचा, यूरोपीयनांच्या जुलमा खाली, मारा खाली, व निर्दयते खाली, कोण धुव्वा उडतो ते ध्यानात घेतले, ह्मणजे वरील विधानाची सत्यता प्रतीतीस येईल.

८ एतद्देशज किंवा बहिर्देशज बाह्यांचा व अनार्यांचा आर्यसमाजांत समावेश कसा होतो, तें वरील परिष्कारा वरून स्पष्ट होते. हिंदुसमाजांत बाह्यांचा व स्वेतराचा समावेश जातिद्वारा होतो. आज पर्यंतच्या एकोनएक समाजशास्त्र्यांचा असा एक स्थूल ग्रह झालेला आहे की, हिंदुसमाजांत बाह्यांचा समावेश बिलकुल होत नाही व हिंदुसमाज हा सर्व बाजूंनीं मढविलेल्या डब्या प्रमाणे लखोटबंद आहे. यूरोपीयन समाजांत बाह्यांचा राजकीय व धार्मिक समावेश व झाला च तर सामाजिक समावेश व्यक्तिशः होतो. तसा व्यक्तिशः किंवा वैयक्तिक समावेश हिंदुसमाजांत होत नाहीं, आणि दुसऱ्या कोणत्या तऱ्हांनी समावेश होऊं शकतो किंवा नाहीं ते माहीत नाही; अशा स्थितींत

हिंदुसमाज बाह्यांना लखोटबंद आहे, असा यूरोपियनांचा समज झाला तो ठीक च आहे. आमचें इतकें च सांगणें आहे की, यूरोपियन समाजशास्त्रयांना हिंदुसमाजाच्या स्वभावाचे व लकबांचें गुह्य कळले नाहीं. जातिसंस्था निर्माण करून, समाजरचना करण्याचा यशस्वी प्रयत्न हिंदूंनीं आज दहा पांच हजार वर्षे केला. तो यूरोपीयन समाजरचनेहून मूलतः सर्व प्रकारें भिन्न असून, परिणामतः हि तितका च भिन्न आहे. जातिद्वारा बाह्यांचे स्वसमाजांत समावेशन करून घेण्याची ही जी हिंदूंची असामान्य पद्धती तिची तुलना यूरोपियनांच्या समावेशन पद्धतीशीं व मुसुलमानांच्या समावेशनपद्धतीशी केली असतां, तिचे गुणदोष उठावदार दिसतात. सबब, तशी तुलना करून दाखवितो.

९ वाटेल त्या रानटी संस्कृतीची रंगाची, शिक्षणाची किंवा शिक्षणाभावाची आणि आचाराची व्यक्ति असो, तिनें मुसलमानी धर्म स्वीकारिला म्हणजे तिचें समावेशन स्वसमाजांत मुसुलमान करून घेतात. त्या मुळे होते काय की, निरनिराळ्या संस्कृतींची, रंगांची व आचारांची मुसुलमानसमाजांत एक च खिचडी होऊन जाते. अशी खिचडी झाल्यानें समाजांत सर्वत्र समता नांदते, असें समाधान अर्धवट सुधारक करून घेण्याचा संभव आहे. परंतु, तें समाधान फार वेळ टिकणारें नसून व्यर्थ व पोकळ आहे. केवळ धर्माच्या सबबी वर उच्च संस्कृतीच्या व्यक्तींची व नीच संस्कृतीच्या व्यक्तींची रहाणें, जेवणेखाणें, कायदा, शरीरसंबंध व आचार यां संबंधानें सरसकट समता ज्या समाजांत मानली जाते व ज्या समाजांत नीच संस्कृतीच्या व्यक्तींची लोकसंख्या उच्च संस्कृतीच्या लोकसंख्येहून बेसुमार अधिकतर असते, त्या समाजांत आरोग्याला उपकारक असे शौचधर्म रसातळास जातात, संसर्गजनक रोगांचा प्रादुर्भाव होतो, उपदंशादि व्याधींनी ग्रस्त झालेली दुर्गुणी प्रजा माजते, कायद्याच्या ऐवजी बेबंदशाहीचें प्राबल्य होतें आणि सदाचारसंपन्नतेचा व विद्येचा लोप होतो. एका च वाक्यांत सांगावयाचें म्हणजे उच्च संस्कृतीचा अशा समाजांत विध्वंस होतो. अल्जीरिया–मोरोक्को पासून चीना पर्यंत जो मुसुलमान समाज पसरला आहे त्याची शहरें खेडीं व घरें गलिच्छपणाची आगरे आहेत, असे प्रवाशी सांगतात. हिंदुस्थानांतल्या शहरांतील मुसुलमानवाडे हिंदूंच्या पेठां हून गलिच्छतर असतात, हे सर्वत्र महशूर आहे. कायद्याला झुगारून दुर्बल दंगेखोरपणा करण्या विषयी सर्व मुसुलमान देश कुप्रसिद्ध आहेत. पृथ्वीच्या पाठी वरील इतर सर्व देशां पेक्षां, मुसुलमान देशांत उपदंशाचा विकार अधिकतर प्रमाणानें आढळेल, असा अंदाज आहे. विद्येच्या क्षेत्रांत, तर अभिनव व अपूर्व शास्त्रीय शोध करणारी व्यक्ति मुसलमान समाजांत पंधराशें वर्षांत नांव घेण्या सारखी एक हि सांगतां येण्या जोगी नाहीं. विद्येच्या कामीं मोठ्यांतली मोटी कामगिरी जी मुसुलमानांनीं केली ती ही होय कीं ग्रीस व

हिंदुस्थान यांतील शास्त्रीय शोधांचा व कलांचा आधुनिक यूरोपांत सात आठ शें वर्षां पूर्वीं त्यांनीं प्रसार केला. तात्पर्य, जगाच्या ज्ञानांत, आचारांत, शौचधर्मांत, व राजधर्मनिर्मितीत कोणती हि अपूर्व पदवी मुसुलमान लोकांनीं आक्रमण केली, असें विधान प्रांजलपणें करतां येण्या सारखें नाहीं. वाटेल त्या संस्कृतीच्या माण-सांचा स्वसमाजांत समावेश केल्या मुळें, मुसुलमान समाज मानवहित साधण्याच्या व स्वसमाजहित साधण्याच्या कार्यात अगदीं दुर्बल ह्मणून प्रख्या पावलेला आहे. सध्यां तर मुसुलमान समाज इतक्या नीचतर पदवीस पोहोंचला आहे कीं, इतर सुधारलेल्या, शास्त्रसंपन्न व शुचिर्भूत देशांची गुलामगिरी करण्या पलीकडे येणाऱ्या हजार बाराशें वर्षें त्याला गत्यंतर नाहीं. नीच बाह्यांचें सामाजिक समावेशन त्या समाजांत इतक्या थोरल्या प्रमाणांत झालेलें आहे कीं, समावेशन करण्याच्या श्रेष्ठतर पद्धती यद्यपि त्या समाजानें या पुढें अंगीकारिल्या, तत्रापि आहेत त्या नीच बाह्यांची सुधारणा करण्यांत त्याला येणारी हजार वर्षें पुरणार नाहींत.

१० बीजक्षेत्रशुद्धि, वंशशुद्धि, रंगशुद्धि किंवा समानसंस्कृति, ह्या सर्व बाबींना धाब्यावर बसवून, वाटेल त्या व्यक्तींचे सरमिसळ सामाजिक समावेशन केल्या मुळें, मुसुलमान समाजाची प्रगती न होतां पिछेहाट झाली. आधुनिक यूरोपियन समाज असे सरसकट सामाजिक समावेशन करीत नाही. सामाजिक समावेशनाच्या बाबतींत रंगशुद्धी कडे तो समाज असाधारण लक्ष्य देतो. मुसुलमानी समावेशनाला जर सरमिसळ समावेशन ह्मटले, तर यूरोपीयन समावेशनाला निवडक समावेशन हें नांव यथार्थ होईल. इंग्रज समाज, फ्रेंच, जर्मन, नॉर्स, स्वीड, स्विस, इतालियन, ग्रीक, रशियन, हंगारियन, वगैरे पांढऱ्या रंगाच्या लोकांशीं शरीरसंबंध करतो; परंतु, नीग्रो, चिनी, जपानी, तुर्की, या बेरंगी लोकां-शीं शरीरसंबंध करण्याला व ह्या लोकांचे स्वसमाजांत सामाजिक समावेशन करून घेण्याला तो अनेक कारणा स्तव राजी नसतो. बेरंगी लोकांचें सामाजिक समा-वेशन न करण्यास मुख्य कारण असमान किंवा विषम संस्कृति हें होय. विषम संस्कृतीच्या ह्मणजे निकृष्ट किंवा भिन्न संस्कृतीच्यां लोकांचे सामाजिक समावेशन करून घेतलें तर स्वसमाजाच्या आचारांत, विचारांत, राजकारणांत, विद्येंत, शास्त्रांत, कलांत व चेहऱ्यांत विलक्षण फेरफार होऊन, समाज विस्कळित होईल, ही भीती यूरोपीयन समाजाला वाटते. ह्या भीतीचें उत्कट रूप खुद्द यूरोपांत इतकें भासमान होत नाहीं. कारण, यूरोपियनेतर बाह्याचा प्रवेश यूरोपीयन देशांत होण्यास बिलकुल अवकाश नाहीं. ते ते यूरोपियन देश स्वदेशज एकजि-नशी लोकसंख्येनें इतके गच्च भरून गेले आहेत कीं बाह्यांना पाय ठेवण्याला तेथें रीघ नाहीं. ह्या भीतीचें उत्कट रूप अमेरिकेंत चांगलें भासमान होतें. त्या खंडांत वसाहत करण्यास अद्याप हि हवी तितकी जागा आहे. तत्राप, यूरोपीय-

तर चिनी, जपानी, आफ्रिकन, तुर्की, व हिंदू लोकांना अमेरिकेंतील यूरोपीयन
ाक नुसते बद्धमूल होऊं देत नाहींत, मग सामाजिक समावेशनाचें नांव कशाला?
ास्त्रें, कला व राजकारण या बाबींत जपानी लोक अमेरिकनांच्या बहुतेक बरोबरीचे
लीकडे झालेले आहेत. परंतु त्यांना हि यूनायटेड् स्टेटस् मध्यें वसाहत करण्यास व
रोपीयनांशीं शरीरसंबंध करण्यास मज्जाव च आहे. कारण, वंशैक्य व रंगैक्य व
पैक्य नाहीं. आपण हिंदू तर निर्भेळ आर्यत्वाचे गड्डे आहों. परंतु, युनायटेड् स्टेट्स्
ध्यें किंवा कानडांत आपल्या चार माणसांनी हि कायमची वसाहत केलेली
पत नाहीं. येथे वंशैक्य आहे, रूपैक्य आहे व कित्येक शिखांच्या बाबतींत तरी
ट च रंगैक्य आहे. असें असून हिंदूंची भीति कां वाटते? तर, हिंदूंची संख्या
ीच झाल्यास समाजाचा एकजिनसीपणा जाऊन, आचारांत, विचारांत, राजका-
णांत व समाजकारणांत अनिष्ट फेरफार होतील व नसत्या भानगडी उपस्थित
तील. आणि ही भीति कांहीं अन्याय्य नाहीं. सामाजिक समावेशनाची जी
यत्तिक पद्धती तिच्या खेरीज अन्य पद्धती जों पर्यंत यूरोपियन समाज अवलं-
णार नाहीं, तों पर्यंत त्या समाजाला समान संस्कृतीच्या बाह्यांचें तर भय वाटत
हील च, परंतु निकृष्ट संस्कृतीच्या बाह्यांचे हि भय वाटण्याचें सुटणार नाहीं.
शा दुहेरी पेंचांत, समान संस्कृतीच्या लोकांस मज्जाव करणें व निकृष्ट संस्कृ-
ीच्या लोकांचा समूळ उच्छेद करणे किंवा त्यांना गुलामगिरींत किंवा गुलाम-
ारीसारख्या स्थितींत डांबून ठेविणें, हे दोन मार्ग च तेवढे यूरोपीयन समाजाला
ुले रहातात. ह्या हून तिसरा मार्ग अद्याप यूरोपियनांना व अमेरिकनांना सुचला
ाहीं, व बरी च शतकें सुचण्याचें कारण नाहीं. कां की, निवडक सामाजिक
मावेशनानें, समाजाला अंतस्थ एकजिनसीपणा येऊन, अपूर्व विद्या, अपूर्व कला,
ापूर्व शोध, अपूर्व शौचधर्म, अपूर्व संपत्ति व अपूर्व ऐश्वर्य ह्यांची जोड त्यांना
ाली आहे. त्या लाभा प्रीत्यर्थ कित्येक रानटी समाज नष्ट करून अर्धवट सुधार-
ले अनेक समाज यूरोपियनांनीं आपलें दास्यकर्म करण्यास लाविले आहेत.
नटीपणा व कमतर संस्कृती हे ज्यांचे अक्षम्य अपराध त्या समाजांना उच्छिन्न
रण्यांत व दास करण्यांत यूरोपीयनांना कांहीं च खंती वाटत नाहीं. दया, धर्म,
र्वा भूती समवृत्ति, वगैरे सद्गुण बाह्यांशी वर्तन करतांना यूरोपीयन समाज पार
ागारून देतात. तात्पर्य, निवडक सामाजिक समावेशनानें समाजाला एकजिनशी-
णा येऊन यद्यपि अपूर्व ऐश्वर्याचा लाभ होतो, तत्रापि समाजांत दयादाक्षिण्यादि
ात्विक गुणांच्या अभावाचा करंटपणा बेताल बोकाळतो व ख्रिस्ताच्या सार्वलौकिक
ातृभावाचें वाटोळें होतें. अधूनमधून फ्रेंच समाजक्रांतीसारखे सात्विकतेचे
रोपियन समाजाला झटके येतात, परंतु, परस्वापहरणबुद्धी पुढे त्या सात्विकतेचें
ातेरें होतें. सद्यःकालीं तर, बाह्यांशीं व्यवहार करतांना यूरोपियनांचे ठाईं

सात्विकता औषधाला हि राहिली नाहीं. वैयक्तिक व निवडक सामाजिक समावेशनाचा रस्ता धरल्याचा हा तामस व राजस परिणाम आहे.

११ ह्या मुसुलमानी व यूरोपीयन उर्फ ख्रिश्चन सामाजिक समावेशनांशीं आतां हिंदू समावेशनाच्या पद्धतीची तुलना करूं. अखिल मानववंशांशी ज्याच्या त्याच्या योग्यते प्रमाणें समबुद्धीनें वागावें, ही आर्यांची पुरातन काला पासून पहिली नीती आहे. आपण उच्च संस्कृतीला पोहोंचून इतर निकृष्ट समाजांना हि आपण गांठलेल्या संस्कृतीस गांठण्याच्या मार्गाला लावून द्यावयाचें, ही आर्यांची दुसरी नीति आहे. जवळ आलेल्या कोणत्या हि समाजाचा वंश, रूप, रंग, इत्यादि सबबी वर, द्रोह करावयाचा नाहीं, त्याला हिंस्रबुद्धीनें ठार करावयाचे नाही, व त्याला दास बनवावयाचें नाहीं, ही आर्यांची तिसरी नीति आहे. आणि शेजारास आलेल्या समाजा पासून आपली बीजक्षेत्रशुद्धि भ्रष्ट होऊन, आपला वंश रूप व वर्ण ह्यांच्यांत वैगुण्य येऊं द्यावयाचे नाही, ही आर्यांची चवथी नीति आहे. ह्या चतुष्पथ नीतीच्या बला वर स्वसमाज, स्ववंश व स्वसंस्कृति शुद्ध राखून आर्यांनीं स्वतःच्या वर्णांच्या व संकरांच्या जाति बनवून अनार्यांच्या व अनार्य संकरांच्या हि जाति बनविल्या. आपापली संस्कृति घेऊन व आपापल्या जातींत सुखानें व समाधानानें राहून, आपापली उन्नति, यथाशक्ति व यथावकाश करीत रहावें, असा शिलशिला आर्यांनीं घालून दिला. ह्या जातिसंस्थेचे फायदे खालील प्रमाणें आहेत. ( १ ) मुसुलमानांच्या प्रमाणें आपला धर्म स्वेतर बाह्यां वर जुलमानें लादण्याची व स्वतःचा समाज दुर्बल करून घेण्याची जरूर रहात नाही. ( २ ) यूरोपियनां प्रमाणें बाह्यांचा समूळ उच्छेद करण्याची किंवा बाह्यांना साक्षात् गुलाम किंवा गुलामवजा बनविण्याची आपत्ति ओढवत नाहीं. ( ३ ) बाह्यांना आपले देवधर्म सोडावे लागत नाहींत. ( ४ ) बाह्यांना आपले आचार विचार मनसोक्त पाळतां येतात. ( ५ ) बाह्यांना आपली भाषा सोडून देणें भाग पडत नाहीं. (६) बाह्यांना आपल्या गणगोतास मुकावें लागत नाही. (७) बाह्यांची बीजक्षेत्रशुद्धि यावज्जाति जशी ची तशी रहाते. (८) बाह्य शेजारी राहून, आर्यांना आपल्या विद्येत, शौचधर्मात, शास्त्रांत, कलांत व संस्कृतीत अप्रतिबद्ध प्रगती साधतां येते. ( ९ ) जातिबद्ध सर्व समाजांत सौख्य, स्थैर्य व समाधान नांदतें. ( १० ) आर्यसंमतीनें बाह्यांची आस्तेआस्ते बिनबोभाट व विना सायास उन्नति होते. (११) रानटीपणाचा शिक्का जाऊन, बाह्यांची कालान्तराने हिंदुत्वांत गणना होते. जातिसंस्थेच्या मुशीत घालून, बाह्यांचा समावेश आर्य आपल्या समाजांत जो करून घेतात तो यूरोपियन किंवा मुसुलमानी समावेशाहून दयादि गुणांनीं वरचढ आहे, हें वरील तुलना पाहून, कोण्ही हि प्रांजल माणूस कबूल करील. हिंद्वितर जे एतद्देशज व बहिर्देशज अहिंदू त्यांच्या जाति बनवून दिल्या मुळें, हिंदुसमाजाचें हि मोठें हित झालेलें आहे. कसें तें पुढील कलमांत नमूद करतो.

१२ गेल्या आठ दहा हजार वर्षांत असुर, बाबिलोनियन, मिसर, शक, यवन, रोमन, क्रिर्मिर, क्रौंच, वगैरे अनेक समाज पृथ्वीच्या पाठीवर राज्यादि उपभोग घेऊन अस्तंगत झाले व नामशेष उरले. हे समाज नष्ट कां झाले ? हे समाज अजीबात नष्ट होण्याचे खरें कारण लढायांत पराजय, किंवा साथीचे रोग किंवा सद्दीची वक्रदृष्टि ह्या पैकीं एक हि नसून ह्यांच्या नाशाचे खरे कारण ह्या लोकांतील सामाजिक समावेशनाची पद्धती आहे. हे लोक वाटेल त्या बाह्य समाजाशी शरीरसंबंध करीत व वाटेल त्या बाह्य समाजास स्वसमाजांत वावरूं देत. त्या मुळें, ह्या समाजांतील वंशशुद्धि भ्रष्ट होऊन, मूळचे जाज्वल्य गुण—की ज्यांच्या जोरावर ह्यांनी राज्यें उभारली—बाह्यांच्या बेसुमार मिश्रणानें फिके व विरल झाले. हें गुणवैरल्य इतक्या थोरल्या प्रमाणावर झालें की बाह्य व बाह्यज संकर ह्यांच्या गर्दींत मूळची गुणी प्रजा वितळून गेली. आणि ती इतकी निखालस वितळून गेली कीं नांवा खेरीज तिचें मूर्त रूप राहिले नाहीं. अशी नामशेषता आर्यावर्तांतील आर्यांच्या वाट्यास आली नाही, हे जगजाहीर आहे. आर्यां जवळ अशी कोणती जडीबुट्टी होती कीं जिच्या जोरावर ते आज आठ दहा हजार वर्षे समाजरूपाने जसे चे तसे कायम आहेत ? ही जडीबुट्टी दुसरी तिसरी कोणती हि नसून आर्यांनीं शोधून काढिलेली जातिसंस्थेची कल्पना होय बाह्यांचे नियमन जातिसंस्थांत केल्याने, बाह्यांच्या बीजक्षेत्राचें मिश्रण आर्यसमाजांत होत नाही. आर्यसमाजात राज्यसंस्था जेव्हां प्रबल, समर्थ व कर्तृत्ववान् असते, तेव्हां बाह्यांच्या संसर्गा पासून आर्यांच्या बीजक्षेत्राला इजा पोहोचणें शक्य च नसते. अशा ऐश्वर्याच्या काली जातिसंस्थेचें महत्व जसे ठळकपणें ध्यानांत यावें तसें येत नाहीं. आर्यवंश, आर्यसंस्कृति व आर्यविद्या प्रबल राजसंस्थेच्या बला वर टिकल्या कीं जातिसंस्थेच्या बलावर टिकल्या, याचा निर्णय ऐश्वर्यकालीं नीटसा करतां येत नाही. जातिसंस्थेच्या उपयुक्ततेची खरी परीक्षा, राजसंस्था विछिन्न होऊन आर्यसमाजाचे ऐश्वर्य जेव्हां लोप पावतें तेव्हां उत्तमोत्तम होते. स्वतंत्र राज्यसंस्था समूळ नष्ट झाली, तत्रापि हि जातिबद्ध आर्यसमाज बहुतेक ऐश्वर्यकालच्या इतका च सुरक्षित व अभंग रहातो. असा प्रकार, आर्यसमाजाचें राज्ययंत्र बाह्यांच्या हातीं अनेक वेळा गेलें असतां हि, अनुभवास आला आहे. राज्ययंत्र परकीयांच्या ताब्यांत गेलें असतां, इतर समाज नष्ट व नामशेष झालेले आहेत. परंतु, अशा दुःस्थितींत आर्यसमाज टिकून रहातो. दोन हजार वर्षां पूर्वी शक, यवन, मेद, पारसीक, यांच्या हातात आर्यसमाजांतील राज्ययंत्र गेले होते. त्या संकटांतून जातिबद्ध आर्यसमाज सुरक्षित व शाबूत बाहेर पडला. सात शे वर्षां पूर्वी आर्यसमाजाचें राज्ययंत्र मुसुलमानांच्या हातांत गेले. त्या हि आपत्तींतून जातिबद्ध आर्यसमाज शाबूत निघाला. सध्यां इंग्रजांच्या हातीं हिंदुसमाजाचे राज्ययंत्र गेलेलें आहे. ह्या हि प्रसंगांतून हिंदुसमाज सुरक्षित बाहेर पडावयाचा जर

असेल व अजीबात नष्ट व्हावयाचा नसेल, तर तें हि श्रेय हिंदुसमाजाच्या जातिबद्धतेला च द्यावे लागेल. अशी ही जातिसंस्था आज पर्यंत आठ दहा हजार वर्षे आपल्या अत्यन्त उपयोगी पडली आहे. बुद्धिभ्रंश होऊन, ह्या बहुगुणकारी संस्थेचा जर आपण साहसानें त्याग केला, तर इतर प्राचीन व आर्वाचीन समाजां प्रमाणे च आपल्या वंशाचा, संस्कृतीचा, आचाराविचारांचा व समाजाचा हि नाम-शेषत्वा पर्यंत विध्वंस होईल.

१३ परकीय बाह्यांशीं शरीरसंबंध न करूं देणाऱ्या जातिसंस्थेचें हें समाज-रक्षणाचें कार्य पृथ्वी वरील इतर जातिबद्ध समाजांत हि दृष्टचत्पत्तीस आलें आहे. असे जातिबद्ध समाज ह्मटले ह्मणजे यहुद्यांचा व पारशांचा. पालेस्तैनांतील यहु-द्यांचें राज्ययंत्र रोमन लोकांच्या हातीं जाऊन व त्याची स्वदेशांतून पृथ्वीच्या पाठीवर सैरावैरा उचलबांगडी होऊन, आज दोन हजार वर्षे झाली. तत्रापि बाह्यांशीं शरीरसंबंध न ठेऊं देणाऱ्या जातिसंस्थेचा आश्रय केल्या मुळे, नांव सांगा-वयाला स्वदेश नसतां व संरक्षण करणारें स्वराज्य नसतां, यहुद्यांची निर्भेळ जात अद्याप यहाव्हाची करुणा भाकतांना देशोदेशीं मूर्तिमंत दृष्टीस पडते. पारशांचा देश गेला व स्वराज्य गेलें, परंतु हिंदूच्या संसर्गानें व स्वतःच्या नैसर्गिक मनोरच-नेने प्रोत्साहित होऊन जातिसंस्थ झाल्या मुळें, जरदुष्ट्राची संस्कृती अद्याप हि जीव धरून आहे. ह्या दोन दाखल्या वरून जातिसंस्थेत काय सामर्थ्य आहे ते स्पष्ट होतें.

१४ जातिसंस्था आपत्कालीं स्वसमाजसंरक्षण करण्यास उपकारक होते, हें वरील उदाहरणा वरून प्रत्ययास येते. संपत्काली जातिसंस्थेचें कार्य काय, याचा तपशिल मागें बराच दिला आहे. तत्रापि, एक बाब त्या तपशिलांत द्यावयाची राहिली आहे. ती ही की, संपत्काली जातिसंस्था परसमाजाचें संरक्षण करत्ये. संपत्काली आर्यांना जे अनार्य बाह्य समाज भेटले त्यांचा सत्यानाश, मनांत दुष्ट-बुद्धि असती तर, युरोपीयनांनीं अमेरिकन इंडियनांचा जसा केला तसा, आर्यांना खचित करता आला असता. परंतु असलें अमानुष कृत्य न करतां, आर्यांनी अनार्यां वर जातिसंस्थेचें गरम पांघरूण घातलें आणि त्यांच्या संस्कृतीचें व समा-जाचें संरक्षण केलें. सारांश, आपत्काली स्वसमाजसंरक्षण व संपत्कालीं परसमाज-संरक्षण, अशीं दोन कार्यें जातिसंस्था साधते.

१५ जातिसंस्था आपत्कालीं व संपत्कालीं उपकारक होते, जातिसंस्था निकृष्ट समाजांना मारक न होतां तारक होते, वगैरे जातिसंस्थेचे सुष्ट गुण यद्यपि एकवार कबूल केले, तत्रापि जातिसंस्थेने समाजाला मांद्य येते, त्याच्या आंगी स्थितीस्थापकत्व रहात नाही व समाजाची प्रगति व उन्नति होत नाही, इतकें च नव्हे तर, हजारो वर्षां पूर्वी जी बरीवाईट स्थिति असते ती च हजारों वर्षांनंतर तशी च कायम रहाते, वगैरे आक्षेप जातिसंस्थे वर घेतलेले सर्वांच्या पहाण्यांत

आहेत. जातिसंस्थ समाज आपल्या ठिकाणीं सारखे कुजत व कुचंबत पडलेले असतात, हें दूषण यूरोपीयन लोकांनी गेली तीन शे वर्षे हिंदुसमाजाला लावलेलें सर्वांच्या परिचयाचें आहे. तेव्हां, ह्या आरोपांत कितपत तथ्य आहे, तें पाहिलें पाहिजे. हिंदुस्थानांत शुद्ध आर्य जाती, आर्य संकर जाती, आर्यानार्य अंत्यज जाती व शुद्ध अनार्य जाती, असे जातींचे चार वर्ग आहेत. पैकीं प्रत्येक वर्ग गेल्या दोन अडीच हजार वर्षांत कितपत प्रगत किंवा प्रतिगत होता, ते पाहूं. शुद्ध आर्य जातींतील ब्राह्मणां कडे शास्त्राध्ययन व शास्त्राध्यापन हे काम असे. व्याकरणशास्त्र, न्यायशास्त्र, पूर्वमीमांसाशास्त्र, वेदान्तशास्त्र, अलंकारशास्त्र, गणितशास्त्र,, ज्योतिषशास्त्र, रसायनशास्त्र, धर्मशास्त्र, वैद्यक, इत्यादि शास्त्रांत शक बारा शें पर्यंत जातिबद्ध ब्राह्मणांनीं मोठे अपूर्व शोध केलेले सर्वप्रसिद्ध आहेत. शुद्ध आर्यजातींतील क्षत्रियां पैकीं कंबोजोत्पन्न कुरूनें (ज्यास इंग्रज Cyrus ह्मणतात) यूरप पासून पंजाबा पर्यंतचा प्रदेश आपल्या साम्राज्यांत आणिला. ह्या कुरूला असुरांच्या इष्टिकालेखांत कंबुजीय ह्मणून ह्मटलेलें आहे. तदनंतर चालुक्य, राष्ट्रकूट, उत्तरचालुक्य, यादव, गुप्त, परमार, इत्यादि क्षत्रियकुलांत मोठमोठे पराक्रमी चक्रवर्ती राजे शक १२०० पर्यंत होऊन गेले. ह्या च कालांत कुबेरतुल्य वैश्याधिपतींनीं सर्व पृथ्वी भर आपल्या व्यापाराचें जाळें पसरिले होतें, आणि शुद्ध आर्यशूद्र हे ह्या तिन्ही आर्य जातींचे विश्वासुक सेवक होते. अपूर्व शास्त्रीय शोध करणें, मोठमोठीं साम्राज्यें उभारणे व सर्व पृथ्वीचा व्यापार नियंत्रिणे हीं तीन कृत्ये करणाऱ्या शुद्ध आर्य जातीवर मांद्याचा व अप्रगततेचा आरोप करणे खचित शोभणार नाहीं. शुद्ध आर्य संकरजातीं कडे उद्योगधंदे व कलाकुसरीचीं कामें असत. त्या धंद्यांतील व कलाकुसरींतील उत्कृष्टतेची व प्रगतीची साक्ष शक बारा शे पर्यंतचीं लेणीं, देवालये, मूर्ती, जयस्तंभ, स्तूप, संध्यामठ, अलंकार, भांडी, उपकरणीं, कापडें, किल्ले, कोट, गढ्या, घाट, ताम्रपत्रे, शिलालेख वगैरे अद्याप हि प्रत्यक्ष व ग्रंथोल्लेखद्वारा देत आहेत. ज्या संकरजातींतील शिल्प्यांनीं असलीं आश्चर्योत्पादक सृष्टि निर्माण केली, त्या संकरजाती वर मांद्याचा आरोप अंध व धूर्त ह्यां खेरीज इतर कोणी प्रांजल मनुष्य करूं धजणार नाहीं. आनार्योत्पन्न संकरजातीं कडे त्यांच्या मगदुराला व स्वभावाला साजतील असे अशुची धंदे दिलेले होते. ते धंदे करतां करतां त्यांचे अनार्यत्व आस्ते आस्ते लोप पावून पूर्ण हिंदुत्वाची पदवी त्यांनीं शक १२०० पर्यंत गांठली. रानटीपणांतून सुधारलेल्या अवस्थेंत येणाऱ्या व आलेल्या ह्या आर्यानार्य अंत्यज जातीस मंदगति कसें ह्मणतां येईल? राहतां राहिल्या शुद्ध अनार्य जाती. यांची रानटी स्थिती यद्यपि अद्यापि बरी च राहिली आहे, तत्रापि ह्या हि जाती शेतकी वगैरे उच्च धंदे करूं लागल्या आहेत. आर्यांच्या संगतीनें ह्या हि अनार्य जाति आस्ते

आस्ते प्रगती करीत आहेत. खरें पहातां, त्यानीं साधिली ही च प्रगती आश्चर्यकारक आहे. आस्ट्रेलिया, पाटेगोनिया, मध्य आफ्रिका, वगैरे खंडांतील यूरोपियनांच्या संसर्गास ज्या रानटी जाति आहेत त्याच्या मानाने हिंदूंच्या शेजारास असलेल्या अनार्य जाती खरोखर च भाग्यवान् समजल्या पाहिजेत. यूरोपीयन संसर्गाची बाधा होऊन आस्ट्रेलिया, अमेरिका व आफ्रिका यांतील रानटी समाज कित्येक नष्ट झाले, कित्येक क्षीण झाले व कित्येक गुलाम झाले. तें दुर्भाग्य हिंदुस्थानांतील अनार्यांच्या वांट्यास न येतां, आस्ते आस्ते मगदुराप्रमाणें प्रगतीचा मार्ग क्रमण्यास त्याना इतरत्र अश्रुतपूर्व अशा सवलती हिंदूंच्या दयाभूतपणाने मिळाल्या आहेत. अशा ह्या बाराव्या शतकापर्यंतच्या जातिसंस्थ हिंदूसमाजाला मंद व मृत कोणत्या तोंडाने ह्मणावे ?

१६ हिंदूसमाज मंद व मृत किंवा मुमूर्षुवत् जो दिसूं लागला तो शक बारा शे च्या पुढील काळांत लागला. उत्तरहिंदुस्थानांत शक हजार पर्यंत व दक्षिणहिंदुस्थानांत शक बारा शे पर्यंत सर्व समाज जातिबद्ध होता. तदनंतर जातिसंस्थ नसलेल्या आयुधजीवी मुसुलमान संघांची हिंदुस्थानांत प्रवेशना होऊन कायमची स्थापना झाली. जातिसंस्थ हिंदूसमाजाच्या देशांत, खरे पहातां, अजाति मुसुलमानांची कायमची स्थापना होणे अशक्य असावयास पाहिजे होती. कारण, जातिरूप धारण केल्या शिवाय, कोण्या हि बाह्याला हिंदूदेशांत कायमची रहाण्याची सोय नसे. असा दंडक असतां, मुसुलमानधर्मी आयुधजीवी संघांची कायमची स्थापना हिंदुस्थानांत कशी झाली ? हा सामाजिक प्रश्न सोडविण्यास, ह्या संघांचा पूर्वेतिहास लक्ष्यांत घेतला पाहिजे. पर्श्वादि आयुधजीवि संघांचा पाणिनीनें आपल्या सूत्रांत उल्लेख केला आहे. शकयवनादींचा उल्लेख कात्यायनानें आपल्या वार्तिकांत केला आहे. नंतर पल्हव. पारसीक, मेद, इत्यादि आयुधजीवि संघांचा उल्लेख शिलाताम्रपट व नाणी यांत येतो. ह्या पर्शु, शक, यवन, पल्हव, मेद, पारसीक, वगैरे आयुधजीवी संघांचा सुळसुळाट भारतवर्षांत नंदांच्या राजवटी नंतर इतका झाला कीं, मौर्यांच्या राशियतीच्या अंतास, ह्या पैकीं कित्येकांनीं पश्चिम, मध्य व उत्तरपश्चिम हिंदुस्थानांत राज्यें केलीं. हे आयुधजीवी संघ हिंदुस्थानांत प्रथम भाडोत्री शिपाई ह्मणून आणिले गेले. ह्या भाडोत्री शिपायांच्या संघांना स्वतःची शक्ति कळून आल्यावर राज्ययंत्राचा ताबा त्यांनी सहज च घेतला. नंदांच्या कालीं क्षत्रियांचा निःपात करण्याच्या कामी ह्या आयुधजीवी संघांचा उपयोग क्षत्रियेतर नंदमौर्यादि राजांनी करून घेतलेला असावा, असा माझा तर्क आहे. कारण, क्षत्रियां खेरीज दुसरी लढवय्यी जाति हिंदूसमाजांत त्या काली नव्हती. क्षत्रियांची जाति हतबल झाल्यावर चंद्रगुप्तादि पराक्रमी वृषलांच्या व्यवस्थित अमदानींत ह्या आयुधजीवी संघांनीं विशेष गडबड केली नाहीं.

वृषल ह्मणजे शूद्र जे मौर्य त्यांचे तेज जसजसे पुढें लोपत चाललें, तसतसी ह्या संघांनीं उचल करून शेवटीं राज्ययंत्रांचें आक्रमण केलें. ह्या च सुमारास दक्षिणेंत आंध्रभृत्य ऊर्फ शातवाहन यांचा उदय होऊन, शकयवनादि आयुधजीवी संघांच्या राजांचें शातवाहनांच्या हस्तें उच्चाटण झालें. आयुधजीवी संघांच्या राजवटींत चातुर्वर्ण्याला बराच धक्का बसला. त्याचें निर्मार्जन शातवाहनांनी केलें. आपण चातुर्वर्ण्याची पुनः संस्थापना केली, अशी प्रौढोक्ति एका पराक्रमी शातवाहन राजानें केलेली शिलालेखांत नमूद आहे. शातवाहनांचें तेज कांहीं कालानें शकाच्या दुसऱ्या शतकांत फिके झाल्यावर, शक, हूण, पल्हव वगैरे आयुधजीवी संघांनीं पुनः उचल करून सुमारें तीन शें वर्षें ह्या देशांत अराजक माजविलें. ह्या आयुधजीवीसंघोत्पन्न अराजकाचा मोड शकाच्या चवथ्या पांचव्या शतकांत उत्तरेस गुप्तांनीं व दक्षिणेस चालुक्यांनी करून, पुनः हिंदुस्थानांत चातुर्वर्ण्याची घडी बसविली. इतक्यांत शातवाहनशकाच्या साहाव्या शतकांत महमदानें जो मुसुलमान धर्म काढिला त्याचा अंगीकार शक, पल्हव, पारसीक, मेद, कंबोज, बाल्हीक, वगैरे लोकांनीं केला. मोगल, पठाण, इराणी, अफगान, वगैरे सर्व मुसुलमान ह्या शक, पल्हव, बाल्हीक, मेद, पारसीक, कंबोज, वगैरे आयुधजीवी संघाचें वंशज होत. तात्पर्य, मुसुलमान ह्मणजे दुसरे तिसरे कोणी अज्ञातपूर्व लोक नसून धर्मान्तर केलेले पूर्वीचे शकयवनादि आयुधजीवि संघ च होत. ह्या आयुधजीवी संघांना चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, वगैरे राजे आपल्या सैन्यांत ठेवीत. यवनादि म्लेंछ लोकांच्या पलटणांचा व मशिदींचा उल्लेख साहाव्या शतका पासून तेराव्या शतका पर्यंतच्या कित्येक संस्कृत ग्रंथांत व शिलालेखांत केलेला आढळतो. हिंदु राजांच्या सैन्यांत राहिलेल्या ह्या आयुधजीवी मुसुलमान संघांना आपली स्वतःची शक्ति कळून येऊन, अन्योन्य मत्सरानें ग्रस्त झालेल्या उत्तरहिंदुस्थानांतील व दक्षिणहिंदुस्थानांतील क्षत्रियां पासून त्यांनीं ह्या देशांतील राज्ययंत्र हिरावून घेतलें. मुसुलमान संघांचा असा हा स्थूल पूर्वेतिहास आहे. हे संघ या देशांत अकराव्या बाराव्या शतका पर्यंत कायमचे राहिले च नाहींत. भाडोत्री शिपाईपणा करण्याची त्यांची हंगामी वृत्ति असे. अर्थात् ग्रामसंस्थांत किंवा नगरसंस्थांत कायमची वृत्ति मिळून जातिरूपानें हिंदूसमाजाचा अवयव बनण्यास ह्यांना बराच काल कारण च पडले नाहीं. हें संघ सैन्याच्या कटकांत रहात व ह्यांची वसती हिंदुस्थानांत हंगामी आहे, अशी समजूत होती. हे हंगामी आयुधजीवी संघ अंतस्थ यादवीच्या प्रसंगीं राज्ययंत्र काबीज करतात, ह्याचा अनुभव आर्यांनां यद्यपि दोन चार वेळा आला होता, तत्रापि अन्योन्यमत्सराच्या आवेशांत ही बाब आर्यक्षत्रिय विसरून जात. ह्या मत्सरोत्पन्न स्मृतीभ्रंशा मुळें, हंगामी मुसुलमानांची ह्या देशांत राज्ययंत्र काबीज केल्या वर, कायमची वसती झाली. ह्या कायमच्या वसतीचा

परिणाम शक अकरा शें पासून शक सोळा शें पर्यंत उत्तर हिंदुस्थान व शक बारा शें पासून शक पंधरा शें पर्यंत दक्षिणहिंदुस्थान अनुभवीत होते.

१७ पर्श्वसुरशकयवनोत्पन्न असे जे हे अरब, इराणी, मोगल वगैरे मुसुलमान त्यांच्या स्वभावांत व कृतींत महंमदाचा धर्म स्वीकारल्या मुळें मोठें स्थित्यंतर झालें होतें. असुर्या देशांतील जे असुर लोक त्यांची संस्कृती व स्वभाव त्यांच्या इष्टिकालेखां वरून कळून येतो. हे असुर लोक पराकाष्ठेचे क्रूर व निर्दय असत. हस्तगत झालेल्या शत्रूंचे डोळे काढणें, दांत उपटणें, कातडी सोलून काढणें, वगैरे अमानुष प्रकार ह्या लोकांत असत. महमद ज्या अरब लोकांत जन्मला त्या लोकांनी ही असुर संस्कृती व हा असुर स्वभाव पूर्णपणें आत्मसात् करून घेतलेला होता. पश्चिम आशियांतील ज्या ज्या समाजानें महंमदाचा धर्म स्वीकारिला, तो तो समाज ह्या असुर संस्कृतीनें कमजास्त भिनून गेला. असे हे मुस्लिम धर्म स्वीकारलेले लोक हिंदूसमाजांत जात न बनवितां जेव्हां कायमचे राहिले आणि त्यांच्या हातीं सर्व राजसत्ता जेव्हां गेळी, तेव्हां हिंदूंच्या विद्या, कला, धर्म, शास्त्रे, व शिल्पें हीं सर्व स्तब्ध, मलिन, व छिन्नभिन्न झालीं. बाह्य असा जो जातिसंस्थाविहीन मुसुलमान समाज त्याशीं झगडतां झगडतां, विद्या, कला, शास्त्रे व शिल्पें ह्यांची प्रगती करण्यास आर्यसमाजास अवकाश च मिळाला नाहीं. ह्या मुसुलमान काळांत हिंदूसमाज मंद, मुमूर्षू व स्तब्ध असा दिसूं लागला. एतत्संबंधक विस्तार ज्यांस पहावयाचा असेल त्यांनीं तो रामीरामदास व रामदास ह्यांच्या लेखांत पहावा. हिंदूसमाजांत ही विद्यादिक्षेत्रांत मंदता व स्तब्धता जी आली ती मुसुलमानी उत्पाताचा परिणाम आहे, जातिसंस्थेचा परिणाम नाहीं. मुसुलमानी अमलांतील हिंदूसमाजाची ही विद्यादिविषयक स्तब्धता पाहून व मुसुलमानपूर्व क्षत्रियांच्या अंमलांतील जातिसंस्थ हिंदूसमाजाच्या विद्यादिविषयक अपूर्व प्रगती कडे कानाडोळा करून, कित्येक टीकाकार नितांत उपकारक अशा जातिसंस्थेला अपकारक समजतात, परंतु, त्यांची ही परीक्षा सर्वस्वीं अयुक्त आहे, हें वरील कार्यकारणोद्घाटणे वरून निःसंशय सिद्ध होतें.

१८ अजाति मुसुलमान भारतवर्षात कायमचे राहिल्यानें हिंदूंच्या जातिसंस्थेच्या समाजसंरक्षणविषयक उपयुक्ततेची चांगली च साक्ष पटली. शुद्ध आर्य जाति, आर्य संकर जाती, आर्यनार्यसंकर अंत्यज जाती व अनार्य जाती, असे जे जातींचे चार वर्ग त्यां पैकी पहिल्या दोहोंचा बाह्यांशी शरीरसंबंध झाला नाहीं. त्या मुळें ते दोन वर्ग जसे चे तसे शुद्धबीजक्षेत्र राहिले. अंत्यज जातींतून व अनार्य जातीतून मात्र शरीरसंबंधद्वारा किंवा धर्मान्तरद्वारा अनेक व्यक्ति मुसुलमान झाल्या. त्यांतःया त्यांत वृत्तिवं । जे अंत्यज व अनार्य होते ते बिलकुल बाटले नाहींत. त्यांची बीजक्षेत्रशुद्धि जशी ची तशी च आज पर्यंत आहे. अंत्यजां

पैकीं व अनार्यां पैकीं उल्लू, उपरि, उनाड व उच्छृंखल अशा व्यक्ति मात्र धर्मांतर करून मुसुलमान समाजांत सामील झाल्या. बाकीचा सर्व हिंदुसमाज निकृष्ट संस्कृतीच्या, वंशाच्या व आचाराच्या मुसुलमान समाजाच्या भ्रष्ट स्पर्शा पासून अलिप्त व सुरक्षित राहिला. शुद्ध आर्यजातीं पैकीं दक्षिणेंत द्रव्यलोभा स्तव वैश्यवर्गाचा जुलमी मुसुलमानांच्या छळानें परिपूर्ण उच्छेद झाला. तो इतका की, शिवकालीं दक्षिणेंत पुनः स्वराज्य व जातिसंस्था यांचे पुनरुज्जीवन करण्याच्या प्रसंगीं गुजराथ, मारवाड या देशांतून गांवगन्ना व्यापार करण्यास गुजराथी व मारवाडी वणिग्वर्ग महाराष्ट्रांत बोलवावा किंवा येऊं द्यावा लागला. ब्राह्मणक्षत्रियांतून वतना करितां कांहीं व्यक्ति बाटल्या, परंतु अशांची संख्या अल्पस्वल्प होती. धर्म, शास्त्रें, विद्या, कला व आचार, इत्यादि संस्कृतीचे आधारस्तंभ ज्या ब्राह्मणक्षत्रियादि शुद्ध आर्य जाती व आर्यसंकर जाती त्या बीजक्षेत्राने शुद्ध राहिल्या मुळें, मुसुलमान उत्पाता पासून आर्यसंस्कृतीचा समूळ उच्छेद झाला नाहीं. हिंदुस्थानांतल्या सारख्या इराणांत, अफगानिस्तानांत व बलूचिस्तानांत जातिसंस्था त्या त्या काली नसल्या मुळें, मुसुलमान उत्पाता पुढें त्या त्या देशांतील मूळची संस्कृती व समाज जसा नष्ट झाला, तसा हिंदुस्थानांत झाला नाहीं, याचे कारण हिंदूसमाजाची जातिसंस्था होय. हिंदुलोक जातिसंस्थ जो पर्यंत आहेत, तो पर्यंत, बाह्यांचे किती हि व कोणते हि उत्पात जरी आले तरी त्या मुळे त्यांच्या शुद्ध समाजत्वाचा व संस्कृतीचा भंग होत नाहीं. उलटा उत्पातकांच्या समाजांत व संस्कृतीत मात्र फरक होतो.

१९ पर्शु, असुर, शक, यवन, मेद, पारसीक, वगैरे आयुधजीवी संघ आर्यांच्या प्रमाणे च पंचमहाभूतांचे व मूर्तींचे उपासक असल्या कारणाने, हिंदू जातिसंस्थ पडल्या मुळें, पर्श्वादींचे संघ बाहेरून त्रद्धिगत न होता, हिंदूसमाजांत जातिरूप धारण करून कालान्तराने हिंदुसम झाले किंवा क्षय होऊन नष्ट झाले. शकादींचे वंशज जे मोगलादि संघ त्यांनी महंमदी धर्म स्वीकारिल्या वर, त्यांच्यांत बाह्यांचे झटपट समावेशन करून घेण्याची शक्ति आली. मुसुलमानांची ही समावेशनशक्ति हिंदूसमाजाला दिसण्यांत जरी मारक दिसते, तरी परिणामीं ती तशी नसून, उलट मुसुलमान समाजाला च मारक व शक्तिक्षयकारक झाली. आयुधजीवी मुसुलमान संघांची संस्कृती मूळची च आर्यसंस्कृती हून निकृष्ट होती. तशांत धर्मान्तर करून हिंदूसमाजांतील जे लोक मुसुलमानसमाजांत शिरले ते हि निकृष्ट अशा आर्यानार्य अत्यंज व शुद्ध अनार्य जातींतील असल्या मुळें, यद्यपि बाट्यांच्या संख्येनें मुसुलमान लोकसंख्या फुगून गेली, तत्रापि सामर्थ्यानें समाजकार्य करण्याची मुसुलमानांची शक्ति ह्या फुगीनें वाढण्याच्या ऐवजीं बेसुमार क्षीण मात्र झाली. बाट्यांच्या अधिकतर लोकसंख्येच्या निकृष्टपणाची दाट छाया मुसुलमान समाजा वर पडली. ह्या निकृष्ट फुगीचा परिणाम असा झाला कीं, मुसुलमानी राशि-

यतींत हि जातिबद्ध ब्राह्मणक्षत्रियांच्या हातीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रे कालान्तरानें गेलीं. मूळच्या आयुधजीवी मुसुलमान संघानें हिंदूंच्या आंगा वर बेमुरवत तुटून पडून राज्ययंत्र आक्रमिलें होतें. हा च गुण मुसुलमान बाट्यांनी हि उचलला. अंतस्थ यादवीनें विस्कळित होऊन, ब्राह्मणक्षत्रियादि हिंदूजाती क्षीण व सौम्य राहिल्या मुळें, बेमुरवत तुटून पडण्यानें मुसुलमानांनी आपलें वर्चस्व चांगलें राखिले. परंतु, परराज्या खाली हिंदूंतील यादवी थंड पडून, शत्रूंच्या आंगा वर जीवा कडे न पहातां बेमुरवत तुटून पडण्याचें मुसुलमानांचें वर्म जेव्हां हिंदूंच्या ध्यानांत आलें व तें आचरण्यांत आणण्याचा जेव्हां हिंदूंनीं उपक्रम केला, तेव्हां मुसुलमानांच्या हातचें राज्ययंत्र शिवकाली व रामदासकाली पुनः हिंदूंच्या हातीं आलें. जीवा कडे न पाहतां बेमुरवत शत्रूवर तुटून पडणें हें एक च काय तें गुणाधिक्य मुसुलमानां मध्यें होते. बाकीच्या कर्तृत्वाच्या सर्व गुणांत हिंदू मुसुलमानाहून वरचढ होते. शत्रूंच्या आंगावर तुटून पडण्याचें हे गुणाधिक्य हिंदूंनीं आपलेसें केल्या बरोबर निकृष्ट संस्कृतीच्या मुसुलमान समाजाची रग मोडली. सध्यां हिंदुस्थानांतील मुसुलमानांची एकंदर सर्वसाधारण संस्कृती अंत्यजांच्या संस्कृती हून फारशी वरचढ नाही. कारण, अंत्यजोत्पन्न बाट्यांची च संख्या मुसुलमानसमाजांत बेसुमार अधिकतम आहे. सध्या तर मुसुलमान समाज दक्षिणेत बहुतेक जातिसंस्थ झाला आहे व त्यांच्या पैकीं अनेक लोक ग्रामसंस्थांत काजी, मुलाणा, तांबोळी, हलालखोर, मोमीन, बोहरी, वगैरे पिढीजात वृत्या व धंदे करून आहेत. कित्येक मुसुलमान गणपति, विठोबा यांचे भक्त असून, कित्येक पूर्ण अद्वैती, वेदान्तमार्गी बनले आहेत. अलीगड वगैरे ठिकाणीं हिंदुमय बनलेल्या मुसुलमानांची शुद्ध इस्लामी धर्मा कडे प्रवणता करण्याची खटपट चालली आहे. ती कितपत यशस्वी होते, तें कालान्तराने दिसावयाचे आहे.

२० जातिसंस्था करून बाह्यांचा समावेश करून घेण्याचा हिंदूसमाजाचा असाधारण स्वभाव आहे. हा स्वभाव भिन्न मत, भिन्न आचार, व भिन्न प्रांत ह्यांनी हिंदूंच्या जातींत किंचित् महत्वाचा फरक झाला तरी हि दिसून येतो. बौद्ध, जैन, लिंगायत, ब्राह्मो, प्रार्थनासमाजी व आर्यसमाजी ह्यांच्या पृथक् जाति धर्ममतभेदा मुळें होऊन, सनातनधर्मी हिंदू यांनां पाखंडजातींत गणतात. सवाशे, तिरगुळ, वगैरे पोटजाती ब्राह्मणांत झाल्या आहेत त्या आचारभिन्नतेची फळें आहेत. कोंकणस्थ, कऱ्हाडे, देशस्थ, औदिच्य, गौड, मैथिल, वगैरे ब्राह्मणांच्या पोटजाती प्रांतभेदानें बनल्या. इतर वर्णांत व संकरांत हि मतें, आचार व प्रांत ह्यांनीं पोटजाती निर्माण झालेल्या प्रसिद्ध आहेत. मतादिभेद झाला असतां, वृथा तंडत व फुंजत न बसतां, निराळी पोटजात करून सुखानें इष्ट भेदाचा उपभोग घेण्याची हिंदूसमाज परवानगी देतो. पोटजातींत विशेष भिन्नता नसेल,

तर शरीरसंबंध होतात. उदाहरणार्थ, माळवाले व जैन गुजराथी वाणी. भिन्नता उत्कट भासली, तर शरीरसंबंध बंद पडतो. अश्या शेंकडो पोटजाती हिंदूसमाजांत झाल्या आहेत व त्या होऊन आतां शेंकडो वर्षे लोटलीं आहेत. भिन्नतेची उत्कटता हि कमी कमी भासूं लागली असून, कित्येक पोटजातींतून भेदाच्या कारणाची स्मृति सुद्धां बुजून गेली आहे. अशा स्थितीत पोटजाती मोडून जाण्या कडे प्रवृत्ति व्हावी, हें रास्त च आहे. लवकर च मतां मुळें, आचारा मुळे, व प्रांतां मुळे झालेल्या सर्व पोटजाती एक होतील, असा रंग दिसतो. शुद्ध आर्यसंकर जाती हि, शेंकडो पिढ्या बीजक्षेत्रशुद्धि राखून, मूळ पित्याच्या वर्णाला परत जाण्याला योग्य झाल्या आहेत. त्या साक्षर व विद्यावंत झाल्या, ह्मणजे मूळ वर्णात हिंदूसमाज त्यास आनंदाने घेईल, यांत संशय नाहीं. शुद्ध आर्य जातींतील पोटजाती व शुद्ध आर्यसंकर जाती चातुर्वर्णिकांच्या बीजक्षेत्राच्या व हाडामांसाच्या आहेत. मनूने व याज्ञवल्क्याने आज्ञापिलेल्या तीन पिढ्याहून, पांच पिढ्याहून व सात पिढ्याहून किती तरी जास्त पिढ्या ह्यांची तपश्चर्या झालेली आहे. तेव्हां आतां, ह्या पोटजातींना व संकरजातींना मूळ वर्णांत परत घेण्याची व ह्यांची उन्नति होऊं देण्याची वेळ होऊन चुकली आहे. हें काम चातुर्वर्णिकांची महाधर्मसभा जेव्हां स्थापन होईल, तेव्हां सदयतेने हटकून घडून येईल. आतां पर्यंत जाती, पोटजाती व शुद्ध संकरजाती जातींतल्या जातींत राहून उच्च वर्णांचे धर्म ग्रामोपाध्यायांच्या अनुमतीनें स्वीकारून, आपल्या जातींची उन्नति आस्ते आस्ते करीत आहेत. कायस्थादि कित्येक संकरजातींना वेदोक्तसंस्काराधिकार न दिल्या- मुळे, मोठे राजकीय उत्पात घडलेले आहेत. शूद्र व अंत्यज ह्यांना ब्राह्मणक्षत्रिया- दींचा आचार, धर्म, विद्या, इतिहास, भक्ति, वेद व वेदान्त ह्यांचा लाभ न झाल्या मुळे, शातवाहनशकाच्या बाराव्या शतकांत मोठी सामाजिक खळबळ उडून महानुभाव, लिंगायत वगैरे पाखंडें जन्मास आलीं आणि शूद्र व अंत्यज ह्या जातींतील अवाढव्य लोकसंख्येचा पाठिंबा ब्राह्मणक्षत्रियांचा जाऊन, मुसुलमानांच्या हातीं राज्ययंत्र गेलें. अशा संकटसमयीं ज्ञानदेवादि साधुसंतांनी शूद्र व अंत्यज यांना संस्कृत इतिहास, वेदान्त, भक्ति, वगैरेची द्वारे प्राकृत भाषेच्या किल्लीनें उघडून देऊन, जात्युन्नती नाही तर आत्मोन्नती करून घेण्याची सोय केली. अश्या ह्या भक्त्यमृतानें आत्मोन्नत झालेल्या शूद्र व अंत्यज जातींना जात्युन्नती करून देण्याचा हि उपक्रम आतां केला पाहिजे. अंत्यजांची जात्युन्नती कशी करावी, वगैरे प्रश्न प्रकृत समावेशनविषयक विवेचनाच्या किंचित् बाहेरचे असल्या मुळें, त्या प्रश्नांचा ऊहापोह विस्ताराने इतरत्र करणे युक्त होईल. येथें फक्त एका मुद्याचा उल्लेख मात्र करतों.

२१ आर्यसमाजांत गुणकर्मां वरून प्रथम वर्ण उत्पन्न झाले. वर्णभेदाची रूढि सार्वत्रिक होणार अशी चिन्हे दिसता च मन्वादि शास्त्रकारांनीं ती रूढि

कायदा ह्मणून आपल्या धर्मग्रंथांत ऊर्फ कायद्याच्या पुस्तकांत नमूद केली. नंतर अन्योन्य शरीरसंबंध न करणाऱ्या जाती उत्पन्न झाल्या. त्यांचें हि प्रख्यापन कायदा ह्मणून जातीविवेकादिग्रंथांत धर्मशास्त्रकारांनीं करून ठेविलें. आतां, जातांची व पोटजातींचा मूळ वर्णा कडे परत जाण्याची समाजांत उत्कट इच्छा झालेली स्पष्ट दिसत आहे. ती इच्छा कायदा ह्मणून धर्मग्रंथांत नमूद झाली पाहिजे, ह्मणजे धर्मशास्त्रकारांनीं नूतन शासन निर्माण केले पाहिजे. नूतन शासन निर्माण करण्याचा परिपाठ गेलीं चार पांच शे वर्षे बंद पडला आहे. तो पुनरुज्जीवित करणे अत्यंत जरूरीचे झाले आहे. धर्मसभा शिथिल झालेल्या आहेत. त्या पुनः जाग्या करून, नूतन शासन करण्यास आरंभ केला पाहिजे. ह्या आरंभांत जो मुख्य मुद्दा लक्ष्यांत घ्यावयाचा तो हा की जातीसंस्था हिंदूंच्या मनोरचनेचा एक महत्वाचा भाग असून, ती त्यांच्या हाडामांसांत खिळलेली आहे व तिच्या मुळें त्यांचे पृथक् समाज ह्मणून आज हजारों वर्षे संरक्षण झालें आहें. पोटजाती ह्या हंगामी मतादिभेदा मुळे उत्पन्न झाल्या कारणाने, तो मतादिभेद कालान्तरानें शिथिल पडत चालला आहे, तेव्हां पोटजातींची आतां जरूर राहिली नाहीं. मुख्य जातीचा हि कल वर्णोन्नती कडे स्पष्ट दिसत आहे. अशा स्थितीत वर्णोन्नति व धर्मोन्नति व आत्मोन्नति कायदेशीर रीतीने हक्क ह्मणून करून घेण्याचा अधिकार सर्व हिंदूजातींना दिला पाहिजे. हा अधिकार आस्तेआस्ते सर्व हिंदूजातींना अखेर प्राप्त होऊन, सर्व हिंदूसमाज एकजिनसी बनविला पाहिजे हें निश्चित आहे. हा एकजिनसीपणा यद्यपि आला, तत्रापि मुसुलमान, यूरोपियन, चिनी, जपानी वगैरे एकवर्णी बाह्य समाजाशीं शरीरसंबंध करण्याचा हिंदूसमाजाला तिरस्कार आहे व तसा शरीरसंबंध करण्या पासून समाजसंरक्षणाला साहाय्य होत नाहीं, हें अनुभवानें हिंदूसमाज जाणतो.

३२ रंग, चेहरा, संस्कृती वगैरे कारणें बाह्यांशीं शरीरसंबंध न करण्यास यूरोपीयन लोकांना पुरी होतात. सध्यां यूरोपीयन लोक आफ्रिकन, चिनी, जपानी, हिंदू, वगैरे बाह्यांच्या संबंधाने केवळ लखोटबंद जाती बनले आहेत. स्वतः एकजिनशी जाती बनून, आपण जातीबद्ध नाहींत, अशी हे लोक फुशारकी मारतात. ह्मणजे आपण काय आहोत व कोणती पद्धत स्वीकारीत आहोंत, हें ह्यांचे यांना अद्याप खुलासेवार स्पष्ट कळलेले नाहीं. युनायटेड स्टेट्स मध्यें एक कोट नीग्रो आहेत. ह्या नीग्रोंशी गोरे सरसहा शरीरसंबंध करीत नाहींत. कारण बीजक्षेत्र शुद्धी बिघडून अकर्माशी प्रजा निपजते. तेव्हां नीग्रो व गोरे अशा युनायटेड् स्टेट्स मध्ये दोन मुख्य जाती असून, तिसरी इंडियनांची जात आहे हे उघड आहे. शिवाय, अकर्माशांची चवथी जात आहे ती वेगळी च. तात्पर्य, अमेरिकेंत जाती संस्था अस्तित्वांत आल्या आहेत, इतके च की, त्या जाती आहेत, हे कबूल करण्यास तेथील लोकांस अद्याप धैर्य आले नाहीं. सर्व मनुष्यप्राणी सारखे आहेत, सर्वांनां

सारखे हक्क असावेत, वगैरे स्थूल व अशास्त्र कल्पना यूरोपीयन लोकांत दृढ झाल्या-मुळें विचार व आचार या संबंधानें यूरोपीयनांत जमीनअस्मानाचें अंतर असणें साहजिक आहे. यूरोपांतील सर्व ख्रिश्चनधर्मी व शुभ्रवर्णी लोक अन्योन्य शरीरसंबंध करतात. प्रांतभेदा मुळें व भाषाभेदा मुळें शुभ्रवर्णी व ख्रिश्चनधर्मी लोकांचीं भिन्न राष्ट्रें बनलीं आहेत. कधी तरी हजारों वर्षांनी भाषाभेद नाहीसे होऊन यूरोपांतील सर्व राष्ट्रें मिळून एक संयुक्तराष्ट्र होईल. युनायटेडस्टेट्स मध्ये इंग्रज,आयरिश, फ्रेंच, जर्मन, स्विस, इतालियन, पोलिश, ग्रीक, रशियन, हंगारियन, डेन, स्वीडिश, वगैरे सर्व राष्ट्रांतील लोक स्वभाषा दोन तीन पिढ्यांत सोडून देतां देतां एकजिनसी बनत आहेत. तो च प्रकार यूरोपांत अनुकरणानें व इतर बलवत्तर कारणांनीं होईल. हिंदुस्थानांतील बंगाली, हिंदी, पंजाबी,गुजराथी,मराठी,कानडी, तेलगू, तामील, वगैरे सर्व हिंदूराष्ट्रें अमेरिकेंतल्या प्रमाणें च भाषाभेद सोडून शेकडों वर्षांनीं एकजिनसी बनतील. हा राष्ट्रीय एकजिनसीपणा येण्याच्या अगोदर एकभाषा बोलणाऱ्या एकेक राष्ट्रांतील पोटजाति व संकरजाति मोडून त्या त्या राष्ट्रांतील सर्व समाज एकजिनसी होईल. हा प्रकार आपल्या डोळ्या देखत हिंदुस्थानांतील सर्व राष्ट्रांत आजमित्तीस चालू आहे. तो जोराने व धिम्मेपणानें चालण्यास प्रोत्साहन देणें आपल्या हिताचें आहे. पोटजाति व संकरजाति मूळजातींत व मूळवर्णांत परत घेण्या पासून आपल्या धर्मांत बिलकुल फेरफार होत नाही. मूळ जातींत व मूळवर्णांत परत जाण्याचा हा स्वभाव हि मर्यादेंत ठेविला पाहिजे. नाही तर, धर्मभिन्न, आचारभिन्न, संस्कृतिभिन्न, वंशभिन्न, व बीजक्षेत्रभिन्न अशा पृथ्वीच्या पाठी वरील वाटेल त्या निकृष्ट व उत्कृष्ट लोकांशी शरीरसंबंध करण्याचा हि मोह उत्पन्न झाल्या वांचून रहाणार नाहीं. हा मोह आपल्या हिंदूपणाला सध्यां मारक आहे. आज वर पांच सात शें वर्षें मुसुलमानांशीं झगडा करून त्यांतून आपण यशस्वीपणानें पार पडलो. त्याला कारण आपली जातिबद्धता होय. यूरोपियनांशी सध्यां गांठ पडलेली आहे, तींतून हि सुरक्षितपणें बाहेर पडण्यास आपली एकजिनसी जातिबद्धता आपणाला चांगली उपयोगी पडेल. जातिबद्ध राहून मुसुलमानांचा आंगा वर बेमुरवत तुटून पडण्याचा गुण आपण उचलला व मुसुलमानांच्या रानटी छापेंतून मुक्त झालों. यूरोपियनांचा मुख्य गुण त्यांची भौतिक, मानसिक व सामाजिक शास्त्रसंपन्नता होय. एकजिनसी जातिबद्धता राखून ही शास्त्रसंपन्नता सध्यां आपणांस हस्तगत करावयाची आहे.

२२ प्रस्तुत विवेचनांतील मुख्य मुद्दे स्मरणार्थ येणें प्रमाणें:—

( १ ) मुसुलमान बाह्यांचे सरमिसळ समावेशन करतात.

( २ ) यूरोपीयन रंगादिवरून निवडक सामाजिक समावेशन करतात.

( ३ ) यूरोपीयन बाह्यांचे समावेशन बिलकुल होऊं देत नाहींत. बाह्य

शेजारास आल्यास, त्यांचा समूळ नाश करतात किंवा त्यांना गुलाम अगर गुलामवजा बनवितात.

( ४ ) मुसुलमान व यूरोपीयन हे व्यक्तींचें समावेशन करतात.

( ५ ) हिंदू जातिद्वारा समावेशन करतात.

( ६ ) हिंदू बाह्यांचा नाश करीत नाहीत किवा त्यांना गुलाम बनवीत नाहीत. बाह्यांच्या जाती करून त्यांची पृथक् स्थापना आपल्या शेजारीं प्रगत्यर्थ करतात.

( ७ ) मत, आचार, प्रांत इत्यादि भेदांस्तव हिंदू पोट जाती बनवितात.

( ८ ) जातिसंस्थेने कोणत्या हि समाजाला चिरंजीवित्व येते.

( ९ ) आपत्काली जातिसंस्था स्वसमाजसंरक्षक होते; आणि संपत्कालीं बाह्यसमाजसंरक्षक हि होते.

( १० ) बीजक्षेत्रशुद्धि, वंशशुद्धि, संस्कृति, आचारशुद्धि, हीं जाती बनण्याचीं कारणे आहेत.

( ११ ) पोटजाती मूळजातीला भेदलोपानें परतात.

( १२ ) जाती बीजक्षेत्रशुद्धीनें मूळ उच्चवर्णांना पोहचतात.

( १३ ) अशा परंपरेनें हिंदूंची एकजिनसी एक जाति भविष्यत्कालीं बनेल.

( १४ ) ही एकजिनशी हिंदूजाति मुसुलमान किवा यूरोपीयन किवा चिनी जपानी यांशीं शरीरसंबंध करून आपले बीजक्षेत्र, वंश, संस्कृती व आचार स्वसंरक्षणार्थ बिघडवूं इच्छित नाहीं.

( १५ ) निवडक किंवा सरामिसळ समावेशनापेक्षां जातिद्वारा समावेशन सर्वप्रकारें बहुगुणकारी आहे.

( १६ ) इंग्रजादि यूरोपियन लोक एकजाति व एकजिनसी बनून गेलेले आहेत. बाह्यांशीं एखादा दुसरा शरीरसंबंध झाल्यानें, ह्यांची जातिबद्धता बिघडण्या सारखी आतां नाहीं.

( १७ ) मुसुलमान समाज एकजाति, एकवंशी किंवा एकजिनशी नाहीं. सर्व वर्ण, सर्व वंश, सर्व संस्कृति यांचे सरमिसळ मिश्रण ह्या समाजांत झालेलें आहे. ह्यांचा टिकाव येथून पुढे शास्त्रसंपन्न व एकजिनसी समाजां पुढें लागणें मुष्कील आहे. हा रामाज या पुढें यूरोपियनांचा गुलाम बनेल, मग त्या गुलामगेरीला वाटेल तें नांव पडो.

वि. का. राजवाडे

श्री

गागाभट्टकृत

# शिवराज-प्रशस्ति

व

# कायस्थधर्मदीप



१ सातारकर महाराजांच्या दफ्तरांतील गळाठ्यांत गागाभट्टकृत कायस्थ-धर्मदीप या नावांची पोथी सांपडली. एकंदर पानें ५०. प्रत्येक पानाची लांबी ११$\frac{1}{2}$ इंच व रुंदी ५ इंच. दर पृष्ठास ९ किंवा १० ओळी. अक्षर शिवकालीन. ज, प्य, छ, हीं अक्षरें तेराव्या शतकापासून पंधराव्या शतका पर्यंत महाराष्ट्रांत जशीं काढीत तशी काढलेली आहेत. तात्पर्य पोथी अडीचशे वर्षांची जुनी आहे. अशुद्धें क्वचित् आहेत. दोन्ही बाजूंना समास सवा इंचाचा असल्यामुळें अक्षरांच्या ओळी फक्त ९ इंच लांब आहेत. प्रत्येक ओळींत सुमारें ४३ पासून ४५ अक्षरें आहेत.

२ ह्या पोथींत दोन प्रकरणें आहेत. (१) कायस्थधर्मदीप व (२) शिवराजप्रशस्ति. पैकीं प्रशस्ती पहिलीं तीन पानें आहे व श्लोक २९ आहेत. कायस्थ-धर्मदीपाला च गागाभट्टी हे अपरनामाभिधान आहे. गागाभट्टीचा अत्यन्त विश्वसनीय पाठ व गागाभट्टीची अत्यन्त जुनी पोथी पहावयाची असेल तर ती ही आहे. छत्रपतींच्या ग्रंथालयांत न्यायाधीश व पंडितराव ह्या पोथीचा उपयाग करीत. पोथी वापरण्याने अगदीं जीर्ण झाली असून, दुर्व्यवस्थेने तिचीं २८ पासून ५० पर्यंतचीं पाने कसरीनीं पोखरून टाकिलेली आहेत. कायस्थांचे धर्म, आचार व संस्कार शिवाजीच्या कालीं बाळाजी आवजीच्या संमतीने गागाभट्टानें ठरावून दिले, ते ह्या पोथींत आहेत. तेव्हां आतां कायस्थांच्या आचारा संबंधानें संशयाला व वादाला बिलकुल अवकाश राहिलेला नाहीं.

३ प्रथम शिवराजप्रशस्ति येथें सबंद देतों व नंतर गागाभट्टींतील विषयांचें स्थूल निरोपण करितों.

प्रशस्ति येणें प्रमाणें:—

॥ श्रीगणेशाय नमः ॥

॥ श्रीशिवो जयति ॥

सिंदूरं नयनं तृतीयकमतिःश्यामं गलं कज्जलं ।
स्वच्छांगं मुकुरं निशाकरकलामाभुग्नमुक्तास्रजं ॥

गंगांबूनि निबद्धपिंगटजटापेटीस्थिता मालतीर् ।
बिभ्राणो गिरिजामिवार्चितुमसौ देवः शिवायास्तु वः ॥ १ ॥

या वीतिहोत्ररजनीच(र)वेष्टितापि
पत्या सरोजसुहृदात्मभुवा सहैव ।
संसेवते मलयचंदनगंधवाहं
तस्यां हरित्यहह राजगिरि श्चकास्ति ॥ २ ॥

तत्रास्ति राजनगरी शिवराजधानी
यत्सौधशेखरगता श्चटकाः प्रभाते ।
पारावता अपि च तांडवयंति तुंडं
तारासु तंडुलधियाप्यनिवर्त्तयंति ॥ ३ ॥

तत्रा भवच्छाहनराधिराजः
स क्षत्रधर्मस्य नवावतारः ।
सुरद्रु पुष्पोद्भवकामिनीभिः
संगीयते यस्य यशःप्रशस्तिः ॥ ४ ॥

कादंबिनीव जनजीवनदानहेतुः
सौदामिनीव सकलारिविनाशनाय ।
आलंबिनी भवति राजगिरे रिदानीं
जीजाभिधा जयति शाहकुटुंबिनी सा ॥ ५ ॥

तत्पुण्यराशि रभवच्छिवराजनामा
यस्य प्रतापसविता क्रमते दिगंतं ।
अस्तोदयाचलपरार्द्धभुवि स्थितानां
मुद्योतपारणमिवाकलयन्खिलानां ॥ ६ ॥

प्रतापतपनो महन्प्रकुरुता दिनं ब्रह्मणः
पराभवितु मीहता मपरकीर्त्युडूनि क्षणात् ।
इदं तु महदद्भुतं दहति सातपत्रानयं
न तापयति यैः कृतमनातपत्रं शिरः ॥ ७ ॥

दप्योद्दीप्यद्यवनदितिजोत्क्रांतिदानाय लोक—
त्राणायोग्रो बहुलकरुणासिंधुराशि र्बभूव ।
मन्ये यस्माद्बहलदितिजाधीशवक्षो विदार्य
स्थाने स्वीये निखिलविबुधान्स्थापयामास भूयः ॥ ८ ॥

द्यावापृथिव्यो र्हि समिद्धवत्यो
र्द्वीय्येव मध्ये किल यस्य कीर्त्तिः ।
दिल्लीश्वरक्रोधधनंजयस्य
प्रकाशयत्याशु समिंधनं या ॥ ९ ॥
यस्योत्पत्ति स्त्रिदशभवने दुंदुभिध्वानकल्पा
कोपि स्पष्टो यवनभवने ऱ्हादिनीपात एषः ।
नाम्न श्चैवं सकृदपि जपो ऽवरंगजेबस्य कंपो—
त्कर्षं जनयति चिरं जीवता शाहसूनुः ॥ १० ॥

इथैमालंबी भवति भगवान्भानुमान्नक्रविद्य। द्रेहारंभी भवति गहने दाववैश्वानरोपि ॥ किंवा प्यश्वा वदनजनितः सागरे मज्जते यत्। सोयं सर्वो जयति महिमा यत्प्रतापानलस्य ॥ ११ ॥

यत्र क्षात्र मियाय भार्गवभयत्रस्तं परं विश्रमं
वंशो ऽवरंगमहीपते रपि महान्यस्मिन्पतंगायितः ।
यन्नामत्रिदशास्यहेतिपटुताग्रासीभवद्यावना—
दक्षीणोपमितोष्णभूतहृदयो वर्वर्ति दिल्लीश्वरः ॥ १२ ॥
भयात्तवगिरे र्भृगुं भजति गोलकुंडाधिपः
स दक्षिणदिगीश्वरं श्रयति दक्षिणाशाधिपः ।
महापथ मुपासितुं हिमगिरिं च दिल्लीश्वरः
शिवोयमवमन्यतान् जयति राजराजः श्रिया ॥ १३ ॥

स्ववपु र्व्ययशंकया सुमेरु
र्वपु रर्द्धव्ययशंकितो रमेशः ।
सुदशान्व्यवधाय भूभृदब्धीन्
सृजतः स्वानि शिवाय दीपवत्तौ ॥ १४ ॥
त्वयि दित्सति याचकान् धनेशान्
ददति त्वय्यथ वीक्ष्य तान्रमेशान् ।
शिवराजनिजाभिभूतिभीत्या
स्वय माशांबरता मगान्महेशः ॥ १५ ॥

पीताः शास्त्रमहार्णवाः भसितां प्रापिताः समुल्लासिता
विश्वं भानुमते व दीर्धित मिदं कात्स्न्येन लब्धा श्रुतिः ।
नव्या सृष्टि रकारि सृष्टिविरहे त्राता द्विजौघाः क्षमा

वासिष्ठी त्वयि जामदग्न्यसदृशत्वस्येव संभाव्यते ॥ १६ ॥
समस्तसामंतकिरीटरत्नानुबिंबिता यच्चरणोर्द्ध्वरेखा ।
सीमंतिनीनां समुवाच तेषां सीमंतसिंदूरशिरःस्थिरत्वं ॥ १७॥
दानोद्यते यत्करपद्मगर्भे रत्नप्रभासंवलितांबुदर्भे ।
कल्पद्रुदेशः सुरसुंदरीणां संप्राप संकेतनिकेतनत्वं ॥ १८ ॥
पुरा निबिडगर्जनै र्भृश मपाकृतं यै र्धनै
र्जितं सखि मया स तान् प्रियतमो गृहीत्वा गतः ।
विलोक्य गजसंवृतं पति मुपेत मारादिदं
वदंति सकुतूहलं पुन रहो यदर्थिप्रियाः ॥ १९ ॥
अकब्बरकुलोद्भवा दुदितसापसंतापिता
द्दिवाकरकरा दिव प्रथितकीर्त्युपप्लादपि ।
यदंबुवहगर्जितश्रवणनिश्चया त्तेधुना
तपक्षयविनिश्चयात् परमनिर्वृतिं भेजिरे ॥ २० ॥
पिधाने दीनाना श्रियमिह ददाने धनकृतां
लसद्गर्भे यस्य स्फुरति करगर्भे मृतमति ।
हरेरेषायोषा सपदि कमला हंत कमला—
दुपेत्येतद्भिक्षावधि वसति लक्षाधिकधने ॥ २१ ॥
अवरंगजेबयवनाधिपभीतविप्र
त्राणाय यः परिगृहीतनवावतारः ।
अन्योस्ति वा मलयभूवलयात् समुद्रात्
सुत्रामभीतगिरिरक्षणदीपितः कः ॥ २२ ॥
शिशुंगवंशोद्भववीरसेधे यः क्षत्रजातिं प्रकटीचकार ।
विजित्य सर्वान्धरणीपतींश्च योधारयछत्रमथावदातं ॥ २३ ॥
अज्ञानसिंधौ पतितान्स्मृतींश्च समुद्धाराज्ञुनया स्वकृत्या ।
वेदान्निमग्नानुदधौ युगादौ यथैव विष्णुः कमठस्वरूपः ॥२४॥
कायस्थप्रभुवंशजः समभवत्तस्य प्रधानो धिया
बालाजीति समस्तकार्यकरणोदारो महोत्साहकृत् ।
यस्याज्ञामुपयाति राज्यमखिलं सामाद्युपायैः स्फुटै
र्नीत्याद्यै श्च सुगोपितै रपि रिपुन्संबाधतेहर्निशं ॥ २५ ॥
आवूजीप्रभुतो मनीषया यो
मनीषिगणनाग्र्यतामियात् । ( ? )

किं च धैषणगिरो पि धिक्कृतिं
नीतिमार्गगधिया स्वया करोत् ॥ २६ ॥

तेन श्रीशिववर्मणा नृपतिना स्वाध्यक्षतां प्रापितो
बालाजी समकारय च्छुभमतिः कायस्थधर्मोदयं ॥
मीमांसार्णवसारगा मित्र च सा विश्वेश्वरेणादरात्
गागाभट्टपराभिधेन सुकृतानुष्ठानसंसिद्धये ॥ २७ ॥

ततो निबंधानवलोक्य भूयो—
भूय श्च हेमाद्रिमतं विचिंत्य ॥
कायस्थधर्माचरणप्रदीपं
गागाभिध स्तं प्रकटीचकार ॥ २८ ॥

ब्रह्मांडाखंडदंडाश्रीबल्लालशुभेच्छया ॥
कायस्थधर्मदीपोयं गागाभट्टेन निर्मितः ॥ ७ ॥ श्री ॥ ७ ॥
॥ श्रीः ॥ ७ ॥ श्रीः ॥ ७ ॥

४ ह्या श्लोकांतील स्थूल मतलब खाली देतों:—

( १ ) पहिल्या श्लोकांत शिवाजीचें कुलदैवत जो शंभुमहादेव त्याची नांदी आहे.

( २ ) दुसऱ्यांत रायगडचें वर्णन आहे.

( ३ ) तिसऱ्यांत रायगडा वरील राजधानीचा उल्लेख आहे.

( ४ ) चौथ्यांत शहाजीचा उल्लेख **क्षात्रधर्माचा नवावतार** ह्मणून केला असून रायगडा वर शहाजी होता असें अनैतिहासिक विधान केलें आहे.

( ५ ) पांचव्यांत **जनजीवनदानहेतु** व **सकलारिविनाशिनी** हीं विशेषणें शिवराजाची मातुःश्री जिजाबाई इस लाविलीं आहेत.

( ६ ) सहाव्यांत शिवाजीची कीर्ति दिगन्त पसरली ह्मणून ह्मटलें आहे.

( ७ ) आठव्यांत यवननाशक, लोकत्राता, करुणासागर, हीं विशेषणें शिवराजास लावून बल्होलखानाची छाती फोडणाऱ्या शिवाजीनें सर्व ब्राह्मणांची स्थापना केली, असें विधान केले आहे. ( ९ )

( ८ ) दिल्लीश्वराचा क्रोध पेटवणारा ह्मणून शिवाजीला ह्मटलें आहे.

( ९ ) शिवाजीचें नांव घेतां च अवरंगझेबाला कंप सुटतो. ( १० )

(१०) परशुरामाच्या भयानें त्रस्त झालेले क्षत्रियकुल शिवाजीच्या छत्रा खालीं विश्राम पावलें. यवनकुलाचा नाश होतांना पाहून दिल्लीश्वराचें हृदय वळवळावयास लागलें. ( १२ )

(११) शिवाजीच्या भयानें गोवळकोंडेकर तवरगिरींत लपला, विजापूरकर पातशाहानें यमसदन पाहिलें आणि दिल्लीश्वरानें हिमालया कडे महापथाची उपासना केली. ( १३ )

( १२ ) शिवाजीची सत्ता पश्चिमसमुद्रा वर बसली ( १४ )

( १३ ) शिवाजीचें औदार्य व दानशूरता ( १५ )

( १४ ) शास्त्रे व श्रुति यांचे रक्षण करून, शिवाजीने नवी सृष्टि निर्मिली ( १६ )

( १५ ) दानशूरता ( १७—२१ )

( १६ ) शिवाजीनें अवरंगझेबाच्या जुलुमा पासून ब्राह्मणांचें रक्षण केले ( २२ )

( १७ ) शिसोदे बद्दल शिशुंग असा प्रयोग केला आहे ( २३ )

( १८ ) पूर्वी कमठरूप धारण करून विष्णूनें वेद तारिले, तद्वत् शिवाजीनें स्मृतींचा समुद्धार केला ( २४ )

( १९ ) बाळाजी आवजी चे वर्णन ( २५—२६ )

( २० ) गागाभट्टापरनामा जो विश्वेश्वर त्याच्या कडून बाळाजी आवजीनें कायस्थधर्मदीप ग्रंथ करविला ( २७ )

( २१ ) हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि व इतर निबंध पाहून हा ग्रंथ केला २८

( २२ ) समाप्ती चा श्लोक.

५ ह्या प्रशस्तींत विशेषतः ध्यानांत ठेवण्या सारख्या बाबी ह्मणजे (१) मुसुलमानांचा निर्देश दैत्य ह्या नांवानें केला आहे, व (२) शिवाजीनें ब्राह्मणांचें रक्षण व स्मृतींचा आणि शास्त्रांचा उद्धार केला, ह्या होत. गागाभट्टा सारख्या विद्वच्छिरोमणीच्या मतें शिवाजीची सर्वांत थोर कामगिरी ह्मटली ह्मणजे ब्राह्मणांचें रक्षण व स्मृतींचा उद्धार ही होय. शहाजी व शिवाजी क्षात्रधर्माचे मूर्तिमंत अवतार होते, असें हि गागाभट्टाला भासलें. गागाभट्टाच्या पूर्वजांनीं काशींतील विश्वेश्वराचें देवालय बांधलें, तें अवरंगझेबानें उद्ध्वस्त केलें. अर्थात्, अकब्बराचा वंशज जो अवरंगझेब त्याची शिवाजीनें उडविलेली त्रेधा पाहून गागाभट्टाचें हृदय समाधानाच्या ऊर्मींनीं उचंबळून आलें. त्या कालीं हा विकार सामान्य हिंदूंना हि झाला. तेव्हां गागाभट्टा सारख्याला झाला, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. शाहाजी व जिजाबाई यां संबंधानें लोकमत काय होते, तें हि गागाभट्टाने वर्णिलें आहे.

६ काव्यदृष्टीनें ही प्रशस्ति इतर असल्या प्रशस्ती प्रमाणे च आहे. गागाभट्ट हा जाडा मीमांसक होता, जातिवंत कवी नव्हता. बाकी, श्लोक रचिण्याची संवय बहुतेक सर्व शास्त्र्यांनां असते त्या प्रमाणें गागाला हि होती असें दिसतें.

७ आठव्या श्लोकांत बहलदितिज ह्मणजे बल्होल दैत्य ह्या रूपानें विजापूरच्या बुल्होलखानाचा उल्लेख आला आहे. त्याची छाती फोडून, असें ह्या श्लोकांत वाक्यखंड आहे. ह्या वाक्यखंडाचा वाच्यार्थ घेतला, तर ही प्रशस्ति व गागाभट्टी

हा ग्रंथ शक १५९९ नंतर लिहिला असें होतें. कारण, विजापूरचा बुल्होलखान शक १५९९ त वारला. वाक्यखंडाचा व्यंग्यार्थ घेतला तर ह्मणजे शिवाजीनें बुल्होलखानाचा पुरा मोड केला असा अर्थ घेतला तर १५९५ च्या पौषानंतर थोड्या च कालानें, ही प्रशस्ति व हा ग्रंथ रचिला गेला, असें मानणे प्राप्त होतें. कारण १५९५ च्या मार्गशीर्षपौषांत जेसरीच्या जंगी लढाईत शिवाजीने बुल्होलखानास धुळीस मिळविलें. नंतर १५९६ च्या ज्येष्ठांत शिवाजीचा राज्याभिषेक झाला. त्या वेळीं गागा महाराष्ट्रांत होता. गागा १५९५ त दक्षिणेत आला १५९६ च्या पावसाळ्यानंतर हिवाळ्यांत काशीस गेला, असा अंदाज आहे. त्या दर्म्यान बाळाजी आवजीने कायस्थधर्मदीप हा ग्रंथ गागा करवीं रचून घेतला. २३ व्या श्लोकांत शिवाजीनें आपल्या वर राजछत्र धारण केलें असें वाक्य आहे. अर्थात्, राज्याभिषेका नंतर गागाभट्टाने कायस्थधर्मदीप हा ग्रंथ रचिला, हे स्पष्ट आहे. १५९६ नंतरच्या कोणत्या हि शिवकालीन प्रसंगाचा उल्लेख या प्रशस्तींत नाही. शहाजी होऊन गेला असा भूतकालीन उल्लेख चौथ्या श्लोकांत आहे आणि जिजाबाईचा उल्लेख जयति ह्या वर्तमानकालवाचक क्रियापदाने केला आहे. जिजाबाई १५९६ च्या ज्येष्ठवद्य ९ स वारली. तेव्हां कायस्थधर्मदीप हा ग्रंथ राज्याभिषेकानंतर ह्मणजे शक १५९६ च्या ज्येष्ठशुद्ध १३ नंतर व ज्येष्ठवद्य ९ पूर्वी ह्मणजे सुमारे ११ दिवसांच्या अवधींत केव्हां तरी संपूर्ण केलेला आहे. कायस्थधर्मदीप हा छोटेखानी प्रबंध आहे. कोणी हि अंगमेहनत घेणारा बुद्धिमान धर्मशास्त्री, असला लहानसा प्रबंध दोनचार दिवसांत रचील. राज्याभिषेकोत्सव चांगला महिना पंधरा दिवस चालला होता. त्यांत गागाभट्टा कडे, तर, मुख्य काम होतें. अर्थात्, रात्री खेरीज ह्या अकरा दिवसात त्याला फुरसत फारशी सांपडली नसावी. रात्रीच्या विश्रांतीच्या फुरसतीत बाळाजी आवजीच्या आग्रहास्तव गागानें हा प्रबंध लिहून दिलेला आहे. उद्योतादि बडे ग्रंथ रचण्यांत ज्याचें सर्व आयुष्य खर्चिले गेले, त्या गागाभट्टाला असला हा लहानसा प्रबंध रचणें ह्मणजे केवळ पोरखेळ होता.

८ कायस्थधर्मदीपाचा प्रारंभ असा:—

नत्वाभीरकिशोरं चोरं विद्युद्धतोप्यभिख्यायाः ।
कायस्थधर्मदीपं गागाभट्ट स्तनोति लीलातः ॥ १ ॥
गागाभट्टापराख्यस्य विश्वेश्वरमनीषिण:
सुमनोमानसे शर्म मम निर्मातु निर्मितिः ॥ २ ॥

॥ तदुपोद्धातत्वेन आदौ जातिनिर्णयः क्रियते ॥

९ जातिनिर्णयप्रकरणांत अनुलोमप्रतिलोमसंकरजातीचे वर्णन करून, प्रकरणाची समाप्ति एणें प्रमाणें केली आहे:—

॥ इतिकायस्थाचारदीपिकायां जातिविवेकनिरूपणं ॥

एथे ह्या ग्रंथाला कायस्थाचारदीपिका ह्मटले आहे.

१० नंतर पुढे संस्कारप्रकरण लागते त्याचा आदि असाः—

गागाभट्टेन विदुषा नत्वा श्रीराममादरात् ।

जातिं विविच्य संस्कारः कायस्थानां निरूप्यते ॥

संस्कारप्रकरणांत प्रथम कायस्थांचे सामान्यधर्म व नंतर विशेषधर्म सांगितले आहेत. गागाभट्टाने कायस्थांचे दोन वर्ग केले, एक प्रतिलोमकायस्थ व दुसरे अनुलोमकायस्थ. प्रतिलोमकायस्थ फक्त पंचसंस्कारांचे अधिकारी आहेत. अनुलोमकायस्थ दोन प्रकारचे, चांद्रसेनीय कायस्थ व चित्रगुप्तकायस्थ. ह्या दोन कायस्थांचा शरीरसंबंध होऊन एक चांद्रसेनीय कायस्थजाति झाली. हे चांद्रसेनीय कायस्थ क्षत्रियोत्पन्न आहेत, असा गागाभट्टाने शेरा दिलेला आहे.

चांद्रसेनीयानां शुद्धक्षत्रियजन्यत्वेन प्रतिलोमत्वाभावात् ।

गागाभट्टाने चांद्रसेनीय कायस्थांचे बारा संस्कार सांगितले आहेत, सोळा नाहींत.

तत्र प्रतिलोमकायस्थस्य पंचसंस्काराः । जातकर्मनामान्नप्राशन—कर्णवेधविवाहाः प्रतिवाचनिकाः । चित्रगुप्तचांद्रसेनयो र्वेदाध्ययनाभावे ऽपि गर्भाधानादिचौलान्ता अष्टौ उपनयनस्नानविवाहस्मशानरूपा श्चत्वार इति द्वादश भवंति ।

वर्ण व जाति असे दोन भाग करून, त्यां पैकीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या वर्णत्रयाला गागा सोळा संस्कार सांगतो व बाकीच्या जातींना (वर्णांना नव्हे) पांच पासून बारा संस्कार सांगतो. पैकीं चांद्रसेनीय कायस्थांना बारा अमंत्रक संस्कार सांगतो.

चांद्रसेनीयांना उपनयनाचा अधिकार आहे ह्मणून गागा सांगतो; परंतु एक विशेष घालून ठेवितो, तो हा —

न चैवं क्षत्रियत्वेन मंत्रवदुपनयनं वेदाध्ययन वास्तीति वाच्यं । नंदांतं क्षत्रियकुलं, क्षत्रियत्वमनीनशत् इतिश्रीभागवतबोधितक्षत्रियत्वनाशेन तदसंभवात् । तथैव शिष्टाचारात् । अतस्तेषां द्वादशसंस्कारवत्तूपनयनं भवति इति सिद्धं ।

यानंतर, स्वस्तिवाचनादिविधि, पुण्याहवाचनादिविधि, सर्व होमसाधारण—प्रयोग, नवग्रहमखप्रयोग, रजोदर्शनशांतिप्रयोग, व अब्दपूर्तिप्रयोग, इतके प्रयोग ५० पृष्ठान्त दिले आहेत. बाकी ग्रंथ आणीक आहे तो या प्रतींत नाही. पैकीं पुण्याहवाचनाच्या प्रयोगा पैकीं कांहीं भाग मासल्या करितां येथें देतों.

गागाकृत कायस्थार्थप्रयोग डाव्या बाजूस व समंत्रक प्रयोग उजव्या बाजूस समांतर नक्कल करितोः—

## पुण्याहवाचन

**अमंत्रक**

स्वपुरतः प्रस्थपरिमितस्य शक्त्या न्यूनस्य वा धान्यराशे रुपरि दक्षिणोत्तरयोः सुवर्णरजतताम्रमृन्मयान्यतम मव्रणं मनोहर मलंकृतं शुद्धपुण्यजलपूरितं कृत्वा दक्षिणोत्तरतो भूमिं स्पृशेत् । जगदाश्रयभूता त्वं सर्वेषां कामदा सदा । कर्मांगेषु सदा श्रेष्ठे भूमे देवि नमो स्तु ते ॥

ओषध्यो यज्ञियाः पुण्या जीवाना मादिकारणं । तस्मादासां प्रकिरणा त्संतु कामाः सदा मम ॥ धान्दराशि कृत्वा ॥

कलशः कमनीय श्च लक्ष्म्या यो धिष्ठितः पुरा । देवाना ममृताधार स्तमिह स्थापयाम्यहं ॥ कलशं स्थापयित्वा जलं पूरयेत् ॥

गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वती ॥ नर्मदा सिंधु कावेरि जले त्वं सन्निधौ भव ॥

**समंत्रक**

कर्ता स्वपुरतः ॥ ॐ मही द्यौः पृथिवी च न इमं यज्ञं मिमिक्षतां ॥ पिपृतां नो भरीमभिः ॥ इति मंत्रावृत्त्या दक्षिणोत्तरतो भूमिं स्पृष्ट्वा ॥

ॐ ओषधयः संवदंते सोमेन सह राज्ञा ॥ यस्मै कृणोति ब्राह्मण स्तं राजन्पारयामसि ॥ इति तथैव तंदुलपुंजौ कृत्वा ॥

ॐ आकलशेषु धावति पवित्रे परिषिच्यते उक्थै र्यज्ञेषु वर्धते ॥

इति तत्र द्वौ कलशौ निधाय ॥

ॐ इमं मे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या ॥ असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्यासुषोमया ॥

इति तीर्थजलेन प्रत्येकं पूरयित्वा ॥

ॐ गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं ॥ ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियं ॥ इति गंधं प्रक्षिप्य ॥

चंदनागरुकर्पूर कस्तूरीप्रभृतीनि च ॥ सुगंधिपुण्यद्रव्याणि गंधार्थं प्रक्षिपाम्यहं ॥ गंधं ॥

ॐ कांडात्कांडात्प्ररोहंती परुषः परुषः परि ॥ एवानो दूर्वे प्रतनु सहस्रेण शतेन च ॥ इति दूर्वाः ॥

कांडे कांडे धिरोहंती अजरा चामृता सदा ॥ तस्मादस्याः प्ररोहेण भूयांस मजरः सदा ॥ दूर्वा ॥

ॐ अश्वत्थेवो निषदनं पर्णे वो वसति ष्कृता ॥ गोभाज इत्किलासत यत्सनवेथ पूरुष ॥ इति पल्लवान् ॥

अश्वत्थचूतचंपादिपल्लवा निर्मिताः सुरैः ॥ पवित्रा पुण्यभाज स्तान् कुंभे स्मिन्प्रक्षिपाम्यहं ॥ पल्लवाः ॥

अश्वस्थानाद्गजस्थानाद्वल्मीकात्संगमाद्ध्रदात् ॥ मृत्तिकाः पंचपुण्या श्च सर्वकर्मशुभावहाः ॥ = + + + +

॥ मृत्तिका ॥

+ + + = 
+ + +

ॐ याः फलिनी र्या अफला अपुष्पा या श्च पुष्पिणीः ॥ बृहस्पतिप्रसूता स्ता नो मुचंत्वंहसः ॥

॥ इति फलं ॥

ॐ स हि रत्नानि दाशुषे सुवाति सविता भगः ॥ तं भागं चित्रमीमहे ॥

॥ इति रत्नानि ॥

वज्रवैदूर्यमाणिक्यनीलक पुष्पराजकं ॥ ख्यातानि पंच रत्नानि कुंभेस्मिन्प्रक्षिपाम्यहं ॥

॥ पंचरत्नानि ॥

\+ \+ \+ \+ ॐ हिरण्यरूपः स हिरण्यसंदृग

पान्नपात्सेदुहिरण्यवर्णः ॥ हिरण्ययात्प-

\+ \+ \+ \+ रियोनेर्निषद्या हिरण्यदाददत्यन्नमस्मै ॥

॥ इति हिरण्यं ॥

११ वरील उताऱ्यां वरून स्पष्ट होतें कीं गागाभट्टानें कायस्थधर्मदीपांत सर्व संस्कार अमंत्रक दिले आहेत. वेदमंत्राचा अर्थ संस्कृत अनुष्टुप छंदांत आणून, कायस्थांचे सर्व संस्कार बाकी सर्व बाबींत ब्राह्मणांच्या संस्कारां सारखे हुबेहुब आहेत. गागा चांद्रसेनीय कायस्थांना क्षत्रियोत्पन्न समजतो, आणि क्षत्रियांनां तर वेदाधिकार शास्त्रसंमत व रूढिसंमत आहे. असे असून त्याने चांद्रसेनीय कायस्थांना समंत्र संस्कार करण्याचा अधिकार दिला नाही. त्याला त्याने कारण असें दिलें आहे की चांद्रसेनीय कायस्थांत समंत्र संस्कार करण्याचा **शिष्टाचार** नाही. तथैव शिष्टाचारात् ( मंत्रवदुपनयनं नास्ति ) असे शब्द गागानें योजिले आहेत. ते शिवकालीन बाळाजी आवजी वगैरे प्रमुख चांद्रसेनीय कायस्थांना मान्य झालेले होते. तेव्हां चांद्रसेनीय कायस्थ समंत्रक संस्कार करण्याचा आग्रह गेली दोन शें वर्षें कां धरीत आले आहेत? ह्या प्रश्नाचे उत्तर देण्यास, कायस्थ समाजाच्या राजकीय व सामाजिक इतिहासा कडे वळले पाहिजे.

१२ शक १५५० च्या पूर्वींचा **महाराष्ट्रांतील** चांद्रसेनीय कायस्थांचा सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय असा कोणता च दस्तऐवजी इतिहास उपलब्ध नाहीं. हे लोक महाराष्ट्रांत केव्हां व कोणत्या राजाच्या आश्रयानें प्रथम उतरले, तें कळण्यास नक्की साधन नाही. शक १५७० च्या सुमारास बाळाजी आवजीस चिटणिशी मिळाल्या पासून ह्यांचा इतिहास कळण्यास प्रारंभ होतो. तत्पूर्वी सर्व अंधार आहे. मंत्रवदुपनयनाचा आग्रह बाळाजी आवजीच्या पुढारपणा खालीं प्रथम शिवाजीच्या कारकीर्दीच्या शेवटास झाला बाळाजी आवजीची मंत्रवदुपनयना संबंधानें फिर्याद शिवाजीनें आपला पुत्र जो संभाजीराजा त्याजकडे सोंपविली, असा उल्लेख सांपडतो. संभाजीने चांद्रसेनीय कायस्थ क्षत्रिय नाहीत व मंत्रवदुपनयनार्ह नाहीत असा निकाल दिला. शिष्टाचाराने अमंत्रक उपनयन चांद्रसेनीयाना विहित आहे, असें गागा ह्मणतो. तदनंतर दुसरी मोठी फिर्याद नारायणराव पेशव्यांच्या प्रधानकीच्या वेळीं झाली. त्यांत चांद्रसेनीयांनी भाताचे पिंड वगैरे न करतां, शूद्रवत् आचार करावे, असा निर्णय झाला, तो कागदपत्रीं प्रसिद्ध आहे. शूद्रांना फक्त पांच संस्कार आहेत, व चांद्रसेनीयांना बारा आहेत, असें गागाभट्ट ह्मणतो.

परंतु नारायणरावाच्या कारकीर्दीत चांद्रसेनीयांची पिछेहाट शूद्रत्वा पर्यंत गेली. हा अन्याय झाला ह्यांत काडीमात्र संशय नाही. तिसरी मोठी फिर्याद इंग्रजी झाल्या वर प्रतापसिहाच्या कारकीर्दीत झाली तींत निश्चयात्मक असा कोणता च निर्णय झाला नाही. काशीत टकले वगैरे ब्राह्मणांनी चांद्रसेनीयांकरवी समंत्रक यज्ञ करविला, तो अशास्त्र करविला, अशी ही फिर्याद होती. तीत चिंतामणराव अप्पा पटवर्धन हे एका बाजूचे पुढारी होते व चिटणीस वगैरे चांद्रसेनीय दुसऱ्या बाजूला होते. मंत्रवत् संस्कार वगैरे करण्याचे अधिकार चांद्रसेनीयांना नाहीत, असे ब्राह्मणांचें पूर्वापार ह्मणणें आहे व तो अधिकार आपणाला आहे, असे चांद्रसेनीयांचें सध्यां ह्मणणें आहे. असा ह्या वादाचा थोडक्यांत इतिहास आहे.

१३ ह्या सामाजिक वादाचे राजकीय परिणाम मोठे विलक्षण व भयंकर झाले. चांद्रसेनीयांच्या वेदाधिकाराला संभाजीराजाने विरोध केला व तो सौम्य भाषेला सोडून केला. त्याचा परिणाम असा झाला की सर्व कायस्थमंडळ संभाजीच्या विरुद्ध गेले. शिवाजीच्या मृत्यूची बातमी वेळेवर संभाजीला कळली नाही. संभाजीच्या मनांत येऊं नये त्या मुत्सद्यां विषयीं संशय येत चालले. त्या संशयाला कायस्थ, ब्राह्मण, मराठे, स्त्रिया व पुरुष बळी पडले. कलुशा खेरीज संभाजीला विश्वासपात्र असा माणूस मिळण्याची पंचाईत पडली. शवटी शत्रूच्या हस्ते संभाजी मृत्यू पावला. ह्या सर्व क्रांतीला सामाजिक विषमतेचा जाच असह्य होऊन संतप्त झालेले कायस्थ कारण झालेले आहेत, अशी तत्कालीन राजकारणाचें अंतरंग बारकाईनें पाहून, माझी समजूत झालेली आहे. चांद्रसेनीयांच्या वेदाधिकाराला नारायणरावाने व तत्कालीन कांही ब्राह्मणांनी विरोध केला, त्याचा परिणाम असा झाला की रघुनाथराव दादाचा हस्तक जो सुमेरसिग त्याच्या द्वारा नारायणराव जिवास मुकला व मराठेशाहीत पंचवीस वर्षे यादवी माजली. कित्येक कायस्थ मित्राच्या सांगण्यांत असे येते की नारायणरावाच्या वधांत कायस्थांचा हात होता, आणि हे सांगण्यातील अर्थ अगदी संभवनीय दिसतो. रघुनाथरावदादाचा जीव कीं प्राण ह्मणजे सखाराम हरि गुप्ते. नारायणरावाच्या वधाच्या बाबतीत सखाराम हरीची सल्ला रघुनाथरावदादाला अवश्यमेव मिळाली असली पाहिजे. सातारच्या महाराजांच्या वतीने दुसऱ्या बाजीरावाच्या विरुद्ध चांद्रसेनीयानी इंग्रजांशी खटपटी केलेल्या महशूर आहेत. प्रतापसिहाच्या कारकीर्दीत कायस्थांनीं वेदोक्तप्रकरण इतकें वाढविलें कीं खुद्द प्रतापसिंहाला व मराठ्यांना वेदोक्तसंस्कारांचा अधिकार आहे की नाहीं या संबंधाने वाद सुरू झाला. आतांपर्यंत फक्त चांद्रसेनीय तेवढे वेदोक्तसंस्काराधिकारा करितां झगडत होते या पुढे या झगड्यांत सातारचे मराठे अजाणपणें चांद्रसेनीयाच्या खटपटीने गोविले गेले. वस्तुतः भोंसले व इतर मराठे क्षत्रिय असल्या मुळे वेदोक्तसंस्काराधिकार त्यांना पूर्ण होता. परंतु गैरसमजुती-

ने व पक्षाभिमानाने त्यांना तो अधिकार नाही असें, नाना सबबी काढून, प्रतिपादिले जाऊं लागलें. खुद्द छत्रपतींना या झगड्यांत गोविण्यांत चांद्रसेनीयांचा असा मतलब होता की मोठ्याच्या झगड्यांत आपल्या खऱ्या किंवा खोट्या अधिकारांचें संरक्षण, गाड्या बरोबर नळ्याच्या न्यायानें, सहजासहजी व्हावें. हा झगडा इतका विकोपास गेला की वाईच्या ब्राह्मणांनीं प्रतापसिंहाच्या पदच्युती करितां अनुष्ठाने आरंभिली. साताऱ्च्या राज्यात तट माजले; आणि या तटांच्या चुरशीत प्रतापसिंह राज्यभ्रष्ट झाला. दुर्दैवानें अद्याप हि हे वाद सुरू च असून त्यां तून शाबूत बाहेर पडण्याचा मार्ग कोणत्या हि एका पक्षानें अवलंबिला नाहीं.

१४ वाद वरवर उपचार करून मिटण्या सारखा नाहीं. त्याच्या मूळाशीं च हात घातला पाहिजे. शिवकाला पासून आजपर्यंत हा जो कायस्थब्राह्मणाचा झगडा चालला आहे, त्याचे अंतरंग काय ? वेदोक्तसंस्कार करण्याचा अधिकार आपणास हवा हा आग्रह गेल्या दोन शे वर्षे कायस्थ काय म्हणून करतात व दोन शें वर्षां पूर्वी ह्या आग्रहाला म्हणण्या सारखे रूप कां म्हणून आले नव्हतें, ह्या बाबीचा शोध केला पाहिजे, आणि अलीकडील दोन शे वर्षांत च कायस्थांनीं ही उचल कां केली व तीं महाराष्ट्रदेशांत च का केली, इतरत्र कां केली नाहीं, तें सूक्ष्मपणें तपासिलें पाहिजे. ही तपासणी व हा शोध केल्या विना ह्या भानगडीच्या प्रश्नाचा उलगडा होणार नाहीं.

१५ सध्यां महाराष्ट्रांत चांद्रसेनीयांची लोकसंख्या पंधरा वीस हजार आहे. शिवकाली ही संख्या पांच हजारांहून जास्त नसावी. तत्पूर्वी यादवांच्या अमदानीत म्हणजे शक १००० पासून शक १३०० पर्यंत ही संख्या हजार दीड हजाराला कमी च असावी.

१६ चांद्रसेनीयांची मुख्य वस्ती तळ कोंकणांत जंजिराश्रीवर्धना पासून महाडा पर्यंत व वरघाटीं पौडा पासून प्रचंडगड उर्फ तोरणा ह्या किल्या पर्यंतच्या टापूंत आहे. जंजिऱ्याच्या उत्तरेस व महाडाच्या दक्षिणेस आणि पौडाच्या उत्तरेस व तोरण्याच्या दक्षिणेस चांद्रसेनीय गेल्या दोन शें वर्षांत तुरळक तुरळक पसरले आहेत. तत्पूर्वी उपयुक्त टापूंत त्यांची वसती होती. त्यांतल्या त्यांत जंजिऱ्या पासून महाडा पर्यंत ची चांद्रसेनीयांची वसती पौडा पासून तोरण्या पर्यंतच्या वसतीच्या पूर्वीची आहे. म्हणजे चांद्रसेनीयांची मूळ वसती मराठी भाषा बोलणाऱ्या प्रांतांत जी झाली ती तळकोंकणांत जंजिऱ्या पासून महाडा पर्यंतच्या टापूंत प्रथम झाली. शक १००० च्या सुमारास जंजिऱ्या पासून महाडा पर्यंतच्या समुद्रकांठचा प्रदेश ठाणेकोंकणच्या शिलाहारांच्या अंमला खालीं होता व सह्याद्रीच्या पायथ्याचा व वरघाटचा प्रदेश शृंगारपूरच्या शिर्क्यांच्या ताब्यांत होता. शृंगारपूरचे शिर्के शिलाहारांचे मांडलिक होते. शिलाताम्र-

पट्टांत ह्या शिक्यांना श्रीक अशी संस्कृत संज्ञा आहे. शिलाहार हे विद्याधरवंशांतील असून शातवाहनांच्या अमदानीच्या सुमारास ह्मणजे सुमारे दीड दोन हजार वर्षांच्या सुमारास तळकोकणात व तगरप्रांतांत उतरले. शिलाहाराचा हा विद्याधर-वंश उत्तरहिंदुस्थानांत हिमालयाच्या पायथ्याकडील आहे. शिलाहारांच्या बरोबर उत्तरहिंदुस्थानांतून चांद्रसेनीय कायस्थांची कांहीं घराणी कोंकणांत आलेली असावी व ह्या मूळ घराण्यांची संख्या दहा बारा हून जास्त नसावी. गुप्ते, समर्थ, जयवत, हीं आडनांवें कायस्थांतली जुन्यातली जुनीं आहेत. नंतरची करणिक, अधिकारी, पतकी वगैरे जमीनमहसुलाच्या संबंधाने पडलेली आडनांवे होत. कुलकरणिक, ज्याचा अपभ्रंश सध्या कुळकर्णी झाला आहे, ह्मणजे च करणिक अधिकारी हा हि जमीनमहसुलासंबंधीचा च हुद्दा आहे. सध्यां हा शब्द कोंकणांत अदकारा ह्या अपभ्रष्ट रूपाने प्रचारांत आहे. कुळकरण व अधिकारीपण या नंतर ह्या लोकांनी महाडा पासून जंजिऱ्या पर्यंतच्या प्रदेशांत प्रभुपण मिळविलें. जसे देसाई, देशपांडे हे अधिकारी त्या च दर्ज्याचे जे अधिकारी असत त्यांना शिलाहारकली कोंकणांत प्रभु ह्मणत. जमीनमहसुलाच्या संबंधाचा कोकणांतला मोठ्यांतला मोठा हुद्दा झटला ह्मणजे प्रभुपणाचा होता. हा हुद्दा कायस्थानों जेव्हां मिळविला तेव्हां त्यांच्या ऐश्वर्याची परा सीमा झाली हा ऐश्वर्याचा हुद्दा कांहीं काल हातीं राहिल्या मुळे प्रभुपणाचा आधिकार असलेले सर्व चांद्रसेनीय आपणांस प्रभु या नांवानें कायमचे नावांजू लागले. चांद्रसेनीयांना प्रभु ही पदवी व संज्ञा प्राप्त झाल्या नंतर मुसुलमानी रियासत सुरू झाली. त्या रियासतीत इतर ब्राह्मणादि हिंदूंच्या प्रमाणे च प्रभूंचीं हि स्थित्यंतरे झालीं. प्रभुपणाची पदवी व मिळकत जाऊन, त्यां जवळ प्रभु हि संज्ञा मात्र राहिली. कालान्तरानें मुसुलमानी अंमलाची स्थिरस्थावरता झाल्या वर ह्या लोकांनी कोकण सोडून वरघाटी कुळकरणे व देशपांडेपणा मिळविला. नंतर मराठशाहीत चिटणिश्या, सबनिश्या वगैरे आणीक लहान मोठे हुद्दे ह्यांच्या पदरांत पडले; आणि सध्यां शेती व कारकुनी वगैरे क्षुद्र पांढरपेशी धंदे ब्राह्मणां प्रमाणे च हे हि लोक करीत आहेत.

१७ मुसुलमानांच्या अमलांत चांद्रसेनीयांचे जंजिऱ्यापासून महाडा पर्यंतच्या टापूंतील प्रभुपण ह्मणजे देसाईपण नाहींसे झाले व तें कोकणस्थांच्या व देशस्थांच्या हातीं गेले. कित्येक ठिकाणीं कुलकरण हि त्यांच्या हातचें ब्राह्मणांनीं हिरावून घेतले. याचा संताप कायस्थांना सहज च आला. धर्मशास्त्रा प्रमाणें व जातिविवेका प्रमाणें कायस्थ ह्यांची उपजीविका लेखनकर्मा वर निश्चित झालेली आहे. ते लेखनकर्म गावोगांवचे ब्राह्मणांच्या हातीं असलेले कायस्थांच्या असंतोषास प्रमुख कारण झाले. असंतोष सर्वस्वी न्याय्य होता, असे मात्र ह्मणतां येत नाहीं. कुलकरणादिलेखनकर्म धर्मशास्त्राने यद्यपि कायस्थाचे वतन आहे तत्रापि

देशांतील गांवगन्नांचीं सर्व कुलकरणें चालविण्या इतकी चांद्रसेनीयांची लोकसंख्या त्या काली नव्हती व अद्याप हि नाहीं. शिवकाली चांद्रसेनीयांची लोकसंख्या पांच चार हजार व शिलाहारकाली हजार दीड हजार असावी. हजार लोकसंख्या ह्मणजे त्यांतून कुलकरणाचें काम करण्यास लायक असे इसम फार तर दोन शें निघतात. इतक्या कायस्थां वर सर्व प्रांतांचा निर्वाह होण्या सारखा नव्हता. मग नागपुरा पासून कारवारा पर्यंतच्या व माहुरा पासून वसई पर्यंतच्या विस्तीर्ण मराठी मुलखाला हे दोन शें कायस्थ पुरणार कसे? अर्थात् च हजारों कुळकरणें खालच्या प्रतीच्या ब्राह्मणांच्या हातांत गेलीं. काय असेल ते असो, नागपूर, वऱ्हाड, खानदेश, देवगिरी, गोदातीर, गंगथड, भीमथड, कृष्णातीर दक्षिण कोंकण, तोरण्या खालील मावळें, कोल्हापूर, व इंद्रायणीच्या उत्तरे कडील मावळें यांत चातुर्वर्णिक हिंदूंची वसाहत होत असतांना कायस्थ जाति इतर जातीं बरोबर उत्तर हिंदुस्थानांतून दक्षिणेंत आली नाहीं. इतर जातीं बरोबर-खरें पाहिलें तर, ही हि जात यावी. ती न येण्याला कोणतीं प्रतिबंधक कारणें झालीं, ह्या बाबीचा छडा, समाजशास्त्राचा अभ्यास व इतिहाससाधनांचा शोध जसजसा जास्त होत जाईल तसतसा आस्तेआस्ते, लागत जाईल हें खरें; परंतु, सध्यां ह्या बाबी संबंधाने आपले अज्ञान आहे. जे कांहीं थोडे कायस्थ अपवादा दाखल आले ते कोंकणांत जंजिऱ्या पासून महाडा पर्यंतच्या टापूंत येऊन राहिले, इतकें मात्र निश्चितपणें ताडतां येते. यद्यपि कोंकणांत आलेल्या ह्या कायस्थांची संख्या तुटपुंजी होती, तत्रापि कुळकरणाचें कायस्थकर्म करणाऱ्या ब्राह्मणांची अवाढव्य संख्या पाहून, आपल्या जातीची पुढें धडगत नाहीं, अशी भीति काय, स्थांना फार पुरातन काला पासून वाटत होती, हें साहजिक आहे.

१८ याज्ञवल्क्यस्मृतींत 'कायस्थं न हि विश्वसेत्' असें घाक्य आहे. याज्ञवल्क्यस्मृति व ती वरील विज्ञानेश्वराची टीका महाराष्ट्रांत पुरातनकाला पासून प्रमाण धरतात. तींत जर वरील विधिवाक्य आज्ञा ह्मणून सांगितलेलें आहे, तर असें अनुमान करणें शक्य होते की उत्तर हिंदुस्थानांत कायस्थांच्या प्रामाणिकपणा बद्दल लौकिक अगदीं कमतर झाला होता आणि दक्षिणेंत आर्यांच्या वसाहती होत असतांना, कायस्थांना त्या वसाहतींतून अजीबात वगळण्यांत आलें. अन्यथा कायस्थांच्या दक्षिणेंतील अभावाची उपपत्ति समाधानकारक लागण्या सारखी नाहीं. महाडा पासून जंजिऱ्या पर्यंतच्या टापूंत चांद्रसेनीय कायस्थ व मुंबई पासून दमणपर्यंतच्या टापूंत चांद्रसेनीय पाताणे प्रभू एवढीं दोन कुळें तेवढी शिलाहारांच्या अमदानींत कोंकणांत आलेलीं आढळतात. बाकी महराष्ट्राच्या इतर सर्व प्रांतांत कायस्थांना पक्का काट मिळालेला दिसतो.

१९ न्याय, व्याकरण, वेदान्त, ज्योतिष, इत्यादि गंभीर शास्त्रांचा अभ्यास

जर धगळला, तर कुळकरण करणाऱ्या ब्राह्मणांत व कुळकरण करण्याचा जातिसिद्ध आधिकार असणाऱ्या कायस्थांत शिक्षणाच्या बाबतीत फारसा भेद नव्हता. ब्राह्मणांना जसे हिशेब लिहितां येत, तसे च कायस्थांना हि येत. खाण्यापिण्याच्या बाबतींत मात्र ह्या दोन जातीत भेद होता. मांसभक्षण कायस्थांत प्रचलित होतें व ब्राह्मणांत नव्हतें. ह्या दोन बाबी सोडल्या तर कायस्थांत व खालच्या गांवगन्नांच्या ब्राह्मणांत बिलकुल अंतर नव्हते. अर्थात् च, लोकसंख्येची वाढ कांही एका प्रमाणा पर्यंत झाल्या वर व लौकिक दर्जा, प्रभुपणा पर्यंत व राजाची चिटणिशी करण्या पर्यंत चढल्या वर, कायस्थाच्या मनांत वेदोक्त संस्कार करून घेण्याची आकांक्षा उत्पन्न होणे साहजिक होते. शिक्षणा बरोबर, लोकसंख्येचा जोर हवा तेवढा झाल्या बरोबर, व झगडा करण्याला पुरेसा लौकिक दर्जा प्राप्त होण्या बरोबर, वरिष्ट दर्जाच्या लोकांशी कनिष्ट दर्जाचे लोक स्पर्धा करण्यास उत्सुक होतात, ही बाब पृथ्वी वरील सर्व देशांत व सर्व समाजांत अनुभवास फार पुरातन काला पासून आलेली आहे. तो च अनुभव महाराष्ट्रांत गेल्या तीन शें वर्षे कायस्थांच्या बाबतींत उत्कटत्वानें येत आहे. ह्या जातिस्पर्धेच्या संकटांतून अद्याप हि आपण सुरक्षितपणे पार पडलों नाहीं.

२० शिलाहारांच्या अमदानींत कोंकणांत बद्धमूल होण्यांत तत्कालीन अल्पसंख्याक कायस्थांची सर्व शक्ति खर्ची पडली. मुसुलमानांच्या अमदानींत इतरां प्रमाणें च कायस्थ हि कसे तरी जीव धरून राहिले. त्या कालीं एक दोन ग्रामण्ये कायस्थां संबंधानें उद्भवलीं. परकीय अंमलाखाली राजबल कोणत्या हि एका पक्षाला नसल्या मुळें, त्या ग्रामण्यां पासून ह्मणण्या सारखी निष्पत्ति झाली नाहीं. ह्या कालांत जात्युन्नतीच्या कामांत चांद्रसेनीय कायस्थ संथपणें खटपट करीत होते. उत्तर हिंदुस्थानांतील कायस्थांना जातिविवेकाच्या प्रबंधांत प्रतिलोमसंकरांत गणिलेलें आहे. मुसुलमानी रियासतीच्या कालांत कोंकणांतील कायस्थांनीं आपणास अनुलोमसंकरांत समाविष्ट करून घेतलें. उत्तर हिंदुस्थानांतील कायस्थांची गणना शूद्रांच्या जवळ जवळ केली जात असे. कोंकणांतील चांद्रसेनीयांनीं रेणुकामाहात्म्यादि ग्रंथांच्या आधारा वर आपली स्थापना क्षत्रियोत्पन्नांत करून घेतली व ती गणना गागाभट्टा सारख्या अग्रगण्य धर्मशास्त्रवेत्याने मान्य केली. नंतर शिवाजीच्या व शंभुराजाच्या कारकीर्दींत वेदोक्तसंस्कारांची मागणी करण्याचा उपक्रम कायस्थांनीं केला. आपण केवळ क्षत्रियोत्पन्न नसून साक्षात् क्षत्रिय आहों, हा ह्या मागणीचा गर्भित अर्थ होता. तो संभाजीराजाला मान्य झाला नाही. कारण, पाटाची चाल कायस्थांत होती ती महाराष्ट्रांतील क्षत्रियांत नव्हती. पुढें पाट लावण्याची चाल कायस्थांनीं आपल्या समाजांत थोडीबहुत बंद केली. तत्रापि विधवांच्या केशवपनाची चाल चालू च होती. तो हि दोष कायस्थांनीं काढण्याला प्रारंभ केला व त्यांच्यातील बऱ्या च विधवा वपन करूं लागल्या. ह्या कामीं महारा-

ष्ट्रांतील मराठ्यांच्या वर कायस्थांची चढ झाली व ब्राह्मणांच्या जवळ जवळ कायस्थांनीं जात्युन्नतींत मजल गांठली. नंतर श्राद्धांतील भाताच्या पिंडाचा प्रश्न निघाला. अशी एकेक पायरी चढत चढत कायस्थांनी वेदोक्त संस्कार करून घेण्याला आपणांस जास्त जास्त लायक बनविलें.

२१ अश्या ह्या कायस्थसमाजाला वेदोक्तसंस्कारांचा अधिकार कसा द्यावा, हा प्रश्न गेलीं दोन अडीच शे वर्षे ब्राह्मण व क्षत्रिय समाजास पडला आहे. हा सामाजिक प्रश्न सुटत असतांना, संभाजीचा वध झाला, नारायणराव मारला गेला आणि प्रतापसिंह पदभ्रष्टता पावला. तडजोडीचे मार्ग व सामाजिक सुधारणेचे रस्ते न चोखाळल्या मुळें, भयंकर अनर्थ ओढवले. मनुयाज्ञवल्क्यादि धर्मशास्त्रकारांनीं घालून दिलेले परिपाठ ह्या काली लोप पावले होते व त्या परिपाठांचें पुनरुज्जीवन करण्याचें धैर्य महाराष्ट्रांतील ब्राह्मणक्षत्रियांना झालें नाहीं. मनु व याज्ञवल्क्य यांच्या काली कनिष्ठ संकरजातीतील इसमांची वरिष्ठ जातींत उन्नति होण्याची सोय समाजांत प्रचलित होती. ती सोय व ती सवड पुढें पुढें प्रचारांतून अगदीं गेली. ह्या उपयुक्त प्रचाराच्या नाशा मुळें, कनिष्ठ जातीतील इसमांना उन्नतीचा मार्ग कुंठित होऊन, राष्ट्राचें अपरंपार नुकसान झालें.

२२ मनु व याज्ञवल्क्य यांच्या कालीं कनिष्ठ जातीतील इसमांची वरिष्ठ जातींत उन्नति खालील पद्धतीने होत असे. समजा, ब्राह्मण पुरुष, व क्षत्रिय स्त्री यांच्या पासून एक मुलगा व एक मुलगी झाली. त्या संकरजातीय मुलीचें पाणिग्रहण जातिवंत ब्राह्मणानें केलें. त्या जोडप्याला पुनः मुलगी झाली. तिचें हि पाणिग्रहण पुनः जातिवंत ब्राह्मणाने केले. त्या जोडप्या पासून जी संतति— मुलगे व मुलग्या—होईल ती पूर्ण ब्राह्मणजातीय समजत. ह्मणजे तिसऱ्या पिढींत त्या संकरोत्पन्न संततीला शुद्ध ब्राह्मणत्व मिळे. कित्येक संकरांना पाच पिढ्यांत व कित्येक संकरांना सात पिढ्यांत मूळ वर्णांत समाविष्ट होतां येई. ही पद्धत मनु व याज्ञवल्क्य यांच्या कालीं प्रचारांत होती, यांत संशय नाहीं. समाजांत जी पद्धत चालू नसेल ती कायद्याच्या ग्रंथांत कायदा ह्मणून नमूद होणें व तो कायदा राजीखुषीनें समाजमान्य होणें शक्य नाहीं. ही पद्धत चालू असतां, कालान्तरानें आर्यसमाजांत एक स्थित्यंतर घडून आलें. तें स्थित्यंतर ह्मणजे वर्ण व जाती ह्या स्थिर झाल्या. ह्मणजे कनिष्ठ जातींतील इसम वरिष्ठ जातींत व वर्णांत चढण्याचा क्रम मागें पडत चालला. क्रम मागें पडण्याचें कारण मनुष्याची प्रकृतिसिद्ध माया ही होय. कोणत्या हि व्यक्तीनें वर्णोन्नति व जात्युन्नति व्यक्तिपुरती करून घ्यावयाची ह्मणजे त्या व्यक्तीला आपल्या मूळच्या कनिष्ठ जातींतील भाउबंधु, मातापिता व गणगोत्र यांना मुकावें लागे, आणि त्यांचे आचार त्यांचे विचार व त्यांची संगति सोडून द्यावी लागे, आईबापांची, बहीण-

भावांची व गणगोताची ही ताटातूट मायेला असह्य होऊन जात्युन्नतीचा व वर्णोन्नतीचा क्रम साहजिक च अस्तंगत झाला आणि होत्या त्या सर्व जाति स्थिर झाल्या. जातींत स्थैर्य येणें ह्मणजे जातिबाह्य शरीरसंबंध होण्याचें थांबणें आणि क्वचित् सहभोजनाला आळा पडणें. असा प्रकार हजार पंधरा शें वर्षें रूढ झाल्या वर कायस्थांचा हा वेदोक्तसंस्काराधिकाराचा प्रश्न मराठेशाहीच्या आरंभास निघाला. हा प्रश्न सुटावयाचा ह्मणजे मनु व याज्ञवल्क्य यांनी व्यक्तींच्या जात्युन्नत्यर्थ घालून दिलेल्या कायद्या हून निराळ्या अशा कायद्याचा आश्रय करणें भाग होतें. हा कायदा समाजप्रघात ह्मणून हिंदुसमाजांत हजार दोन हजार वर्षें रूढ हि होत होता. परंतु धर्मशास्त्राच्या ग्रंथांत नमूद झालेला नव्हता. समाजाच्या स्थित्यन्तरांना व गरजांना योग्य असें नवनवीन धर्मशासन निर्माण करण्याचा स्वभाव हि अनेक कारणांनी स्तब्ध झाला होता आणि मनु व याज्ञवल्क्य यांचा धर्मग्रंथांत जें नसेल तें धर्मशास्त्रांत नूतन धर्म ह्मणून आणण्याची समंजस संस्कारबुद्धि हि लोप पावलेली होती. अशा बुद्धिलोपाच्या व बुद्धिस्तंभाच्या कालीं कायस्थांचें वेदोक्तप्रकरण निर्णया करितां समाजा पुढें आलें, अर्थात् च त्याचा निकाल समंजसपणें व तडजोडीनें लागला नाहीं.

२३ संकरजातींतील व्यक्तींचा वरिष्ठजातींत समावेश होतांनां आप्तेष्टमांची ताटातूट होते ; सबब वरिष्ठजातींत चढण्याचा हव्यास सुटून, संकरजाति स्थिर झाल्या. जातीचें हें स्थिरीकरण होण्याच्या अगदीं प्रारंभास, आर्यांना हिंदुस्थानांत एक सामाजिक प्रश्न सोडविण्याचा प्रसंग आला. खुद्द हिंदुस्थानांत आर्यबाह्य असे लहानमोठे समाज आर्यांना भेटले. ह्या समाजांची संस्कृति आर्यसंस्कृती हून भिन्न व कनिष्ठ होती. कनिष्ठ संस्कृतीच्या ह्या रानटी समाजांनी श्रेष्ठ आर्यांचे आचार, विचार, धर्म, देव, थोडेफार ग्रहण केले. कालान्तरानें हे समाज थोडेफार आचाराविचारानें आर्यसम होत चालले. अशांची गणना आर्यसमाजांत ऊर्फ हिंदुसमाजांत कशी व कोठें करावी हा प्रश्न उपस्थित झाला. हा प्रश्न ह्या देशांतील भिल्ल, गोंड, कातकरी, धावड, मांग, चांडाल, इत्यादि मूळच्या अनार्यां संबंधाचा होता. त्या च सुमारास आर्यांना दुसरा एक सामाजिक प्रश्न सोडवावा लागला. भरतभूमीच्या बाहेरील, शक, यवन, बाल्हीक, वगैरे लोक आर्यदेशांत येऊन कायमची वसती करूं लागले, व आर्य आचार, विचार, देव व धर्म थोडेफार अनुकरूं लागले. ह्या भरतभूमिबाह्य लोकांची गणना हिंदुसमाजांत कशी व कोठें करावी, हा दुसरा प्रश्न उपस्थित झाला. आर्यावर्तांतील आर्यांच्या आधींचे मूळचे रानटी समाज व आर्यावर्ता बाहेरून आर्यावर्तांत कायमचे येऊन राहिलेले आगंतुक अनार्य समाज, असे दोन प्रकारचे समाज चातुर्वर्णिक आर्यांना भेटले. त्यांची व्यवस्था आर्यांनीं एणें प्रमाणें लाविली. ह्या दोन्ही प्रकारच्या समाजांच्या त्यांनीं जाति केल्या. ज्या

समाजाची वृद्धि फक्त बीजक्षेत्राचा व्यवहार समाजांतल्या समाजांत होऊन होते, अन्य कोणत्या हि रीतीनें होत नाहीं, त्या समाजास जाति ह्मणतात. आर्यावर्तांतील चातुर्वर्णिक आर्यांच्या संगतीला आर्यबाह्य असा आंतर किंवा बाह्य असा जो जो समाज आला त्या त्या समाजाची आर्यावर्तांत जाति बनली व जाती बनत आहे. अशी अभेद्य जाति बनली व त्या जातीनें आर्यांचे आचार, विचार, देव व धर्म कोणत्या हि लहानमोठ्या प्रमाणानें स्वीकारिले, ह्मणजे त्यांची गणना आर्य हिंदुत्वांत करतात. हिंदुसमाजांत बाह्यांचा समावेश सबंद जात ची जात घेऊन होतो, जातीतील तुटक व्यक्ती घेऊन होत नाहीं. ख्रिस्ती, मुसुलमान व बौद्ध समाजांत बाह्यांचा समावेश आप्तेष्टतमांची ताटातूट होऊन व्यक्ति ह्या नात्यानें होतो. हिंदुसमाज आप्तेष्टतमांची निर्दयपणें ताटातूट न व्हावी ह्मणून गणगोता सुद्धां सबंद जात ची जात हिंदुत्वांत समाविष्ट करून घेतो. नवरा, बायको, आई, बाप, मुले, लेकरें, यां सुद्धां ख्रिस्ती समाजांत अंतर्भूत होण्याची कोण्या व्यक्तीनें इछा केली तर ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतां क्षणीं नवरा, बायको, आई, बाप, मुले व लेकरें हीं एकमेकांचीं भावंडें ठरतात व त्यांचे पूर्वीचें नवराबायको वगैरे संबंध तुटतात. असला निर्दय प्रकार हिंदुसमाजाला बघवत नाहीं, मग मानवणार कोठून? जात होऊन जो समाज हिंदुत्वांत समाविष्ट होऊं पहातो त्याच्या ठाई एक असाधारण गुण असावा लागतो. त्या जातीने गोहत्यापूर्वक गोमांस–भक्षण करण्या पासून परावृत असले पाहिजे. सांगण्याचा मुद्दा काय कीं, हिंदुसमाज सबंध जाति ओळखतो, व्यक्ति ओळखत नाहीं. हिंदुसमाजांत सुधारणा करावयाची किवा संस्कार करावयाचा ह्मणजे त्यांतील सबंध जातीला एकेक राशि कल्पून व्यवहार करावा लागतो. देशांतील रानटी समाज असो किंवा परदेशस्थ आगंतुक समाज असो, त्याची स्वतंत्र एक जाति करून द्यावयाची किंवा होऊं द्यावयाची आणि आस्तेआस्ते गोमांसनिवृत्यादि प्रचार त्या जातींत रूढ झाले ह्मणजे त्यांची हिंदुत्वांत गणना करावयाची, असें हे नवीन समाजसमावेशनतत्व मनुयाज्ञवल्क्या नंतर आर्यलोकांनीं शोधून काढिलें. चातुर्वर्ण्यबाह्य अशा देशज व आगंतुक अनार्य समाजांचें हिंदुत्वांत समावेशन करतांना आर्यांना ही कॢप्ति सुचली. ती कॢप्ति त्यांनीं संकरांना लावून त्यांच्या स्वतंत्र जाती बनविल्या. संकरजातीत व अनार्य जातींत भेद एवढा च कीं संकरजाती मूळपासून चातुर्वर्ण्यांतर्गत आहेत आणि अनार्य जाती चातुर्वर्ण्यबाह्य आहेत. महार, मांग, पुक्कस वगैर जातींना अनार्य, अंत्यज, बाह्य वगैरे संज्ञा लाविलेल्या संस्कृत धर्मग्रंथांत पदोपदीं आढळतात.

२४ तात्पर्य, हिंदुस्थानांत व्यक्तिमाहात्म्या पेक्षां जातिमाहात्म्य बलवत्तर आहे. यूरोपीयन समाजात व्यक्तिस्वातंत्र्य आहे; हिंदुस्थानांतील समाजांत

जातिस्वातंत्र्य आहे. यूरप प्रायः व्यक्तींना ओळखतो; हिंदुस्थान प्रायः जातींना ओळखतो. धर्मशास्त्रांत जातिधर्म व गणधर्म असे शब्द येतात. पैकीं गणधर्मांतील गण हा शब्द यूरोपीयन समाजशास्त्रांतील व्यापार, युद्ध, शिक्षण, वगैरे व्यवहारांतील Voluntary Association या संज्ञेचा वाचक आहे. जातिधर्मांतील जाति या शब्दाचा वाचक शब्द यूरोपीयन समाजशास्त्रांत मुद्दलांत च नाहीं. कारण, वर्तमान यूरोपियन समाजांत जाती च नाहीत. तेव्हां तद्वाचक शब्द येणार कोठून व त्याच्या गुणधर्मांचें विवेचन होणार कोठून? जाति या शब्दाला यूरोपीयन समाजशास्त्रीय प्रतिशब्द बनवावयाचा ह्मणजे inborn involuntary association' असा शब्द बनविला पाहिजे. जाति ही involuntary association असून, शिवाय by birth alone होणारी association आहे. सारांश, अनैच्छिक जन्मसिद्ध जो पोटसमाज तो जाति होय. सर्व हिंदुसमाज अनैच्छिक जन्मसिद्ध समाज च बव्हंशाने आहे. परंतु, ह्या व्यापक समाजांत, अनार्य समाजांचा, जातींत विपरिणमन होऊन, आस्तेआस्ते समावेश होऊं शकतो. तसा प्रकार पोटजातींत होत नाही. कोणत्या हि पोटजातीत कोणता हि आर्य किंवा अनार्य समाज कोणतें हि विपरिणमन होऊन समाविष्ट होऊं शकत नाही.

२५ जाती स्थिर झाल्या वर, त्यांतील व्यक्तींस व्यक्ति ह्या नात्यानें, उन्नति करून घेण्यास मार्ग राहिला नाहीं. उन्नति करून घ्यावयाची असेल, तर जातिद्वारा ह्मणजे सबंद जातीची उन्नती करून तिच्या बरोबर व्यक्तीची उन्नती करून घेण्याचा मार्ग तेवढा मोकळा राहिला. तो मार्ग चांद्रसेनीयांनीं लोकसंख्येचें व लौकिक दर्ज्याचे बल शिवराजकाली वाढल्या वर चिकाटीने धरला, परंतु गेली अडीचशे वर्षें त्यांत त्यांना यश आलेले नाहीं. ह्याला कारण, ब्राह्मणांचा हट्ट व अज्ञान. जाति ह्या यावच्चंद्रदिवाकरौ स्थिर रहाणार व त्यांना कधीं काळीं जे कांहीं धर्म व अधिकार घालून दिले होते, त्यांत काडी मात्र फेरबदल होणें शक्य नाहीं, फेरबदल केला तर अधर्म होतो, अशी ब्राह्मणांची दृढ समजूत. मनुयाज्ञवल्क्यांनीं तीन पिढ्यांनीं किंवा पांच पिढ्यांनीं किंवा सात पिढ्यांनीं व्यक्तीची जात्युन्नति योग्य मार्गांनीं होण्याचा उपाय नमूद करून ठेविला होता. तो उपाय माजी पडून शेकडों वर्षें लोटलीं होतीं. जाती स्थिर झाल्या मुळें, आहे त्या जातीचे धर्म आचरीत व्यक्तींनीं कुजत पडावें, उन्नतीची अपेक्षा करूं नये, अशी समजूत झाली होती. कायस्थ, तरी, आपली कायस्थजात सोडण्याची इच्छा करीत होते, अश्यांतला प्रकार नव्हता. त्यांचें मागणें एवढें च होतें कीं आपणांस कायस्थजातींत च राहून क्षत्रियांचे किंवा ब्राह्मणांचे धर्म आचरण्याची परवानगी व मोकळीक असावी. विद्येंत गांवगन्नाच्या कनिष्ठ प्रतीच्या ब्राह्मणांच्या बरोबरीचे आपण आहों व

क्षात्रगुणांत कनिष्ठ क्षत्रियांच्या तोडीचे आपण आहों, अशी कायस्थांना स्वतः बद्दलची खात्री वाटत होती व त्या खात्रीच्या बळावर क्षात्रधर्म व ब्राह्मणधर्म आचरण्याची ते उमेद बाळगूं लागले होते. ह्या उमेदीचे पोषण करणें ब्राह्मणांचें कर्तव्य होते. कायस्थांनीं यावच्चंद्रदिवाकरौ आहेत ते धर्म व आचार करीत रहावें, असा ब्राह्मणांचा आग्रह पडला. जुन्या रस्त्यानें च नवीन धर्मशासनाची निर्मिति करून नवीन उमेदीची व आकांक्षांची तृप्ति करण्याची संवय ब्राह्मणांची नष्ट झालेली होती. जातींच्या कृत्रिम स्थैर्या बरोबर धर्मशासननिर्मितीला हि स्थैर्य आलें. हे स्थैर्य समाजाच्या जंगमतेच्या व प्रगतीच्या विरुद्ध असतें.

२६ बीजक्षेत्राच्या शुद्धतेच्या अपरंपार चाडी मुळें आर्यसमाजांत संकर उत्पन्न झाले आणि अनार्य समाजांच्या जाती बनून हिंदुसमाजांत वावरूं लागल्या. संकरव्यक्तींना बीजक्षेत्रशुद्धि होऊन मूळ जातींत पांचसांत पिढ्यांनी परततां येत होतें, तें, संकरजाती मायेच्या बंधनास्तव व अनार्य जातींच्या धर्तीवर स्थिर व अभेद्य झाल्या मुळें, बंद पडलें. कांहीं काल हें स्थैर्य सुखावह व व्यवस्थित वाटलें. परंतु कालान्तरानें ही हि स्थिर स्थिति जाचक भासूं लागली. ज्या संकरजाती विद्येने, आचारानें व बीजक्षेत्रानें ब्राह्मणांच्या किंवा क्षत्रियांच्या किंवा वैश्यांच्या समीपतर होत्या त्यांना स्वतःच्या स्थिर जातींत राहून हि ब्राह्मणांचे किंवा क्षत्रियांचे किंवा वैश्यांचे सर्व धर्म आचरण्याची उत्कट इच्छा होणें अगदीं स्वाभाविक होतें, इतकें च नव्हे तर, तशी धर्मोन्नती करून घेण्याचा त्यांना हक्क होता. ह्या हक्क मान्य न करण्यांत धर्माधिकाऱ्यांची व ब्राह्मणक्षत्रियांची मोठी चूकी झालेली आहे. हा हक्क कायस्थांना अवश्यमेव दिला पाहिजे, व तो होतां होईल तों ताबडतोब दिला पाहिजे. विद्येनें, शिक्षणानें व आचारानें कायस्थ ब्राह्मणक्षत्रियांच्या बहुतेक बरोबरीचे होऊन आज अडीच शे वर्षें लोटून गेलीं. शिवाय, संकर जरी झाले तरी ते आपल्या च हाडामासांचे आहेत, अनार्य हाडामासांचा अणुरेणु हि त्यांच्या ठाईं नाहीं. तशांत, पन्नास पन्नास पिढ्या बीजक्षेत्राच्या दृष्टीनें ह्या संकरजाती शुद्ध राहिल्या आहेत. सारांश, त्रैवर्णिकांचे धर्म आचारण्यास कायस्थ जाती बहुतेक सर्वतोप्रकारें योग्य झाली आहे. तिला ती मागते ते हक्क देणें सर्वस्वी न्याय्य होईल.

२७ आतां पर्यंत कायस्थांच्या मागण्यांना विरोध करण्यांत, ब्राह्मणांना अशी भीति वाटत असे कीं कायस्थांची एकेक मागणी पुरवितां पुरवितां, त्या मागणीची सीमा ब्राह्मणपणाचा हक्क मागण्या पर्यंत जाईल. ती सीमा गांठण्याचा काल कधीं च येऊं नये, एतदर्थ कायस्थांच्या पहिल्या अल्पस्वल्प मागण्यांना हि त्यांनीं प्रतिरोध केला. त्या प्रतिरोधांत ब्राह्मणक्षत्रियांच्या राज्याचा विध्वंस झाला आणि दंडधारी राज्यसत्तेच्या माठिंब्यानें जे धर्मशासन शक्य व्हावयाचें तें धर्म-

शासन हि हातचें निघून गेलें. आतां अशी विचित्र स्थिति ओढवली आहे कीं, कायस्थांच्या ह्या हक्काच्या मागण्या पुरवावयाच्या त्या कोणत्या संस्थेनें? शंकराचार्यादींचीं धर्मपीठें आहेत, त्यां वर अजाण भटभिक्षुक क्षुद्रपणें विराजत आहेत. कायस्थांच्या मागण्यांचें स्वरूप काय, त्यांचा इतिहास काय, त्यांना प्रतिरोध केला त्याची फळें काय, व त्या पुरवावयाच्या कशा, ह्या बाबी संबंधानें आचार्यांच्या ठाई व आचार्यांच्या सल्लागारांच्या ठाई पूर्ण अज्ञान आहे. ज्ञाते आचार्य पीठस्थानापन्न जेव्हां केव्हां होतील तों पर्यंत निकालाची वाट पहात बसण्याचें कायस्थांनीं मनांत आणिलें तत्रापि परिस्थिति त्यांस वाट पहात बसूं देणार नाही. कारण, ज्या ब्राह्मणांचें अनुकरण कायस्थ करूं इच्छितात, त्यांच्या पैकीं कित्येकांनी चातुर्वर्ण्य सोडून एकवर्णाचा स्वीकार केला आहे. ब्राह्मण किंवा क्षत्रिय ह्यांचे धर्म प्राप्त व्हावे ह्मणून कायस्थांनीं आपल्यातील पाटाची चाल बंद केली, तर इकडे कित्येक ब्राह्मण आपले गतभर्तृकांचे पाट लावून टाकण्यांत प्रौढि मिरवूं लागले आहेत. ज्या श्राद्धांतील भातांच्या पिंडा करितां कायस्थांनीं इतका अट्टाहास केला त्या श्राद्धांना च अजिबात कित्येक ब्राह्मणांनीं काट दिला आहे. दंडवताच्या ऐवजीं जो नमस्कार करून घेण्या करितां कायस्थांनी एवढे रण माजविले, त्या नमस्काराला रामराम ठोकून, ब्राह्मण हस्तांदोलन करण्यांत फुशारकी मारीत आहेत. जे ब्राह्मणी पागोटें मस्तका वर चढविण्या करितां कायस्थ दोन शें वर्षे हैराण झाले, तें पागोटें फेकून देऊन, ब्राह्मणांनी किरिस्तावांची शिपतरे डोईस चढविली आहेत. अशा काळीं ह्मणजे ज्यांच्या करितां मागण्यांचा हट्ट धरिला त्या हक्कांची किंमत ब्राह्मणांना बिलकुल वाटत नाहीशी झालेल्या काळांत, कायस्थांची अवस्था त्रिशंकुवत् होणे साहजिक आहे. ज्या तीराला पोहोंचण्या करितां नदींत उडी घेतली तो तीर च ढांसळून विरत आहे सा दिसतो. ब्राह्मणांतल्या प्रमाणें खुद्द कायस्थांत हि चातुर्वर्ण्यद्वेष्टे व जातिविध्वंसक लोक निपजत आहेत. असा हिंदुसमाजांत मोठा उत्पात प्रवर्तला असतां, भांडण्यास हक्क कोठे राहिले व निकाल देण्यास संस्था कोणती आहे? जात्यभिमान ज्यांचा सुटला त्यांना जात्युन्नति ह्या शब्दांत अर्थ च रहात नाहीं.

२८ असले अनेक प्रश्न उद्भवतात. त्यांना उत्तर एवढें च कीं निरनिराळ्या सर्व जातींतून अल्पस्वल्प इसमांची एकवर्णाकडे यद्यपि धांव स्पष्ट दिसत आहे, तत्रापि प्रत्येक जातींतील बहुसंख्याक लोक आपापल्या जातीचे अभिमानी आहेत. त्यांना स्वजातींत राहून जातिधर्माची उन्नती करून घ्यावयाची आहे. एकवर्णी सुधारक परकीय सरकारा कडून व संस्थानिकां कडून सामाजिक कायदे ज्या प्रमाणें करून घेऊं लागले आहेत, त्या प्रमाणें चातुर्वर्ण्याभिमान्यांनी व जात्यभिमान्यांनीं आपापल्या इष्टाच्या साधनार्थ सामाजिक कायदे परकीय सरकारा कडून तरी करून घेतले पाहिजेत किंवा स्वतःची धर्मपीठें जागृत व कर्तीं बनवून त्यांच्या कडून तरी

सामाजिक कायदे घडवून आणिले पाहिजेत. जात्याभिमानी केवळ स्वस्थ बसले आणि उपस्थित झालेल्या सामाजिक प्रश्नाच्या सोडवणुकेची टाळाटाळ करू लागले तर कार्यकर्ता जो एकवर्ण्याचा सुधारक नावाचा समाज त्याची छाया सर्व हिंदु समाजावर पडून, जाति, चातुर्वर्ण्य, वंशशुद्धि, वेदप्रामाण्य, अथवा ज्याला हिंदुत्व व हिंदुसंस्कृति म्हणून म्हणतात तें सर्व थोड्या च कालात अस्तगत होईल. कायस्थांची जातिधर्मोन्नति करण्याच्या कामांत तडजोड न झाल्यामुळे स्वराज्यास आपण मुकलो. आतां, एकवर्णाच्या वावटळींत समंजसपणे वाट न काढिली, तर आपण हिंदुसमाजास हि गमावून बसूं.

वि. का. राजवाडे



# हिंदू शब्दाचा इतिहास

१ पौराणिक भूगोलांत जंबुद्वीपाच्या पश्चिमेस लागून असणाऱ्या एका प्रांतास इंद्रद्वीप अशी संज्ञा दिलेली आढळते. सध्याच्या अफगानिस्तानाच्या पूर्वेकडील व काश्मीरच्या पश्चिमे कडील जो प्रांत त्याला च पौराणिककाली इंद्रद्वीप ह्मणत. ग्रीक, पारसीक, मेद, असुर, पर्शु, वगैरे लोकांना आर्यावर्ताच्या सरहद्दीस पहिला जो प्रांत लागे तो हा इंद्रद्वीप प्रांत लागे त्या मुळे, आफगानिस्तानाच्या पश्चिमे कडील सर्व ज्ञाताज्ञात देशास हे आर्यबाह्य लोक पुरातनकाली इंद्रद्वीप या नांवाने ओळखीत. इंद्रद्वीप या संस्कृत शब्दाचा प्राकृत अपभ्रंश इंददीअ. इंददीअ या प्राकृत शब्दाचा ग्रीक अपभ्रंश इंदीअ, आणि पारसी अपभ्रंश हिंद. हिंद देशांत जे राहणारे ते हिंदू व हिंदूंचा जो देश तो साकल्याने हिंदुस्थान.

२ इराण, आफगानिस्थान व सीस्तान या प्रांतांतील लोकास भरतखंडांतील लोक हिंदू या नांवानें आतां पर्यंत फार काला पासून माहीत आहेत. हिंदूंत सनातनधर्मी, जैन, व लिंगायत या सर्वांचा अंतर्भाव करीत. वैदिक, पाखंडी एकवर्णी व चातुर्वर्णिक, या सर्वांना ते हिंदू च ह्मणत. आणि ह्या वैदिकादि समाजांचा त्या कालीं शेकडा नव्याण्णव भरणा देशांत असल्या मुळे ह्या सर्व लोकांना हे बाह्य लोक हिंदू या संज्ञेनें ओळखीत. भारतवर्षांतील लोकांत निरनिराळे देवधर्मपंथ आहेत. हे यद्यपि त्यांना थोडेफार कळे, तत्रापि ह्या सर्व लोकांच्या देवधर्मांना एक कल्पून ते हिंदुधर्म या शब्दाचा उपयोग करीत. मुसुलमानधर्मा हून भिन्न ह्मणजे हिंदुधर्म, अशी त्यांची समजूत असे. वास्तविक पहातां वैदिक, जैन, लिंगायत या समाजांचे देवधर्म अगदी भिन्न भिन्न आहेत. ही बाब लक्ष्यांत, न घेतां, हिंदूधर्म हा शब्द त्यांनीं निर्माण केला. ह्या शद्बाने अमुक एक

विशिष्ट वस्तू निर्दिष्ट होत नाहीं, हें आपण जाणतो. परंतु मुसुलमानलोकांना हें ज्ञान नव्हतें, असे हिंदुधर्म या शब्दाच्या त्यांनी केलेल्या प्रयोगा वरून स्पष्ट दिसते. मुसुलमानांचा हा प्रयोग त्यांच्या नंतर आलेल्या यूरोपियनांनीं हि उचलला. सध्यां, यूरोपियनांचे अनुकरण करून आपल्या इकडील कांहीं लोक हिंदुधर्म हा योजतात. परंतु, हिंदुस्थानांतील सर्व हिंदूचा ज्या अर्थी एक च देवधर्म नाही, त्या अर्थीं हिंदुधर्म अशी वस्तु जगतांत बिलकुल नाहीं, ह्याचें भान असलेलें फार च थोड्या लोकांच्या ठाई आढळून येते.

३ हिंदुधर्मशास्त्र असा हि शब्द प्रचारात आहे. ह्या सामासिक शब्दांतील धर्म या शब्दाचा अर्थ उपरिनिर्दिष्ट हिंदुधर्म या सामासिक शब्दांतील धर्म ह्या शब्दाच्या अर्था हून निराळा आहे. हिंदुधर्म या शब्दांतील धर्म या शब्दाचा अर्थ देवधर्म ऊर्फ Religion असा आहे; आणि हिंदुधर्मशास्त्र या सामासिक शब्दांतील धर्म या शब्दाचा अर्थ कायदा (Law) असा आहे. हिंदुधर्मशास्त्र असा शब्द संस्कृतांत नाही कारण मूळांत च हिंदु हा शब्द संस्कृत नाही. हिंदुधर्मशास्त्र हा सामासिक शब्द Hindoo Law या इंग्रजी शब्दांचें भाषान्तर आहे. इंग्रज लोक ज्याला Hindoo Law ह्मणतात त्याला संस्कृतांत मानवधर्मशास्त्र हा शब्द आहे. मानव ह्मणजे चातुर्वर्णिक आर्य. मानवधर्मशास्त्रा पैकी व्यवहारधर्म जो आहे त्याला वैशेष्ये करून इंग्रज लोक Hindoo Law ह्मणतात.

४ मानवधर्मशास्त्र चातुर्वर्णिक आर्या करितां आहे, अनार्यां करितां नाहीं. चातुर्वर्णिक आर्या तून जैन, बौद्ध, लिंगायत, मानभाव, इत्यादि पाखंडें जेव्हां निघाली, तेव्हां त्या पाखंडांना सबंद मानवधर्मशास्त्र लागू पडत नाहीसें झालें. जैनादि पाखंडी एकवर्णी होते. त्यांना मानवधर्मशास्त्रांतील जातिधर्म, वर्णधर्म व आश्रमधर्म लागू पडत नसत. फक्त व्यवहारधर्म लागू पडत. अशा ह्या पाखंड्यांचा चातुर्वर्णिक आर्यांशीं शरीरसंबंध बंद पडल्या मुळें, कांही पाखंड्यांच्या पुढें कांहीं कालाने जाति बनल्या.

५ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या त्रैवर्णिकांना आर्य ही संज्ञा असे. पुढें चवथा वर्ण शूद्रांचा येऊन आर्य चातुर्वर्णिक झाले. नंतर या चारी वर्णांत अनुलोमप्रतिलोम संकर होऊन संकरजाति निर्माण झाल्या. ह्या संकरजाती चातुर्वर्णिकांच्या बीजक्षेत्राच्या असल्या कारणाने, यांना शुद्ध आर्य संकरजाति ह्मणूं लागले. कालान्तरानें, नाग, भिल्ल, कातकरी, वगैरे अनार्यांशीं शरीरसंबंध होऊन आर्यानार्य संकरजाति निष्पन्न झाल्या. त्यांना अंत्यज ही संज्ञा मिळाली. अंत्यज आर्यानार्यसंकरज असल्या मुळें, त्यांना आर्य ही संज्ञा देत नसत. एणे प्रमाणें, शुद्ध चातुर्वर्णिक आर्यजाती, शुद्ध संकरजाती व आर्यानार्यसंकरज अंत्यज जाती भारतवर्षांत नांदूं लागल्या. त्यांच्या च जोडीला जैनजाति व लिंगायतजाती वगैरे पाखंडजाती हि सुखानें राहूं लागल्या. आणि ह्या सर्व जाती ज्या अर्थी मानवधर्मशास्त्रांतर्गत व्यवहारधर्मानें ह्मणजे Hindoo

Law नें दायविभागादि व्यावहारिक निर्वाह करूं लागल्या, त्या अर्थी समग्र मानव धर्म पाळणाऱ्या चातुर्वर्णिकांना जें आर्य हें वंशबोधक उपपद लावीत तें उपपद फक्त व्यवहारधर्म तेवढे पाळणाऱ्या आर्यानार्य व पाखंड जातींना लावणें अयुक्तिक व अनन्वर्थक भासूं लागले. तेव्हां शुद्ध आर्यजाती, शुद्ध संकरजाती, आर्यानार्य अंत्यज जाती व पाखंड जाती, ह्या सर्वांचा समावेश एका संज्ञेत कसा करावा, ही विवंचना पडली. ती विवंचना हिंदू ह्या शब्दाने घालविली. परकीय सर्व लोक भारतवर्षातील सर्व जातिबद्ध समाजांतल्या व्यक्तींना हिंदू या नांवानें ओळखीत असत. मुसुलमान अंमलांत व इंग्रजी अंमलांत येथील जातिबद्ध समाजाला व तदंतर्गत व्यक्तींना हिदू हें नांव मिळालें व जातिबद्ध हिंदूंची च लोकसंख्या या देशांत बाहुल्याने असल्या मुळे, ह्या देशाची हिंदुस्थान अशी प्रख्या झाली.

६ वरील विवेचनाच्या आधारानें, हिंदू कोणाला ह्मणावें, हा प्रश्न सोडविण्यास सुलभ जाईल. जी कोणी व्यक्ति जातिबद्ध असेल व जिचा निर्वाह मानवधर्मशास्त्रांतर्गत व्यवहारधर्मानें होतो, त्या व्यक्तीचा हिंदू ह्या उपपदा वर निसर्गसिद्ध हक्क आहे. जातिबद्ध असणें ह्मणजे जन्मानें ( आणि दुसरें कशानें नव्हे ) जाती प्राप्त करून घेणे. पारशी व यहुदी हे समाज जातिबद्ध आहेत, परंतु मानवधर्मशास्त्राने त्यांचा व्यवहारनिर्णय होत नाहीं, सबब, ते हिंदू नाहीत. बोहरी दायविभागादिनिर्णयांत मानवधर्मशास्त्राची अनुज्ञा पाळतात, परंतु जितकी जातिबद्धता पाळावी तितकी मुसलमानधर्माच्या अनुज्ञेनें पाळीत नाहींत, सबब ते हिंदू नव्हत. वडारी हा अनार्य समाज जातिबद्ध आहे व दायविभागादिव्यवहार मानवधर्मशास्त्रा प्रमाणे करतो, सबब तो हिंदू आहे.

७ चातुर्वर्णिक आर्यजाति, शुद्ध संकरजाति व अंत्यज जाति ह्या सर्व जाती सनातनधर्मी आहेत. जैन व लिंगायत हे पाखंड आहेत. आणि ह्या भिन्न देवधर्मांच्या जातींना हिंदू ही एक च संज्ञा आहे. तेव्हां निरनिराळे देवधर्म ज्या हिंदू मध्यें आहेत, त्यांचा एक च देवधर्म कल्पिणें व त्या कल्पित देवधर्माला हिंदुधर्म असें नांव देणे आणि नंतर हिंदुधर्म या काल्पित वस्तूची व्याख्या करीत बसणे, ह्या स्खलिताला काय ह्मणावें ? अलीकडे दहा वीस वर्षे हिंदुधर्माचें लक्षण बांधण्यांत व हिंदू कोणाला ह्मणावें हा प्रश्न सोडविण्यांत कांही लोक गुंतलेले दिसतात. हिंदुधर्माचें लक्षण बांधावयाच्या ऐवजी सनातनधर्माचे लक्षण रा. टिळक यांनी बांधिलें. जो आपणाला हिंदू ह्मणेल तो हिंदू समजावा, असा एकानें निर्णय दिला. आणि ह्या उत्तरांनीं कोणाचे च समाधान झाले नाही कारण हिंदुधर्म ही वस्तु अस्तित्वांत नसल्या मुळें लक्षणक्षम नव्हती.

८ जातिबद्ध असणें व मानवधर्मांतर्गत व्यवहारधर्मानें निवाडा करून घेणें, हें, हिंदुत्वाचें अनन्यसामान्य लक्षण आहे. हें लक्षण पंजाबांतील आर्यसमाज,

बंगाल्यांतील ब्रह्मोसमाज व महाराष्ट्रांतील प्रार्थनासमाज, यांतील व्यक्तींना कित-पत लागू पडत ते पाहूं. आर्यसमाज, किंवा ब्रह्मोसमाज किंवा प्रार्थनासमाज ह्या पैकी प्रार्थनासमाज हा अद्याप हिंदूसमाजा पासून अगदी विलग असा बनला नाहीं. त्यात असणारे ब्राह्मण, शेणवी, मराठे व महार अद्याप आपापला शरीर-संबंधादि व्यवहार आपापल्या जातींत राहून च करीत आहेत. अद्याप त्यांनीं पूर्वीच्या जाती सोडलेल्या नाहीत. जाती पूर्ण सोडल्या नंतर त्यांचा विचार करणें योग्य होईल. ही च टीका कमजास्त प्रमाणाने बंगाल्यांतील ब्राह्मो ना हि लागू पडते. पंजाबांतील आर्यसमाजाची स्थिती ह्या दोहो हून बरी च भिन्न आहे. ह्या समाजांत मुसुलमान्, यूरोपियन् वगैरे बाह्यांचा धर्मदीक्षेनें समावेश होतो. प्रथमारंभीं जैन, बौद्ध, इत्यादि संप्रदायांत ज्या प्रमाणें धर्मदीक्षेने बाह्यांचा समावेश होत असे व सध्यां मुसुलमान, ख्रिश्चन, यांच्यात ज्या प्रमाणें बाह्यांचा समावेश होतो, त्या प्रमाणे अद्याप आर्यसमाजाची वृद्धि बाहेरून होत आहे. आर्यसमाज केवळ अंतर्वृद्धीने वाढत नाहीं. हा समाज वैदिक परंपरा व दायविभागादि व्यवहार मानवधर्मशास्त्रानुरोधाने करीत आहे. तत्रापि अद्याप जातिबद्ध नसल्या मुळे, या समाजाची गणना प्रार्थना समाजादि नवीन पाखंडांत च करावी लागेल. कालान्तरानें जैनादि पाखंडसमाजा प्रमाणे आर्यसमाज जातिबद्ध झाला ह्मणजे त्याला जातिबद्ध पाखंडी हिंदू समाज असे अभिधान प्राप्त होईल. मानभावसंप्रदाय अद्याप जातिबद्ध नाहीं. त्याचे उपदेशिक आपापल्या मूळच्या जातींत मानभावोपदेश घेऊन रहातात महंतपणा वाटेल त्या इसमाला उपदेशाने येतो, जन्मानें च केवळ येतो असे नाहीं. तेव्हां हा संप्रदाय जातिबद्ध नसलेल्या पाखंडी हिंदूंत मोडतो.

९ मूळ आर्यावर्त्तांत आर्यलोक व सनातनधर्म होते, अशी समजूत. नंतर आर्यांत पाखंडें निघाली. हे पाखंडे काढणारे लोक वंशाने आर्य च होते. पुढें ह्या पाखंडांत बाह्य शिरले. बाह्य हे आर्य नव्हते. सनातनधर्मांत हि जातिबद्ध होऊन आर्यानार्यसंकरसमाज व अनार्यसमाज शिरले. ते हि वंशानें आर्य नव्हते. अशा ह्या आर्य, पाखंडी आर्यानार्य व अनार्य लोकांच्या एकंदर समाजाला परकीय लोकां कडून हिंदू हे अभिधान प्राप्त झाले. आतां ह्या हिंदू समाजाच्या शेजारीं सहा कोट मुसुलमानांचा विधर्मी समाज व सुमारे अर्धा कोट ख्रिश्चनांचा विधर्मी समाज अलीकडील पांच सात शे वर्षांत कायमचा रहिवाशी झाला आहे. ह्यांचा देवधर्म निराळा, दायविभागपद्धति निराळी, परंतु राहण्याचा देश मात्र एक त्या मुळे आर्य, हिंदू, मुसुलमान, व ख्रिश्चन आणि भिल्लादि अनार्य, ह्या सर्वांचा अंतर्भाव ज्या एका संज्ञेनें होईल अशी संज्ञा निर्माण करणें झाले आहे. ती संज्ञा व तो शब्द हिंदी हा होय. ह्या सर्व लोकांना हिंदी ह्मणावे व ह्यांच्या देशाला हिंदीस्तान ह्मणावे, असा प्रघात आस्ते आस्ते पडत चालला आहे. इंग्रजांच्या एकछत्री,

अमलाखालीं, असा एखादा व्यापक शब्द निर्माण होणें अपरिहार्य झालेलें होतें. आर्य हिंदू, पारशी, मुसुलमान, ख्रिश्चन, बौद्ध, खोंड, हे सर्व हिंदी आहेत, म्हणजे हिंदीस्तानांत कायमचे राहणारे आहेत. परंतु, त्यांचे देवधर्म निराळे असल्या मुळे हिंदूधर्म या शब्दाच्या प्रमाणें च हिंदीधर्म ह्या शब्दाने कोणत्या हि स्वतंत्र वस्तूचा बोध होणार नाही. कारण हिंदीधर्म अशी वस्तु अद्याप अस्तित्वांत आली नाहीं.

१० सनातनधर्मा तून फुटून जाऊन, निराळे राहणारे परंतु ख्रिश्चनमुसुलमानांत न मिसळणारे जे हिंदू लोक आहेत त्यांना हिंदू म्हणतां येईल किंवा नाहीं असा एक प्रश्न उद्भवतो. त्यांना पाखंडी हिंदू म्हणावें, हें त्याचें उत्तर आहे. पाखंड्यांची लोकसंख्या जो पर्यंत अल्प होती तो पर्यंत भ्रष्ट पतित म्हणून त्यांच्याशीं आर्यसमाजाचा व्यवहार मानवधर्मशास्त्राज्ञे प्रमाणे बंद पडे. पुढे कित्येक पाखंड्यांचा समाज वाढून त्यांच्या जाति बनल्या, देशांत त्या अभिजन झाल्या व संभावितपणें वावरूं लागल्या. तेव्हां, त्यांचा व्यवहार सामान्य बाबतीत सामान्य धर्मा प्रमाणे होऊं लागला व जातीच्या बाबतीत जातीत रूढ झालेल्या विशेषधर्मा प्रमाणे होऊं लागला. जातिसंस्थ होत तो पर्यंत त्यांना देशांत व समाजांत विशिष्ट व स्थिर असें स्थान नसे. अलीकडे कित्येक व्यक्ती, जाती न बनतां, सनातनधर्मा तून फुटून तुटक राहूं लागल्या आहेत. त्यांचा व्यवहार कोणत्या धर्माने चालावयाचा हा प्रश्न उपस्थित होतो. सनातनधर्मी राजा व सनातनधर्मी न्यायाधीश असते, तर त्यांचा व्यवहार वर वर्णन केल्या प्रमाणे चालला असता. परंतु, राजा विधर्मी असेल व न्यायाधीश जर पाखंडी असेल, तर न्याय करूं जातांना, मानवधर्मशास्त्रांतील व्यवहारधर्मात तो विसंगत असे फेरफार करूं शकेल. हे विसंगत फेरफार बहुजनसमाजाला मान्य हि नसतील. अशी आपत्ति ओढवली असतां, बहुजनसमाजानें जातीच्या बाबतींत स्वतःचीं न्यायपीठें बनविणें, हा च एक उपाय रहातो. जातिप्रश्नांच्या बाबतींत अशी न्यायपीठें पार्श्यांनीं पंचायतीच्या रूपानें उभारलेलीं आहेत. तो च मार्ग मोठ्या प्रमाणा वर हिंदूंनीं हि स्वीकारला पाहिजे. म्हणजे हिंदू कोण व हिंदू कोण नाही, या संशयाचें निरसन होईल.

**वि. का. राजवाडे**

---

# दामाजीपंत व विठ्या महार



१ सातारकर महाराजांच्या दफ्तरांत नकलेची नकल केलेला एक महजर सांपडला. त्यांत शहरांत व खेड्यांत महाराना कोण कोणते हक्क पूर्वापर

आहेत त्यांची याद दिली आहे. मूळ महजराचा प्रस्तुत खर्डा सारांशरूप आहे. मूळ महजर बेदरची पातशाहत असतांना झाला. तदनंतर एकनाथ स्वामींच्या मृत्यू नंतर पैठणास एकनाथांच्या देवालयांत पुनः मूळ महजराची उजळणी झाली. हि उजळणी हिजरी सन १०५१ श्रावण शुद्ध १३ रविवार या दिवशीं झाली. प्रस्तुत लेखांत हिजरी सनाला शक ह्मटले आहे. मुसुलमानी सनाला शक ह्मणण्याची चाल गांवढ्यांत व अर्धशिक्षित लोकांत त्या काली होती. हिजरी सन १०५१ ला शक १५६३ येतो व त्या शकाच्या श्रावण शुद्ध १३ स रविवार असण्याचा संभव आहे. ह्या सारांशरूप महजरांचे अक्षर दीड शें वर्षां पलीकडील नाहीं. मूळ महजराचें शेवटलें संस्करण सन १०५१ हिजरींत ह्मणजे शक १५६३ त झालें. त्या संस्करणाच्या नकलेची ही नकल आहे. तऱ्हां अक्षर दीड शें वर्षां पलीकडील नाहीं, हें ठीक च आहे. ह्या सारांशरूप महजराचा मथळा असाः—

" बादशाहाचा हुकूम शिक्का मोर्तब व दामाजीपंत
कारकूण याचे हातची कलमे "

ह्मणजे मूळ महजरा वर बदरच्या पातशाहाचे शिक्का मोर्तब होतें आणि तो खुद्द दामाजीपंत मंगळवेढकर याच्या हातचा होता. मूळ सनद पैठणास देवाचे राऊळांत झाली. एकनाथस्वामीच्या पूर्वी बेदरची पातशाही व दामाजीपंत होऊन गेले, तेव्हां सनदेंत उल्लेखिलेलें पैठणचें देवाच राऊळ ह्मणजे एकनाथस्वामींच्या मठातील देवळाहून जुने असें दुसरें राऊळ असावे. पैठण हे प्रख्यात धर्मक्षेत्र व न्यायक्षेत्र. तेथें सर्व देशाला महत्वाचे असे जे खटले होत त्यांचा निकाल होत असे.

२ महारांच्या हक्कांचा तपशीलवार निर्देश केल्या वर खालील वाक्यें ह्या सारांशांत आलीं आहेतः—

" हें देणे पाछायाचे व दामजीपत याचे हातचा कागद
असे विठ्या महार मंगळवेढ्याचा पाछायाचे कामी
पडला व दामाजीपत कामी पडला ह्मणोन पदशाहाणी
विठ्या महारास हक करून दिल्हे "

ह्या वाक्या नंतर, आणीक कांहीं राहिल्यासाहिल्या हक्कांचे गणन करून पुनः खालील हकीकत लिहिली आहेः—

" बेदरास जाऊन पाच्छाव याची लेक बेगम आनली
आणी पाच्छाव पासी हात जोडोन उभा राहिला
बाच्छाव याचे घोड्याची जागल करावयास गेला तो
तेथे मांग चोरीस आला तेव्हां महार जागा होता मग बाच्छाव
यास जागे केले विस्वासूख माहार ठरला ह्मणोन घोडा

वरातीस दिल्हे आंवरनाक माहार यास कृपा करून दिल्हे बाच्छाव याचीतील कोठीतील कोठाडी लुटल्या त्याज बद्दल तगादा दामाजीपतास केला ते वेळेस श्रीविठोबाचे विठ्या माहाराने रूप धरून बाच्छाव याची रसद पोहचती केली दामाजीपंताचा पैका भरून विठ्या माहाराने दिल्हा आणि बाच्छाणे पुन्हा पावती दिल्ही व दामाजीपत याज पाशी विठ्या माहारानें आनोन दिल्ही बाच्छाव याणी चौकशी केली व दामाजीपंत याची चौकशी केली त्याज वरून विठ्या माहार यास हक दर उपकार पोटास भाकरी व बसावयास जागा करून दिल्ही माहाराचे बंदोबस्त करून दिल्हे ''

३ महजरांतील ह्या हकीकती वरून असें दिसतें कीं, मंगळवेढ्यास दामाजीपंत कारभारी ऊर्फ कमाविसदार असतांना, विठ्या नांवाचा महार हि मंगळवेढ्यास होता. दामाजीपंताच्या कारकीर्दींत देशांत कडाक्याचा दुष्काळ पडला. तेव्हां दामाजीपंताने लोकां कडून धान्याची सरकारी कोठारें लुटविलीं. त्या कालीं वसूल धान्याच्या रूपाने घेत असत व नंतर धान्य विकून येईल तो पैका रसद ह्मणून राजधानीस पाठवीत. कोठारे लुटविल्या वर रसदीचे पैसे राजधानीस पाठविण्यास दामाजीपंता जवळ सहज च नव्हते. तशांत चुगलखोरांनी कोठारें लुटविल्याची बातमी पातशाहा पर्यंत बेदरास पोहोचाविली. रसदी करितां पातशाहाचें धरणे दामाजीपंता वर येऊन बसले. द्रव्य कोठून आणावे, अशा विवंचनेंत दामाजीपंत पडले. पंतांच्या संकटाचा साक्षीदार मंगळवेढचा विठ्या महार होता च. त्याच्या जवळ बापजाद्यांनी पुरून ठेविलेले किंवा इतर कोणत्या तरी कारणाने जमा झालेलें द्रव्य होतें व तें कर्मधर्मसंयोगाने रसदीची फेड करण्या इतके होतें. तें द्रव्य विठ्ठलरूपी परमेश्वराचा मंगळवेढच्या विठ्या नांवाच्या महाराच्या आंगांत संचार होऊन दामाजीपंता कडील रसद ह्मणून बेदरास सरकारांत भरण्याची विठ्या महारास परमेश्वरप्रेरणा झाली. विठ्या महार मजल दर मजल बेदरास आणि त्यानें पातशाहाच्या कचेरीत दामाजीपंता कडील ह्मणून रसदेचा भरणा केला, पावती घेतली व ती दामाजीपंतास आणून दिली. अर्थात्, दामाजीपंताचे संकट वारले व धरणें हि सुटलें.

४ दामाजीपंताच्या रसदेची अशी ही ऐतिहासिक हकीकत प्रस्तुत महजरा वरून उपलब्ध होते. यःकश्चित् कमाविसदाराने धान्याची खंडोगणती कोठारें लुटविणें, बादशाहाकडील धरणें येऊन बसणे, महारानें गुपचुप रसद जाऊन भरणें, वगैरे हा सर्व च प्रकार यद्यपि वास्तविक तत्रापि आश्चर्योत्पादक होता. कवींनी लाघव करून ह्या ऐतिहासिक हकीकतीला आपल्या कल्पनेनें काव्यरूप दिल्हें, व

भगवान् भक्तवत्सल जो श्रीविठ्ठल त्यानें महाराचें रूप घेऊन दामाजीची रसद भरली, रसद भरतां क्षणीं च महाररूपी परमेश्वर पातशाहाच्या डोळ्या देखत गुप्त झाले, वगैरे कविकल्पना रचिल्या. परमेश्वर महाराच्या हृदयांत शिरून, तद्द्वारा एका दयार्द्र गृहस्थाचा बचाव झाला, ही खरी ऐतिहासिक हकीकत, प्रस्तुत महजर न सांपडतां तर कल्पनाकोटीतील असावी, असा जसा आजपर्यंत आपण तर्क करीत होतों तसा च पुढे हि करीत राहिलों असतों.

**वि. का. राजवाडे**

---

श्री

नकलची नकल

बादशहाचा हुकूम सिका मोर्तब व दामाजीपंत कारकूण याचे हातची कलमे-- शेटे पाटील कुळकरणी देशमुख व देशपांडे व बारा बलुते व बेदरचे काजी इमाम व रामजी पाटील व दिलीचे व मिरजेचा खंडो पाटील याचे समक्ष व चवखंडाचे पाटील कुळकरणी याचे समक्ष बितपसील--

१ मुंगी पैठण सणद देवाचे राऊळात जाहाली पाढरस कळावयाची कलमे

१ ब्राह्मणाचा नवरा घोड्यावर
१ देशमुखाचा नवरा घोड्यावर
१ कुणब्याचा नवरा घोड्यावर
१ राज्याचा नवरा घोड्यावर
१ सुताराचा नवरा घोड्यावर
१ लोव्हाराचा नवरा घोड्यावर
१ गुरवाचा नवरा घोड्यावर
१ सोनाराचा नवरा घोड्यावर
१ धणगराचा नवरा घोड्यावर
१ तेल्याचा नवरा बैलावर
१ जैनाचा नवरा बैलावर
१ खदईचा नवरा बैलावर
१ डवऱ्याचा नवरा बैलावर
१ चांभाराचा नवरा बैलावर
१ बनगाराचा नवरा बैलावर
१ मुसलमानाचा नवरा घोड्यावर
१ न्हाव्याचा नवरा बैलावर
१ परिटाचा नवरा बैलावर
१ कुंभाराचा नवरा बैलावर
१ कातकाडीचा नवरा बैलावर
१ घिसाडीयाचा नवरा बैलावर
१ गारुड्याचा नवरा हाल्यावर
१ लोनाऱ्याचा नवरा बैलावर
१ गोपाळाचा नवरा बैलावर
१ माहाराचा नवरा घोड्यावर
१ मांगाचा नवरा हाल्यावर
१ वापाचा नवरा बैलावर
१ गुजराचा नवरा घोड्यावर
१ जंगमाचा नवरा घोड्यावर
१ पात्रुटाचा नवरा बैलावर

१ लमानाचा नवरा बैलावर
१ रजपुताचा नवरा घोड्यावर
१ कैकाड्याचा नवरा पाई
१ फाशे पारधीचा नवरा पाई
१ भामल्याचा नवरा पाई
१ तांबटाचा नवरा घोड्यावर
१ बेलदाराचा नवरा घोड्यावर
१ सणगराचा नवरा घोड्यावर
१ गोंधळ्याचा नवरा घोड्यावर
१ जोशाचा नवरा बैलावर
१ गोपाळ मुसलमान याचा नवरा घोड्यावर
१ कासाराचा नवरा बैलावर
१ वराड्याचा नवरा पाई
१ बुरुडाचा नवरा पाई
१ भिलाचा नवरा घोड्यावर

पाछ्याचे वेळेस आह्मी हुजूर घेतला तेथून आमचे बावण हाक माहाराचे चालू झाले त्यांत श्री मुंगी पैठण येथे देवाचे राऊळांत सणद जाली तुह्मा सर्वत्रास कळावी—

देशमुखाचे घरची पड जाली आसता
८॥२ धुरुईचा बैल
८।१ चावरीचा बैल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

कातडे देवयाचे नाहीं परंतु देणे जाहल्यास एक मण दाणे द्यावे व कातडे परत द्यावे

पाटलाचे घरची पड
८॥२ धुरुईचा बैल
८।१ चावरीचा बैल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

पाटील यास कातडे देवयाचे नाही परंतु देवयाचे जाले तरी एक मण दाने घेऊन परत द्यावे

सोनाराचे घरची पड जाली आसता
८॥२ धुरुईचा बैल
८।१ चावरीचा बैल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

सोनाराचे मढे व लग्ने बदल हक येणे
२। लग्नाबद्दल
३॥ मढ्याबद्दल

माळियाचे घरची पड जाली आसता
८॥२ धुरुईचा बैल
८।१ चावरीचा बैल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

माळ्यावर कायदा
२।· लग्नाबद्दल
मढ्याबद्दल

सिपी याजकडे हक

२। लग्नाबदल

३॥ मढ्याबदल

आताराने नाडापुडी वगैरे सामान द्यावे येणेप्रमाणे हक घ्यावयाचा तो घ्यावा

सेटे माहाजन

२। लग्नाबदल

३॥ मढयाबदल

तपसीलवार

ँ१। गहू दर खंडीस

ँ१। हरभरे दर खंडीस

ँ१। लसून दर खंडीस

ँ१। आले दर खंडीस

ँ१। शेंगा भुईमुगाचे दर खंडीस

ँ१। ववा दर खंडीस

ँ१। नागली दर खंडीस

ँ१। मिरच्या दर खंडीस

ँ१। मुग खंडीस

ँ१।॰ काहारले दर खंडीस

ँ१। हुंड्या दर खंडीस

ँ१। खपल गहू दर खंडीस

ँ१। जोरी दर खंडीस

ँ१। हळद दर खंडीस

ँ१। तांदूळ दर खंडीस

ँ१। वऱ्हे दर खंडीस

ँ१। सातु दर खंडीस

ँ१। लाख दर खंडीस

ँ१। जवस दर खंडीस

ँ१।॰ करडी दर खंडीस

लोनारी याजवर कायदा

३॥ लग्नाबदल

३॥ मढ्याबदल

कासारावर कायदा

२। लग्नाबदल

३॥ मढयाबदल

घिसाड्यावर कायदा

२। लग्नाबदल

३॥ मढयाबदल

१ पिंजारी याणे दरसाल जेन हकाचे देत जावे

१ रामोसी यास

२ लग्नाबदल

० मढ्याबदल

१ वाणी याने दररोज तंबाकू पाण-सुपारी देत जावी

१ तांबोळी याणे दररोज पाणे देत जावी

१ परीट याजकडे

२। लग्नाबदल

१ मढयाबदल

१ न्हावी वळीचा भाऊ सबब त्याणे माहारास वस्तरा देत जावा आणि हक बिा तपसील

२। लग्नाबदल

१ मढ्याबदल

१ गोणीस फसकी दर वंझळभर देत जावी न्हावी याचे घरचे पडीस

ँ॥२ धुरईचे बैलास

ँ।१ चावरीचे बैलास

८१। तीळ दर खंडीस

८१। सावे दर खंडीस

८१। राळे दर खंडीस

८१। वरया दर खंडीस

८१। कापूस दर खंडीस

८१। बाजरी दर खंडीस

---

बेलदार याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

---

भाटास हक

२। मळ्याबदल

कुंभाराची पड झाली असता

८॥२ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

लव्हाराची पड झाली असता

८॥२ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

परटाची पड झाली असता

८॥२ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

सोनार

वगैरे जिनस फळफळावर

१०० आंबे दर हजारास

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

कुंभार वळीचा भाऊ सबब

२। लग्नाबदल

१। मळ्याबदल

---

सुतार वळीचा भाऊ सबब

२। लग्नाबदल

१। मळ्याबदल

---

चांभार वळीचा भाऊ* सबब

२। लग्नाबदल

१। मळ्याबदल

---

जकात व हक दर शेंकडा रुपये दोन प्रो घ्यावा

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

---

येणे प्रमाणे घिसाडी याणे द्यावे

१ पिंजारी यानें दरसाल हकाचे जेन टक देत असावे

रामोसी

२। लग्नाबदल

० मळ्याबदल देऊ नये

---

१ वाणी याणे दर रोज तंबाखू व सुपारी देत जावी

१ तांबोळी याणे दररोज पाणे देत जावी

१०० जांब दर हजारास
१०० नारळ दर हजारास
१०० केळे दर हजारास

---

बागवाण याणी हर जिनसास हक देत असावे दर साल देत असावे
१दर घरास आदयावत देत असावे
ऽ।२ धुरईचा बैलास
ऽ।१ चावरीचे बैलास
ऽ।१ गाईच कातडे मागू नये
ऽ।१ म्हसीचे कातडे मागू नये

---

मृत्तिकेस हक तेली याजकडे
२। लग्नाबदल
३॥ मढ्याबदल

---

दिपवाळीचा साजवट करने ती माहाराणी करावी
दर बुच्याडास पाच पुल्या मागले हाताने वढून घेवाव्या त्यात मागाचा संबंध नाई
कोष्टी याजवर हक
३॥ लग्नाबदल
३॥ मढ्याबदल

---

१ मराटी याजवा पड सिरस्ते प्रमाने देत जावी
१ रंगारी बानगर मण्या वा रुपये १।
१ जिनगर
२। लग्नाबदल
१ परीट
२। लग्नाबदल
१ मढ्याबदल
१ न्हावी याने दरमहा वस्तरा देत जावे व हक
२। लग्नाबदल
१ मढ्याबदल
न्हावी वळीचा भाऊ सबब गोणीस फसकी वझळभर देत जावी
न्हाव्याचे घरची पड
ऽ॥२ धुरईचा बैल
ऽ।१ चावरीचा बैल
ऽ।१ गाईचे कातडे मागू नये
ऽ।१ म्हसीचे कातडे मागू नये

---

कुंभार वळीचा भाऊ
२। लग्नाबदल
१। मढयाबदल
सुतार वळीचा भाऊ
२। लग्नाबदल
१। मढ्याबदल

---

चांभार वळीचा भाऊ
२। लग्नाबदल
१। मढ्याबदल

---

जकाती हक दरशेकडा रुपये दोन द्यावे कलम
सुतार याची पड
ऽ॥२ धुरईचे बैलास
ऽ।१ चावरीने बैलास

३॥ मळ्याबदल
८॥१ धुरईचा बैल
८॥१ चावरीचा बैल
८।१ गाईंचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

जिनगराने माहाराचे घरी लग्न झाले असता त्यास करा व मंडवळी देत जावी

गुराहाळावर हक दर खंडीस गूळ ८१। देत जावा दररोज ऊस १० तीन काहिलीवर भरताची शेरनी पासरीभर व काहील-धुकटी व हात शेकणे गूळ ८८२॥ अडीच शेर दर-रोज देत जावे जागलाभर काकवी दर काहिलीस देत असावी व दाल झाडन्या बदल पेरी उसाची ५ पाच आठरा घागरीवर एक घागर रसाची देत असावी चुलवण जाळावयास घालीत जावे

मुसलमानाचे लग्नविड्याबदल रुपये २। सवादोन
८॥१ धुरईचे बैलास
८।१ चावरीचे बैलास
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

वडारी याणे द्यावे ते तपसील
२। लग्नाबदल
३॥ मळ्याबदल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

गुरव वळीचा भाऊ
२। लग्नाबदल
१ मळ्याबदल

---

मुलाणी व काजी
१। लग्नाबदल
८॥२ धुरईचे बैलास
८।१ चावरीचे बैलास
८।१ गाईचे कातडे मागू नये
ह्मसीचे कातडे मागू नये

---

काजी व मुलाणी याणी माहाराचे बैलावर लावीत असावे

बागवाण
२। लग्नाबदल
८॥२ धुरईचा बैल
८।१ चावरीचा बैल
८।१ गाईचे कातडे मागू नये
८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

पचवीस हत वावरात नाडा बांधून माहारास द्यावे

संक्रांती हुरडा खळमात्र उपणपाटी व साजवट व बेर माहाराने घेत असावे मांगाचे त्यात कांहीं नाही

१। बलुत्यास मांडवखंडनीबा रु. १।

लमाण याजवर
२। लग्नाबदल
३॥ मळ्याबदल

हालालखोर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

---

कैकाडी याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

---

गोवळी याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

ह्मसीचे कातडे मागू नये

---

गोपाळ याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

---

डोंबारी याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

सुतार याने पडझडचे काम करीत जावे

कलमें—

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।. ह्मसीचे कातडे मागू नये

---

गोंधळी याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

८॥२ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

गोंधळी याणे गोंधळ घातल्या वर दर गोंधळास पैसा एक देत जावा

धणगर याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ ह्मसीचे कातडे मागू नये

---

पाणमळ्यात दर विघयास दर-साल अडीच रुपये घेत जावे

॥। मराठ्याचे मळ्याबदल

तांबट याजवर

२। लग्नाबदल

३॥ मळ्याबदल

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

मांगाणे तात व केरसुणी देत असावी

सर्वत्राची चाकरी माहाराणी करीत जावी

लव्हाराणे सुरी कुराड असी नीट करून देत जावी

८।१ गाईचे कातडे मागू नये

८।१ म्हसीचे कातडे मागू नये

---

देशमुख याचे घरांत राबती माहारानें करावी त्यास पोटास भाकरी घालावी

पाटील याचे घरी माहाराने राबती करावी सबब त्याजला धडूत पांघरुना बद्दल रुपये ६ साहा देत जावे दररोज पोटास भाकरी घालावी

या सिवाई जमीन हराटीचे पाच बिघे देऊन राबती घ्यावी नाहीं पेक्षां राबती विसी बोलू नये.

सरकारचे सिपाई यास लाकडे माहाराने देत जावे त्याणे पोटास भाकरी देत जावी

१ दरवेसी यासी पाच गोवऱ्या देत असाव्या त्याची बिगार न्हेत असावी माहाराचे पोटास भाकरी देत जावी

१ हिजड्यास पाच गोवऱ्या द्याव्या व पोटास माहारास भाकरी देत जावी माहारापासी पैसा मागू नये

१ वासुदेव यास पाच गोवऱ्या द्याव्या आणि माहारास भाकरी पोटास देत असावी माहारापासी पैसा मागू नये

१ कुंभारास आवा काढल्यावर दर आव्यास मडकी हकाची देत असावी त्याचे मागचे आव्याची राख वाढीत असावी

१ चांभाराने जोड्यास सळ पुस्ती देत असावी
१ भाटाणे लग्न काढून द्यावे आणि त्यास माहाराणे दहा पैसे द्यावे
१ नंदीवाल्याने भिक्षा जी येईल ती घ्यावी पैसे महारापासी मागू नये

---

एणे प्रमाणे सदरी कलमे बारा बलुते वळीचे भाऊ सबब त्याजला कातडे दिल्हे दर कातड्यास एक मण दाने घालावे हैस नगाऱ्यास गावपांढरीने व सरकाराने दिल्यावर काजीने जबा करून द्यावी माहाराचे हवाली करून द्यावी व मांगाणे नगारा मंडून द्यावा यांत मांगाचा संबंध नाही नगरीचे ढोरे पड जाहली असल ती माहाराने आनावी व हली किंवा नवे तेथे मांगाचा संबंध नाई. हरकी माहारकी सीतादेवी कुणबयाची मळणी जाहले वर कुणब्याने सेतात माहारास देत असावी सरकाराणी दोन रुपये जोड्याबदल व घोंगडीबदल तराळास सालाबादी प्रों देत जावे माहारकीचा हक आजपरयंत आहे तो हली येत आहे कलमे—

१ मांगाचे लग्न रानात करावे ते दिवसी दिवस्याचे तिखटीचा मांडव घालून तीन मेढीचा करावा व राणांत हल्यावर वरात काढावी गावांत मिरवू नये गावपांढरीचा विडा त्यास द्यावा

१ नगरीचे होळीचा नैवेद्य माहाराने घ्यावा

१ पोळ्याचा नीव्येद बैलाची ववाळणी माहाराने घ्यावी

१ माहाराचे लग्नास मांगाणे पागुट व लुगडे देत जावे

१ गावपांढर मिळोन सरकारचे पा. गेतला घोडा माहाराचे वरातीस द्यावा मांगाहून वहिवाट–चालक हा खरा मांगाचा त्याचा संबंध नाही मांगाबदल कोन्ही बोलू लागल्यास तो जातीबाहेर पडेल

असा माहाराचा पुरावा खरा आहे जो कोणी लटके ह्मणेल त्याचं निरवेष होईल हे देणे पाछयायाचे व दामाजीपंत याचे हातचा कागद असे विस्या महार मंगळवेढ्याचा पाछयायाचे कामी पडला व दामाजीपंत कामी

पडला ह्मणोन पादशाहाणी विठ्या महारास हक करून दिल्हे हे घेत जावे पादशाहा व दामाजीपंत व पांढर व बाराबलुते व शेटे माहाजन मिळोन हे पादशाहाचे हतचे देहनगी असे व काजी इमाम व साक्ष पाटील याचे

१ बापुजी जुनरकर
१ सदासीव पाटील गंगाखेडकर
१ नाना कुलकर्णी कासीकर
१ माहादाजी पंत कुलकरनी पुणेकर
१ खंडोपंत कुलकरणी मिरजकर
१ जोती पाटील नासीककर
१ माधवराव कुलकरणी माहीकर

---

१ माणकाजी पाटील पुणेकर
१ वासुदेवपंत कुलकरणी बेदरकर
१ रामाजीपंत कुलकरणी जुनरकर
१ नाना कुलकरणी पंढरपूरकर
१ भवाणजी पाटील पुणेकर
१ विस्वराव पाटील बेदरकर
१ केशवराव बेदरकर
१ माधवराव पाटील पैठणकर

---

एणे प्रमाणे सनद पैठणचे मुकामी येकनाथस्वामीचे राउळात जाइली हे तुह्मास कळावे व पांढरीस कळावे व अठरा लाख सोमवंसास कळावे

फाशेपारधी
२।. लग्नाबदल
३॥. मढयाबदल

---

१। आडाणी कुळाचा मोहोतुर लागला ह्मणजे घ्यात्रे

१ विड्या बदल गावपांढरीने भादवी केले असता महारास दोन रुपये देत जावे

१ हारकी हारवेळ माहाराची यास रुपये चोवीस २४ दरसाल देत जावे आणि हरकी व माहारकी माहारपांढरीची

१ नगरीतील लग्न झाले असता वेसीत शेला नवऱ्याचा माहाराणी घ्यावा

वैशनव लग्नाबदल २। व मढयाबदल ३॥ गारुडी लग्नाबदल २। व मढयाबदल ३॥.

गारुडी याने गांवांत खेळ केलें असता पैसे महारास ।६ देत जावे

माहाराने तोरणे व्येसीस नगरीचे व नगरीचे लोकास वाड्यास बांधीत असावे नगरी मधे घरोघर काव टाकीत असावी नैवयदे माहारास देत असावे यथ मांगाचा सबंध नाही

माहाराचे लग्न उभे राहिले असता मांगाने व मांगनीने पाच रोज लाकडे पुरवावी व माहाराने त्यास वाढून घावे

.।. कोष्टी—मागा बदल

१ नवऱ्याचे पाहीचे पैसे च्यार व तांदूळ पाटी माहारास देत जावे व माहारणीस ववाळणी लुगडे देत जावे

१ पाच रोज अन्न माहारास वाढून द्यावे आणि माहाराने चाकरी करावी केले असता

८॥१ धुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईच कातडे मागू नये

८।१ ह्मसीच कातडे मागू नये

कातडे देवयाचे नाही परंतु देणे जाहल्यास एक मण दोन घेऊन कातडे द्यावे अडाणी कुळाची पड झाली असता

८॥१ सुरईचा बैल

८।१ चावरीचा बैल

८।१ गाईच कातडे मागू नये

८।१ ह्मसीच कातडे मागू नये

---

।. सनगर–मागा बदल

।. राउळ–मागा बदल

।. साळी–मागा बदल

१ मोडली जनावरे व विटाळाचे लुगडे फुकट देत जावे

१ लक्ष्मीचे कारन जाहाल्यास व झाले असता माहाराने करावे सडक धरावी घालावा कारण लक्ष्मीचे जरीमरीचे करावे यात मांगाचे समंध नाहीं मांगा बदल कोन्ही बोलले तरी जाती बाहेर बसेल व लटके कोन्ही ह्मणेल तर याचा निरवोष होईल

१ वाणीयाचे बिराहडा वर पाच गवऱ्या देत असावे व यास करास त्याणे च्यार पैश देत जावे

१ सरकारचा सिपाईयास पाच गवऱ्या देत जावे त्याणी पोटास भाकरी देत जावी

---

धणगर याणे शंभर बकरी कातरली ह्मणजे पावशेर लोकर द्यावी मेंढरू शेळी मेली तरी माहारास देणे दुसरे कोन्ही घेऊं नये येणे प्रमाने माहाराचा हक खरा आहे जो कोन्ही लटके ह्मणेल त्याचा निरवोष होईल माहारणीचा व मांगणीचा विष्टा खाली असे क्रिया सांभाळून पंच बसल्या वर खरा खरा इनसाफ करावा या प्रमाने माहाराचा हक खरा आहे हे मलिकपाछयाव व इमाम बेदर माहारास कामगीर सांगितली ते वेळेस आपले शास्त्रात केले बेदरास जाऊन पाछयाव याची लेक बेगम आनली आणि बाछयाव पासी हात जोडोन उभा राहिला बाछयाव याचे घोड्याची जागल करावयास गेला तो तेथे मांग चोरीस आला तेव्हा माहार जागा होता मग बाछयाव यास जागे केले विस्वासूख माहार ठरला ह्मणोन घोडा वरातीस दिल्हे आंबरनाक माहार

यास कृपा करून दिल्हे व हारवळा हारकी माहारकी दिल्ही व धडे पडोवळे हक दुरुस्त करून दिल्हे बाछयाव याचीतील कोठीतील कोठाडी लुटल्या त्याज बदल तगादा दामाजीपंतास केला ते वेळेस श्री विठोबाचे विठ्या माहाराने रूप धरून बाछयाव याची रसद पोहचती केली दामाजीपंताचा पैका भरून विठ्या माहाराने दिल्हा आणि बाछयाणे पुन्हा पावती दिल्ही व दामाजीपंत याज पाशी विठ्या माहाराने आनोन दिल्ही बाछयाव याणी चौकशी केली व दामाजीपंत याची चौकसी केली त्याज वरून विठ्या माहार यास हक दर उपकार पोटास भाकरी व बसावयास जागा करून दिल्ही धडुत पांघरून कृपा करून दिल्हे माहाराचे बंदोबस्त करून दिल्हे माहाराचा बंदोबस्त केला हा खरा आहे हे तमा ( म ) हकांत कोनाचा सबंध नाही पैठण मुकामी देसाई व देशमुख पाटील कुलकरणी व क्षेत्रीचे ब्राह्मण व बाराबलुते व सेटे महाजन सनद मुंगी पैठणी देवाचे राउळात जाहाली यास कोन्ही लटके ह्मणेल त्याचा निरवोष होईल त्यास माहरणीचे मांगणीचे वस्त्राचा घोळ आसे मिती शके १०५१ श्रावण शु॥ १३ रोज रविवार दिवसी कागद दिल्हा सही खंडो नारायण कुलकरणी दीक्षित पैठण-कर हे पुणे मुकामी इंग्रज बाहादुर जरनेल व आलफिस्टण साहेबाची सई व राबेसण साहेबाची सही कोनास बोलावयाचे असल्यास पुणे मुकामी येऊन बोलून घ्यावे

ही नकलेची नकल उतरली असे—नकलेबरहुकुम

---

# श्रीछत्रपति शिवाजीमहाराज

# यांचीं

# शक १५६८ तील दोन पत्रें



इंदापूर, सुपें, बारामती व पुणें, हे चार प्रांत शहाजी राजे यांच्या कडे शिवाजीच्या जन्माच्या पूर्वी पासून जहागीर होते. त्यां वर दादाजी कोंडदेव

यांचा अंमल सुभेदार ह्मणून पांच पंचवीस वर्षें होता. दादाजी कोंडदेवांच्या सुभेदारींत व मृत्यूपर्यंत कित्येक राजपत्रें शिवाजी राजाच्या नांवानें झालेलीं उपलब्ध आहेत. त्यां पैकीं च प्रस्तुतचीं दोन पत्रें होत. यात इंदापूरचा मोकासा शिवाजीस नुकता च अर्जानी झाला असा उल्लेख आहे. शिवाजीचें वय त्या वेळीं एकोणीस वर्षांचें होतें. संभाजी भोंसले हा विठोजी भोंसले यांचा मुलगा होता. इंदापूरचा मोकासा शिवाजीस विजापूरच्या पातशाहा कडून नुकता च मिळाला होता. तत्पूर्वीं तो संभाजी मोहिता याज कडे होता. संभाजी मोहित्याची उचलबांगडी करून शिवाजीनें हा मोकासा आपल्या कडे करून घेतला त्या वेळचीं हीं दोन पत्रें आहेत.

---

**१५६८ कार्तिक शुद्ध २ ]** **[ अस्सल-मोडी**




अज्[1] रख्तखाने[2] राजश्री सीवाजि[3] राजे दामदौलतहू[4] बजानेब[5] कारकुनानि[6] हाल[7] व इस्तकबाल[8] पा[9] इंदापूर[10] त्रिदानंद[11] सु॥[12] सबा[13] अर्बैन[14] अलफ[15] बो[16] संभाजि[17]

---

१ हून, पासून. २ रख्तखाना=फरासखाना. रख्तखाना इ राजश्री=रख्तखाने राजश्री=राजश्रीचा रख्तखाना. अज् रख्तखाने राजश्री=राजश्रीच्या रख्तखान्या तून ( हुकूम केला जातो कीं ). ३ शिवाजी अशी शिकारयुक्त अक्षरें आजपर्यंत सांपडलेल्या एका हि पत्रांत नाहीत. सर्व पत्रांत जि ऱ्हस्व असते. ४ श्रीमंत. ५ स, प्रति. ६ कारकून् या शब्दाचें फारसी अनेकवचन कारकुनान्. इ हा षष्ठीचा प्रत्यय. कारकुनान् इ हाल ह्मणजे वर्तमान चे कारकून. ७ वर्तमान. ८ भावी. ९ परगणे. परगणा इ इंदापूर ह्मणजे इंदापूरचा परगणा. ११ ( हुकूम ) दिला जातो. १२ सुहुरसन. सु॥ हा शब्द अडाणी वाचक सुमा ह्मणून वाचतात, परंतु ती चुक आहे. सु पुढील दोन रेघा अडाणी डोळ्यास मा सारख्या दिसतात इतकें च. १३ सात. १४ चाळीस. १५ हजार-एक हजार सत्तेचाळीस. १६ बेशमी=इसमानें. १७ जि ऱ्हस्व काढली आहे.

भोसले[१८] देसमुख पाा[१९] मजकूर हुजूर एउनु[२०] मालूम केले जे[२१] आपणांसि[२२] इनाम बाा[२३] मोकदमी मीरासि[२४] कसबे[२५] मजकूर[२६] जमीन चावर जिराती ४॥। पाा[२६] उणे पाच दर[२७] सवाद[२८] कसबे मजकूर बाा थल निमजगा[२९] अंज[३०] चावर पाच पैकी बाा[३१] फर्मान हद[३२] सिके खास देखील[३३] नख्तयाती[३४] ताा[३५] ठाणे ताा देहाये[३६] व बाजे[३७] पटिया[३८] व महसूल[३९] व ऊंट[४०] व कडबा[४१] व बाजे बाबा[४२] व वेठी[४३] बेगारी फर्मासी[४४] कुल[४५] बाब कुल कानू रवा[४६] आहे सालाबाद भोगवटे तसरुफाती[४७] चालत आले आहे हाली[४८] साहेबांसि[४९] मुकासा अर्जानी[५०] जाला आहे माहाली कारकून ताजे खुर्द खताचा उजूर[५१] करिताती सरंजाम[५२] होए मालूम जाले तरी बे॥ सभाजि भोसले देसमुख पाा माा यासि इनाम बाा मोकदमी मीरासि कसबे मजकूर जमीन जिराती चावर पा उणे पाच पैकी बाा फर्मान हद सिके खास देखील नख्तयाती ताा ठाणे ताा देहाय व बाजे पटिया व महसूल व ऊट व कडबा व बाजे बाबा व वेठी बेगारी फर्मासी कुल बाब कुल कानू भोगवटे तसरुफाती सालाबाद चालिले असेली[५३] तेणे प्रमाणे दिघले आहे दुमाले कीजे औलाद अफलाद चालविजे दर[५४] हर[५५] साल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे तालीक[५६] घेउनु असली[५७] फिराउनु[५८] दीजे मोर्तब सूद[५९]




तेरीख १ माहे सौवाल
सौवाल

सुरू[६०] सूद

---

१८ ह्या संभाजीला राजे ही पदवी नव्हती, सबब नुसत्या आडनावानें उल्लेख केला आहे. १९ परगणे–परगणा इ. परगणे मजकूर ह्मणजे उपर्युक्त परगणा. २० एऊन ह्या वर्तमान रूपा बद्दल एउनु असें रूप तीन शे वर्षांपूर्वी योजीत. २१ जे=की. यत्=जे. २२ सि ऱ्हस्व काढिली आहे. २३ बद्दल. २४ वंशपरंपरेची. २५ कसबा इ=कसबे. कसबे मजकूर=उपर्युक्त कसबा. २६ पाव. २७ मध्यें. २८ शिवार. उपर्युक्त कसब्या च्या शिवारांत. २९ निमजगा नांवाच्या थळांत. ३० अज्=पैकी. फारसी अज् व मराठी पैकी अशीं दोन्ही शब्दयोगी अव्ययें योजिलीं आहेत. ३१ बरहुकूम. ३२ खासशिक्याच्या ३३ सुद्धां. ३४ नक्त. ३५ ताहां. ३६ गांव. देह् (गांव) शब्दाचें अनेकवचन देहाय. ३७ इतर. ३८ पट्टया. ३९ वसूल. ४० एक बाब आहे. कोणती तें माहीत नाही. ४१ एक बाब. ४२ इतर बाबा. ४३ वेठबेगार. ४४ निवडक. ४५ सर्व. ४६ चालत. ४७ वार्षिक चालीचा भोगवटा. ४८ सध्यां. ४९ सि ऱ्हस्व काढिली आहे. ५० साध्य. ५१ आक्षेप. ५२ र वर अनुस्वार नाहीं. ५३ असेल च्या बद्दल असेली असें रूप शिवकालीन पत्रांत येतें. ह्या रूपाची मला सशास्त्र उपपत्ती अद्याप लागली नाही. ५४ आंत. ५५ प्रत्येक–दर हर साल=प्रत्येक सालांत. ५६ नक्कल. ५७ मूळ. ५८ परतून. ५९ सूद–झालें. ६० प्रारंभ झाला.

१५६८ कार्तिक शुद्ध ३ ] [ अस्सल-मोडी




अज रख्तखाने राजश्री सीवाजि राजे दामदौलतहू बजानेब कारकुनानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि देहाये पा इदापूर बिदानद सुा सबा अर्बैन अलफ दरवज बदल इनाम बो सभाजि भोसले देसमुख पा मजकूर जमीन चावर २२८१५ ता

| जिराती चावर | बागाईत चावर |
|---|---|
| २२८ | ८१५ |

दर सवाद कसबे मजकूर बागाईत बा मलई नजीक राजमळा बिघे पंधरा

८१५

दर सवाद गावगना पा मजकूर जिराती चावर बावीस २२८.

मौजे निरवागी चावर १८
मौजे आथरुणे चावर १८
मौजे कोरटी चावर १८
मौजे मदनवाडी चावर १८
मौजे अकोले चावर १८
मौजे अवणी चावर १८
मौजे गोतौडी चावर १८
मौजे वडकुटे खुर्द चावर १८
मौजे सेटफळे गंडे चावर १८
मौजे बाबुल गौ चावर १८
मौजे सादल गौ चावर १८
मौजे कलब चावर १८.
मौजे सेल गौ चावर १८
मौजे निरगुड चावर १८
मौजे रुई चावर १८
मौजे कोळठण चावर १८
मौजे भोड गौ चावर १८
मौजे काठी चावर १८
मौजे वडकुटे बुा चावर १८
मौजे सणसर चावर १८
मौजे खोरवची चावर १८
मौजे डावीज चावर १८

सदरहू प्रमाणे अजराह मऱ्हामती दिघले असे देखील नख्तयाती ता टाणे

व ता। देहाये व बाजे पटिया व महसूल व ऊट व कडबा व बाजे बाबा व वेठी वेगारी व फर्मासी कुल बाब कुल कानू दुमाले कीजे औलाद अफलाद चालविजे दर हर साल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे तालिक घेऊनु असली फिराऊनु दीजे मोर्तब सुद




तेरीख १ माहे सौवाल
सौवाल सुरु सुद

---

# संस्कृत व मराठी
# कवी
# परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि



१ कऱ्हाड येथील कोळेवाडीकर देशपांडे यांच्या संग्रहांत परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांनी केलेल्या कवितेचें एक लहानसें बाड आढळलें. बाडाची एकंदर ४६ पानें होती. पैकी पहिलीं चार व शेवटचीं चार मिळून आठ पानें गहाळ झालीं. पांचव्या पाना पासून बेचाळिसाव्या पाना सुद्धां बाडाचीं सध्यां अडतीस पानें शाबूत आहेत. बाड जीर्ण झालेलें आहे. कोळेवाडीकर देशपांडे यांच्या घरांत प्रतिनिधींचा शरीरसंबंध झालेला होता. शिवरामपंत प्रतिनिधि यांची कन्या सकवारबाई अप्पाजीराव देशपांडे कोळेवाडीकर यांस शक१७००च्या सुमारास दिली होती. तिज बरोबर हे बाड कोळेवाडीकरांच्या ग्रंथसंग्रहांत आलें असावें. सकवारबाईचा पूर्वज परशुराम त्र्यंबक हा प्रतिनिधिघराण्याचा मूळसंस्थापक. तेव्हां स्वपूर्वजकृत काव्य सकवारबाईनें ममतेनें आपल्या सासरी आणणें साहजिक होतें.

२ बाडांत खालील काव्यें आहेत:—

अंबेचे श्लोक १–२४ शिवाचे श्लोक २४—३२
अंबेचे श्लोक ३३–६१ शिवाचे श्लोक ६२—९४
आरत्या

पैकीं पहिले तेरा श्लोक गहाळ झाले आहेत व शेवटील एक दोन आरत्या हि गहाळ झाल्या आहेत. श्लोकांत कवी आपलें नांव व आपल्या बापाचें नांव घेतो, तसें च, औंधच्या ऊर्फ साकरगडच्या यमाईचें नांव काढतो. साकरगडची यमाई ऊर्फ अंबाबाई ही प्रतिनिधींची कुळदेवता, शिव हा प्रतिनिधींचा कुळदेव.

३ परशुरामपंत प्रतिनिधि यानें राजारामाच्या कालीं चांगली ह्मणण्या सारखी कामगिरी केली. पुढें शाहूच्या आगमनसमयीं त्याज वर बहुत संकटें आलीं. तत्पूर्वी हि संकटे थोडीथोडकी आली नाहीत. अशा संकटसमयीं परशुरामपंतानें शिवपार्वती यांचा श्लोकरूपानें धावा केलेला आहे. एकंदर चार प्रसंगीं चार धावे केले आहेत. कविता प्रेमळ आहे व बरी साधिली आहे. ही श्लोकबद्ध रचना रा. पारसनीस यांनीं मागें एकदां छापिली होती. तिची व प्रस्तुत प्रतीची तुलना करून, एक प्रत काढतां येईल.

४ परशुरामपंतानें कांही आरत्या संस्कृतांत केल्या आहेत. त्यांत लांब लांब समास आहेत. त्या वरून ह्मणतां येते कीं परशुराम त्र्यंबक संस्कृतांत चांगला व्युत्पन्न होता. पंडितराव व उपाध्ये हे तर संस्कृतज्ञ असत च. रघुनाथपंत हणमंत्ये हे हि संस्कृतज्ञ होते. आतां प्रस्तुत बाडा वरून परशुरामपंत प्रतिनिधि हि संस्कृतज्ञ होता, असे दिसतें. तेव्हां शिवकालीं व राजारामकालीं व शाहुकाली जे अष्टप्रधान वेळोवेळीं झाले ते संस्कृतप्राकृतभाषाभिज्ञ होते ह्मणजे तत्कालीन जी विद्या ती चांगली पढलेले होते, असें ह्मणणें प्राप्त होते. बोरगांवकर चिटणिसांच्या घराण्यांतील एका पुरुषाने मराठीत श्लोकबद्ध रामायण केलेले बोरगांवी आहे. रघुनाथराव दादाने केलेलें एक पद छापिलें आहे. प्रस्तुत परशुरामपंत प्रतिनिधीची ही संस्कृत व मराठी कविता सांपडली आहे. शिवाजी राजानें केलेले पद प्रसिद्ध च आहे. असें ऐकतों की महादजी शिंद्यांनी हि अभंगादि काव्यरचना केली होती. तेव्हां, असे विधान केलें असतां चालेल कीं, महाराष्ट्रांतील सरदार व मुत्सद्दी यांज पैकी कांहीं व्यक्तींना कविता करण्याचा चाळा असे व बहुतेक व्यक्ति स्वकालीन विद्येने संपन्न असत.

५ अवरंगझेबा वर पंतानें खालील श्लोक रचिले

स्वधर्मा रक्षावे असल तव चित्ति जरि हरा
तरी या दुष्टाचा करि समुळ विध्वंस हि पुरा ।
बहु याचे त्रासे क्षिति वरि सुरां तावि घडिजे
तया संहाराया तव नयन शंभो उघडिजे ॥ ६८ ॥
आले संकट वारणे तुज असे हे शांभवी शांकरे
ऐसे तों असता विलंब करणे हे काय शंभो बरे ।
सर्वस्वे तुमचा चि तो भरवसा आहे कृपासागरा
या दुष्टासि हरा पराभव करा श्रीपार्वतीशंकरा ॥६९॥

वरील उताऱ्या वरून पंतांच्या काव्यशक्तीचा अंदाज वाचकांस करतां येईल. कविता वाचताना एवढे लक्षांत ठेविलें पाहिजे कीं नकलकाराने ऱ्हस्वदीर्घा कडे, व कान्हामात्रा कडे व अनुस्वारानुनासिकां कडे दुर्लक्ष केलेले आहे. बाडांत कांहीं आरत्या नरसा किंकर, भास्कर, भास्करानंदन व ऋषिनंदन या नांवाच्या चार कवींच्या आहेत.

# औरंगजेबाचें शिवाजीस पत्र

सोबतचें पत्र औरंगजेबानें शिवाजीस पाठविलेले आहे. पत्र अस्सल असून, तें मला साताराचे वकील व मंडळाचे सभासद शेट डोसाभाई माणिकजी या पारशी सद्गृहस्थांनी मोठ्या कृपेने उपयोगार्थ दिले. पत्राची लांबी ४ फूट, ४ इंच असून, रुंदी १ फूट, ७ इंच आहे. पत्राच्या ३ फूट, ७ इंच लांबीवर जाडे असून, पत्राचे पाठीमागील बाजूस जोडावर 'सहूल् वसूल्' अशी फारसी अक्षरे आहेत. पत्राला चागले पाढरे फडकें लाविलेलें असून, ते सुरक्षित आहे. पत्राचे पाठीमागे मोडीत " ७ फर्मान औरंगजेब याचा सिवाजी महाराज यांचे नावे आपण तख्तावर बसलो व पोशाक पाठविला आहे ह्मणोन छ ४ जिल्काद सन १ जुलुस सु॥ सन १०६९ हिजरी " अशी अक्षरे, पत्रातील मथितार्थ कळण्याकरितां पत्र इकडे आल्यावर लिहिलेली आहेत. यात साताचा जो आंकडा आहे तो पत्रांकाचा आहे तसे च पत्राचे एके बाजूस ' फर्मान अवरंग शाहा बराबरी सोनाजी पंडित ' असा शेरा आहे. ही अक्षरे शिवकालीन आहेत. याचा अर्थ असा आहे की, सदरचे पत्र अवरंगशहाने शिवाजीकडे सोनाजी पंडिता बराबर पाठविले. पत्राची मित्ती छ ४ जिलकाद सन १ जुलुस सुा सन१०६९हिजरी अशी आहे. छ ४ जिल्काद १०६९ ह्मणजे ता. १४ जुलै सन १६५९. औरंगजेबाचे पहिले राज्यारोहण छ १ जिल्काद सन १०६८ हिजरी ह्म० ता. २१ जुलै इ. स. १६५८ रोजीं झाले; व दुसरे राज्यारोहण छ २४ रमजान १०६९, ता. ५ जून इ. स. १६५९ रोजी होऊन, औरंगजेबाने आपला जुलुसी ऊर्फ राजशक छ १ रमजान १०६८, मित्ति ज्येष्ठ शु० २, शके १५८० ता. २३ मे इ. स. सन १६५८ पासून धरण्याचे ठरविले. सोबतचे ता० १४ जुलै १६५९ चे पत्र दुसऱ्या राज्यारोहणा नंतर, सव्वा महिन्याने लिहिलेले आहे. राज्यारोहणप्रसंगी शिवरायांतर्फेची ' अर्जदास्त ' या सोनाजी पंडिताने गुदरली, असे पत्रांतील उल्लेख व पत्र सोनाजी पंडिताबराबरी पाठविले असा पत्राचे पाठीमागील शिवकालीन शेरा यां वरून व्यक्त होतें. पत्राचे पाठीवर

FROM
Aurangzeb to
Sivajee
4 Zilkad 1069
A. D. 1659

अशीं इंग्रजीत हि अक्षरें आहेत.

२ पत्राची लांबी रुंदी व स्वरूप यां संबंधाने वर लिहिले च आहे. पत्र सुमारें ७ इंच कोरे ठेविल्यानंतर, शिक्का व तुगरा ही एका ओळीत आहेत. शिक्का व तुगरा यांवर ईश्वराची नांवें दिलेली आहेत. पत्रांत एकंदर २१ ओळी असून, प्रत्येक ओळींत जवळ जवळ २ इंचांचे अंतर आहे. पहिल्या दोन ओळी ५॥ इंचांच्या असून, पुढील १९,१ फूट लांबीच्या आहेत. पत्राचे उजवे बाजूस ५॥ इंच कोरी जागा सोडलेली आहे. पत्रांत ईश्वराचा उल्लेख जेथें जेथें आला तेथें तेथें आदरप्रदर्शनार्थ कोरी जागा सोडलेली आहे. खुद्द औरंगजेबानें आपला उल्लेख 'मा' (आह्मी) या अक्षराने केलेला असून तें अक्षर नक्षीदार व रंगीत असे काढलेलें आहे. शाई लाखी असून, अक्षरें सुवाच्य व मोहक आहेत. असें या पत्राचें स्वरूप आहे.

आजच्या या अस्सल पत्रांत मुख्यतः काय मजकूर आहे, तो वर आला च आहे. सदर पत्राचा आशय प्रथमतः रा. राजवाडे यांनी म. इ. साधनें खंड ८, लेखांक ७ चे द्वारे व तदनंतर 'प्रभात'कर्त्यांनी छापिलेल्या शिवछत्रपतींच्या बखरी चे द्वारें प्रसिद्ध केला. हे पत्र प्रसिद्ध करितांना, रा० राजवाडे यांनी आठव्या खंडाच्या उपप्रस्तावनेंत पृ. १११ वर त्यांजपुढे आलेल्या भाषांतरासंबंधानें टीका करून मूळ फारसी पत्रे उपलब्ध झाल्यानंतर या संबंधाने काय लिहावयाचे ते लिहितां येईल असे स्पष्ट ह्मटले आहे, ते साहाजिक च आहे. औरंगजेब व शिवाजी यांमधील पत्रव्यवहारापैकीं आजचें हें पहिले च अस्सल पत्र आहे. मूळ पत्र व त्याचें मराठींत भाषांतर ही खाली देत आहे. भाषांतर माझे फारशी भाषाभिज्ञ विद्वान मित्र रा० गोखले यांचे मदतीनें केलेलें आहे. या उपकृति बद्दल मी त्यांचा ऋणी आहे. अस्सल पत्र शेट डोसाभाई यांचे संग्रहीं राहील. पत्रांतील आशय या पूर्वी च महाराष्ट्रास विदित झालेला आहे. आज औरंगजेबाने शिवाजीस पाठविलेले एक अस्सल पत्र ह्मणून च ते मंडळास सादर करीत आहे.

पां. न. पटवर्धन

बिसमिल्ला हिर्रह्मा निर्रहीम

लिल्लाहे अल्लाह् ईजद्




फर्माने अबुज्जफर मोहिउद्दीन
मोहंमद औरंगजेब बहादूर
आलमगीर बादशाह गाजी

१ जुब्रदतुल् अमसाल वल् अक़ान, खुलासतुल् अश्बाह् वल् अअयान,

२ काबेलिल मर्हमत वल् एह्सान; मुतिउल्‌इस्लाम, सीवाजी बइनायते पादशाहाना

३ उम्मीदवार बुदह् बिदानद के कादिरे बीहमता तआला शानहू बराये इशाअते खैरात व इफाजते मबर्रात व रफए मरासिमे अद्‌ल् व

४ इनसाफ व हद्‌मे मबानिये जोर व एअ्‌तेसाफ लिवाये दौलत व रायते सलतनते मा रा बेमंजुके जफर व नुसरत् आरास्तेह व औजे कैवान

५ रसानीद व दुश्मनाने साहेब मुकनत व अअदाये दीनोदौलत रा के हर्यक खियाले इस्तिकलाल दर् सर् व सौदाये इस्तिब्‌दाद

६ दर खातिर दाश्तंद् मनकूब व मकहूर गर्दानीद व बसाबिकये इनायते खुद् रोजे यकशबा २४ रमजाने मुबारक औरंगे खिलाफत व
७ जहांबानी रा बजुलूसे मैमनत् मानूसे मा ज़ीबोज़ीनत् बख्शीदह् अबवाबे सआदत बर् रूये रोजगार कुशूद व जमामे महाम्मे अनाम व मसालेहे
८ जमहूरे खास्सो आम रा बकबजये इक्तेदारे मा मनूत व मर्बूद फर्मूत व रुउसे मनाबिर व वुजूहे नुकूद रा बनाम व अल्काबे अशरफ अकदस्
९ अर्फअ हुमायूने मा रौनक व रिवाज़ अफ् जूद अल हमदो——— अला आलायेही अर्जदाश्ती के दरीं अय्यामे खुजिस्ता आगाज फरखुंदा अंजाम मसहूबे
१० मुलाज़िमे खुद बबार्गाहे अज़मतो जाह् इरसाल दाश्ताबूद ब विसातते वाकिफाने पायये सरीरे खिलाफत् मसीर अज नजरे मुकद्दस् मुअल्ला
११ गुजश्त व मुकद्दिमाते मारूज़ा माल्मे राये आलम आरा गश्त बायदके बर्जादये कवीमये दौलतखाही व खिद्मत्गुजारीये दर्गाहे आस्मान्जाह्
१२ के बिहीने वसीलये हुसूले अमानी व आमाल अस्त साबित् व रासिख् बूदेह् ब इक्तिजाये खैर सिगाली व सलाह् अंदेशीये उमदतुलमुल्करुकनुस सल्तनतिल् अलिय्या
१३ मोतमिनुद्दौलतिल् बहिय्या मुरीद फिदवी साहेबपरस्त सआदत् निशान् अमीरुलउमरा के अज पेशगाहे खिलाफत बखिद्मते सुबादारीये सुबजाते दकन
१४ ब इस्तिकलाले तमाम सरफराज गश्ता व रत्को फतके मोहिम्मात व हल्लो अक्दे मोआमलाते आंजा ब राये रज़ीने आं आजदुल खिलाफ मनूत गर्दीदा
१५ कार कुनद व अज सवाबदीदे आं मौरिदे मराहिम बिरुंनखद् व सई नुमायद् के मुकद्दिमाती रा के तअह्हुद् नमूदा ब वजहे पसंदीदा सूरत पिजी गर्दद्
१६ व मुतरस्सिदे इनजाहे मुल्तमेमाते मक्रून व सवाब बूदा बाशत बहमदे ————वलमिन्नाके जलायले उमूर व अजायमे महाम के पेशनिहादे खातिरे
१७ मलकूत नाजिर बूद बअहसने वजह सूरते तमशीयत याफ्ता वकारे मुल्क व दौलत इस्तिकामते तमाम पिजीरफ्ता व अजहीच जहत् बगिरानी

१८ नमांदा ब इनादते———मुतआल् व नैरंगीये इक् बाले अदूमाल बिशुकूहे शकावत पिश्नह् बजजाये अअमाले खुद गिरिफ्तार शूदा बा अहल् व

१९ व अयाल दर सरहद्दे भक्कर असीर व दस्तगीर गश्ता व इनशा —— सुज़ाये इक नाशिनास नीज अनकरीब मुस्तासल खाहद्

२० गर्दीद इनायते अश्रफ रा शामिलेहाले खुद दानिस्ता दर खुरे नीको खिदमती उमीद्वारे मराहिमे पादशाही बाशद् बराये

२१ सरफ्राज़ीये ऊ खिलअते फाखिरा इनायत फर्मूदीम बतारिखे ४ झीकादा सनये अहद् अज जुल्से मुबारक मुवाफिके सनये १०६९ हिज्री तहरीर याफ्त ५

सहूल् वसल्

# भाषांतर

समकालीन व बरोबरीच्या लोकांत श्रेष्ठ, उमराव मंडळांत अग्रेसर, कृपेस पात्र, इस्लामचा आज्ञांकित, बादशहाचा कृपाकांक्षी शिवाजी यानें जाणावें कीं, सर्वांत श्रेष्ठ व अतुल असा जो सर्वशक्तिमान परमेश्वर त्याने सत्कृत्यें व दानशूरता यांचा प्रसार करण्याकरितां, न्यायाचा स्तंभ उभारण्याकरितां व जुलमाचा पाया खणून काढण्याकरितां आमच्या राज्याची ध्वजा विजयाच्या अवतंसानें सुशोभित करून शनीच्या कळसास पोहोचविली; व आमचे करवी सामर्थ्यवान शत्रूंचें व ज्यांच्या डोक्यांत स्वातंत्र्याचे वेड शिरले होते व जुलमाचे वारे भणाणत होते असे जे धर्माचे व राज्याचे द्वेष्टे त्यांचें निर्दालन केले. आपल्या पूर्वीच्या मेहेरबानीस अनुसरून आह्मी शुभ रमजानच्या २४ व्या तारखेस आदितवारीं खलिपाच्या सिंहासनाला आपल्या बसण्यानें आलंकृत केलें व सुखाचे दरवाजे सर्वांस खुले केले. तुह्मी या सुखसमयीं आपल्या नोकराबरोबर अर्जदास्ती पाठविली ती खलिपाच्या सिंहासनाच्या पायथ्याशी उभे राहणाऱ्या आमच्या नोकराचे द्वारां आमच्या पवित्र व उच्च नजरेखालून जाऊन त्यांतील आशय जगाला सुभोभित करणाऱ्या आमच्या मनाला विदित जाला. गगनाचा भेद करणाऱ्या आमच्या या दरबाराच्या उंबरठ्यावर राजनिष्ठा व सेवा यांही निश्चयपूर्वक पायरव करून श्रेष्ठ अशा या राज्याचा आधारस्तंभ, विश्वासपात्र, ईश्वराचें भजन करणारा, सुखाचीं चिन्हे असणारा असा सरदारश्रेष्ठ उमदतुलमुल्क ज्यास दक्षणची सुभेदारी देण्यांत आली आहे व ज्याला पूर्णाधिकार देण्यांत आल्यामुळें जो उच्चपदाला पोंचला आहे त्याच्या मर्जीनुरूप तो सला देईल त्या प्रमाणें तुह्मी काम करावें.

आमच्या कृपाछत्राखालीं असणाऱ्या त्या अमलदाराच्या सल्याबाहेर तुह्मीं वागूं नये. जीं जी कामे तुमचेकडे येतील त्यांचा तुह्मी उत्तम रीतीनें फडशा पाडावा आणि अर्जाचा निकाल करण्यांत न्यायाचें परिपालन करावे. अदृश्य सृष्टीचे पूर्णत्वानें अवलोकन करणाऱ्या आमच्या अन्त.करणापुढे जी जी कामे आह्मी ठेविली होतीं ती ती चांगल्या प्रकारें पार पडून राज्याची इमारत भरभक्कम उभारली गेली. ईशकृपेनें व नशिबाने आमच्या अभागी शत्रूंस केल्या कर्मांचें फल मिळाले व ते मुलांबाळांसह भकरच्या सरहद्दीवर पकडले गेले. कृतघ्न सुजाचीं पाळेमुळें लवकरच खणली जातील. आमची अति श्रेष्ठ अशी मेहेरबानी तुमचेवर आहे, असे जाणून योग्य ती नोकरी बजावून आमच्या कृपेची वांछा धरून असावे.

तुमचा दर्जा वाढविण्याकरितां तुह्मांस पोशाख पाठविला आहे. ता. ४ जिलकाद सन १०६९ हिजरी.

# शिवाजीचें एक पत्र

सदरील कागद नकल आहे. तथापि त्यांतील मजकुराची रचना व तो सातारकर छत्रपतींच्या प्रीतीतल्या पोतनिसांकडे मिळाला ह्या गोष्टी ध्यानांत घेतल्या तर कागद विश्वसनीय मानण्याला हरकत दिसत नाही.

कागदांत एक महत्वाचे विधान आहे. कागद तिसा खमसैन छ १३ मोहरमचा ह्मणजे शके १५८० आश्विन शु. १५ ( इ. स. १६५८ आक्टोबर ) चा आहे. या वेळीं

'साहेब करणाटकप्राती मसलतीस गेले'

असा महत्वाचा उल्लेख यांत आहे. ह्या च वेळीं अफजलखान शिवाजीच्या हालचालीची वर्दी देण्यास विजापूरदरबारीं गेला. त्या वेळीं महाराज कर्नाटकांत राजकारण करीत असल्याचा सुगावा या पत्रावरून लागतो. रा. राजवाडे यांनी हनगंडीकर देसाई यांचे कागद पाहिले आहेत, त्यांवरून अफजलखानाला दस्त करण्यापूर्वी सुमारें ८।१० वर्षे महाराजांनी खानाच्या कक्षेंतील प्रदेशांवर कहर चालविला होता अशी हकीकत निघत असल्याचे ते सांगतात. अर्थात् कर्नाटकाकडे ह्मणजे दक्षिणेकडे शिवाजीचा मोर्चा वारंवार वळावा यांत नवल नाही व या योगे च त्रस्त होऊन अफजल विजापुरीं गेला. वरील पत्रावरून ही च गोष्ट समर्थित केली जाते. महाराजांच्या या 'मसलती'चा हि पसारा यथार्थपणे ध्यानांत येण्यास अधिक पुरावा शोधून काढिला पाहिजे.

दुसरी बाब ह्मणजे हें पत्र महाराजांनी ज्याला लिहिलें तो कृष्णाजी भास्कर हा जर खानप्रकरणीं प्रसिद्धीस आलेला कृष्णाजी भास्कर वाईकर च असेल तर तो 'देशाधिकारी व लेखक प्रांत बारा मावळ' होता असें अनुमान करणें रास्त होईल.

दत्तो वामन पोतदार

श्री

नकल

मशरुल हजरत कृष्णाजी भास्कर देशाधिकारी व लेखक प्रांत बारा मावळ यांसि प्रत राजश्री सिवाजी राजे दंडवत सुा तिसा खमसेन आलफ मौजे कलबोली ता। पौनमावळ व मौजे रावडे ता। पौडखोरे या हरदो गांवाचा सिवेचा कथला लागला आहे ह्मणोन पूर्वी तुह्मास आज्ञापत्र सादर केले होते त्यावरून तुह्मी मौजे मा।रास जाउन कथळा मनास आणिला त्यांसि आरजोजी ढमाला हा ह्मणो लागला कीं आपले गांवीची सीव खरी आपण दिव्य करुन त्यावरून सर्व देशक मेळउन दि चा तह दिल्हा इतकियामधे दुसरे दिवसी आरजोजी ढमाला देश ता। पौड खोरे [ गैरहजर ? ] जाला सबब नरहरी दिवाकर देश

पौनमावळ व हावजी पा। मौजे कलबोली ता। मा।र याणी हजुर पुरधरचे मुकामी [ येउ ] न विदित केले त्यावर साहेब करणाटक प्रांतीं मसलतीस गेले त्या प्रांतीहून आलियावर जो निवाडा करणे तो करितील तो परियंत मौजे कलबोली ता। पौनमावळ व मौजे रावडे ता। पौडखोरे या हरदो गांवामधे टकियाचे कासेची जमीन आहे ते आमानत आसो देणे या पत्राची प्रती घेउन असल नरहरी दिवाकर देशकुलकर्णी ता। पौनमावळ याचे हावाला करणे जाणिजे छ १३ माहे मोहरम मोर्तब सुद



रुजु सुरनवीस
सुरु सुद बार
बार

---

# अंबाबाई उदो ।
अथवा
# नाथसंप्रदायांतील एक महत्त्वाचा नवीन दुवा.

गेल्या दिवाळींत उरवड्याचे श्री. पोतनीस यांचे संग्रहांत दीनकविकृत पंचीकरण महावाक्यावरील एक ओवीबद्ध ग्रंथ सांपडला, त्याचा परिचय मंडळास

पूर्वीच करून दिला आहे. त्याच्या शेंवटच्या ( १८ व्या ) अध्यायांत आदिना थापासून ज्ञानेश्वर—तुकोबा–बहिणाबाई--दीन अशी परंपरा देतांना कवीने आदि नाथानंतर दुसरे नाव उदोनाथांचे दिले आहे. ते फार महत्त्वाचे असून एका महत्त्वाच्या गोष्टीचा अकल्पित निर्णय त्याचे योगें लागत आहे. प्रथम तेवढ्या ओव्या येथे देतोंः—

**कव्हणी येके वेंळी ॥ कैलासभुवनी चंद्रमौळी ॥ सभा घनवटली मेळीं ॥ देवसीद्धगंधर्वेंसी ॥ १३ ॥** वामे उमा जगत्रजननी ॥ पाहे सभा नीरखुनी ॥ **तवं देवगंधर्वमुनी ॥** जाले ध्यानी तटस्त ॥ १४ ॥ मुरडोनी पाहे शंकरा ॥ **पंचवगत्र दीगंबरा ॥** च्यारीवदनें समाधी सेजारा ॥ देखीलीं इतरां सारीखीं ॥ १५ ॥ पांचवें मुख पाहे ॥ तयाची + + + ये ॥ **हें देखोनी** नीवांत होये ॥ **उदोनाथ जगदंबा** ॥ १६ ॥ + + + **सर्जी मदनारी** ॥ उमा उभी जोडलां करी ॥ कोण मंत्रजपाची परी ॥ ते **श्रीपुरारी मज सांग** ॥ १७ ॥ पाचारुनी पुष्पवीमान ॥ पार्वतीसहीत कैलासराणा ॥ क्षीरसींधुचया स्छाना ॥ पैलतीरा उत्तरले ॥ १८ ॥ पुढे बैसउनी पार्वती ॥ राममंत्रा उपदेसीती ॥ ज्ञानशक्ती प्रवेषगती ॥ आत्मारामीं मीळाभया ॥ १९ ॥ अलक्षमुद्रा आदीनाथा ॥ ते चि ते उदोनाथा ॥ तये संधी **मछेंद्रनाथा** ॥ गोरक्षनाथा तो बोधु ॥ २० ॥

या ओंव्यांत

आदिनाथ
|
उदोनाथ
|
मछींद्रनाथ
|
गोरक्षनाथ

अशी परंपरा स्पष्ट दिली आहे. यांत व उपलब्धपरंपरांत. एक अत्यंत महत्त्वाचा भेद आहे व तो ह्मटला ह्मणजे **उदोनाथ** हे नांव वरील परंपरेंत नवीन व अधिक आहे. पण याहून हि महत्त्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे १७ व्या ओंवीतील उल्लेख होय. यांत **उदोनाथ ह्मणजे च जगदंबा** असे स्पष्ट ह्मटलें आहे. वास्तविक पाहतां “ आदिनाथें उपदेश पार्वतीस केला । मच्छिंद्रें ऐकिला मच्छगर्भी॥१॥”( बहिणाबाई—कविता भाग १ पृ. २ ). या किंवा अशा उल्लेखांतून आदिनाथाने ह्मणजे शंकरानें पार्वतीस उपदेशिल्याचे जर स्पष्ट सांगतात तर नाथसंप्रदायाची परंपरा देतांन

पार्वतीस वगळणें रास्त होणार नाही. नाथसंप्रदायाप्रमाणें स्त्रियांना दीक्षा देण्याला कांहीच प्रत्यवाय नाहीं. गुप्तनाथ व खुद्द बहिणाबाई यांची उदाहरणें आहेतच.

नाथसंप्रदायांतील हा राहिलेला अज्ञात दुवा आपली परंपरा देण्याचे भरत दीनकवीनें सहज प्रकट केला आहे. आदिनाथाने पार्वतीस उपदेश केला. तीं पार्वती च '**उदोनाथ**' या नावाने नाथसंप्रदायांत ओळखली जाते. वरील ओव्यांत ही गोष्ट स्पष्ट झाली आहे.

या खुलाशावरून दुसऱ्या हि एका गोष्टीचा अर्थ स्पष्ट होत आहे. देवींचे उपासक उपासनाप्रसंगी 'उदो' 'उदो' म्हणत असतात. 'उदयोऽस्तु' या संस्कृत इच्छाप्रदर्शक पदांचा 'उदो' हा अपभ्रंश मानण्याची वहिवाट आहे. कदाचित् बरोबर असेल; परंतु 'उदोनाथ' हे पार्वतीचे संप्रदायिक नांव माहित झाल्यावर वरील 'उदो उदो' ही पदे विजयेच्छाप्रदर्शक न समजतां तीं अंबेचीं च संबोधने मानण्याकडे बळकट ग्रह वळतो. इतर कोणत्या हि देवतांच्या उपासनार्थ 'उदो' शब्द उच्चारण्याची चाल कां नाहीं हे आतां कोणास हि कळून येईल. 'उदो' हें अंबाबाईच्या सांप्रदायिक नांवाचे लघुरूप होय.

माघ वा॥१४<br>१८३७<br>शिवरात्र.पुणे.

**दत्तो वामन पोतदार**

---

# भक्तमंजरीमालेचें ऐतिहासिक महत्त्व

बारामतीस मोरोपंतांचे समकालीन श्रीसिद्धनाथ रामदासी या नांवाचे एक सत्पुरुष होऊन गेले. हे मोरोपंतांपेक्षां वयानें पुष्कळ च म्हणजे ३५ वर्षांनी लहान होते असे प्रसिद्ध हकीकतीवरून दिसते. मोरोपंताच्या चरित्राच्या उत्तरार्धाच्या सुमारास या सिद्धनाथांचा जन्म झाला असल्यामुळें यांनीं आपल्या पूर्व अमदानीत मोरोपंतांचे चरित्र जसें पाहिले व त्यावरून आपल्या मनाच्या जशा समजुती करून घेतल्या त्या च समजुती सिद्धनाथाच्या संसर्गांतील राजारामप्रासादीसारखी जी मंडळी त्यांच्या झाल्या हें उघड आहे. या राजारामप्रासादीने, महिपतीनंतरच्या १०० वर्षांत महाराष्ट्रांत जे सत्पुरुष व कवि होऊन गेले, त्यांची चरित्रे महिपतीच्या धर्तीवर ज्यांत वर्णिलीं आहेत, असा १०९ अध्यायांचा व सुमारें १२००० ओव्याचा भक्तमंजरीमाला नामक एक ग्रंथ लिहिला आहे हें प्रसिद्ध च आहे. या ग्रंथासंबंधाने जी हकीकत लोकांच्या वाचण्यांत असेल ती सर्व धुळयास रा. देव यांच्या संग्रहीं असलेल्या नकलेवरून प्रसिद्ध झालेली आहे.

कोणत्याहि ग्रंथांतील विधानांचें प्रामाण्य किती मानावें या बाबतींत हि ग्रंथाची मूळप्रत च अधिक उपयोगी पडते असा अनुभव आहे. परवां नुकत्याच पंढरपुरास चाललेल्या चातुर्मासे विरुद्ध खाजगीवाले या खटल्यांत या भक्तमंजरीमालेची मूळप्रत पुराव्यांत दाखल करण्यासाठी राजारामप्रासादीचे वंशज घेऊन आले त्या वेळी ती प्रत आपातत. अवलोकन करण्याची संधि मला मिळाली. त्या वेळी मोरोपंतांच्या चरित्राविषयीचा ८३ वा अध्याय वाचीत व सूक्ष्म निरीक्षित असतां एक गोष्ट माझे नजरेस आली. तीवरून राजारामप्रासादीने भक्तमंजरीमालेतील चरित्रांतून ज्या गोष्टी वर्णिल्या आहेत त्या बहुधा कल्पनातरंगात्मक च असाव्या, त्यांमध्ये ऐतिहासिक सत्य फारसें नसावें, असें माझें मत झालें. चरित्रविषयक व्यक्तीचे वर्णन करितांना जन्मकालस्थिति, बाळपण, मुंज, लग्न, गृहस्थाश्रम, गुरुप्रसाद, ईश्वरीसाक्षात्कार वगैरे ठरीव मुद्दे व त्यांचे ठरीव पद्धतीने वर्णन करण्याची पद्धति राजारामप्रासादीची दिसते. जन्मकालस्थिति म्हटली म्हणजे ते कुल अगदी अवनत स्थितीला पोंचले होते म्हणून अमुक देवाने त्यांत अमुक रूपाने अवतार घेतला असे वर्णन करावयाचे, आईचे डोहाळे हि सांगावयाचे, बाळपणी अत्यंत खेळकर स्वभाव होता, संवगड्यांची प्रीति फार होती असें सांगावयाचे, मुंजीलग्नाच्या वेळी मंडप फार मोठा व शोभिवंत घातला होता, सर्व गणगोत लोटले होते, पुष्कळ ब्राह्मणभोजन झाले, दक्षणवगैरे विपुल वाटली, पुढे मुलेबाळे झाली, कांहीं काव्यरचना केली, गुरुप्रसाद झाला, ईश्वरी साक्षात्कार झाला व अखेर जनाला चटका लावून आपले अवतारकार्य संपविलें, या ठरीव सांच्यांत बहुधा कोणाहि संतकवीचें चरित्र ओततां येते व मोरोपंतांचे राजारामप्रासादी याने वर्णन केलेले चरित्र वाचत असतां हीच गोष्ट प्रत्ययास येते. राजारामप्रासादीने मोरोपंताच्या चरित्रावर आरंभी एकंदर ८८ ओंव्या रचिल्या होत्या; परंतु त्यांपैकी २ ओंव्या त्याच्या त्यानेच लेखणीने खोडून व हरताळीनें हरताळून टाकल्या असल्यामुळे आतां ८६ ओंव्याच शिल्लक राहिल्या आहेत. या हरताळलेल्या ओंव्यावरील हरताळ दूर करून, त्यामध्ये राजारामप्रासादीचा काय हेतू व्यक्त झाला आहे तो पाहण्याचा मी यत्न केला, त्या वेळी पुढील २ ओंव्या हरताळल्या आहेत असें कळून आले.

तये कुळांत पूर्वापार । नाहीं झाले संतअवतार ।
संततीसंपत्तीचा भर । नकळे विच्यार स्वहिताचा ॥ १८ ॥
यालागी तये शाखेत । आवतरले गौरीसुत ।
कऱ्हाडे ब्राह्मण ज्ञातीत । द्रवले चित्त गजाननाचें ॥ १९॥

या १८ व १९ क्रमांकाच्या २ ओंव्या न हरताळतां तशाच कायम राहूं दिल्या असल्या तरी कांहीं बिघडलें असतें असें इतर ओंव्यातील मजकुरावरून वाटत

नाहीं. या ओंव्या एकदा रचून पुन्हा न रचल्या सारखे दाखविण्यांत राजाराम-प्रासादीचा काय हेतू होता हे कळत नाहीं. तथापि राजारामप्रासादीच्या या मोरोपंतचरित्रावरून, शितावरून भाताची परीक्षा या न्यायाने, त्याचा भक्तमंजरी-माला नामक ग्रंथ महिपतीच्या तसल्याच चरित्रात्मक ग्रंथांच्या हि कसोटीला उतरेल असें वाटत नाहीं.

जुने ग्रंथ किंवा कागदपत्र शोधण्याचें व त्यांतील माहिती लोकांपुढें मांड-ण्याचें कार्य करणाऱ्या लोकांनी जुना कागद ह्मटला कीं त्यांतील प्रत्येक विधान सत्य असें मानून चालावयाचें नाहीं. कागदावर लिहिलेल्या सर्व च गोष्टी हल्लीच्या काळीं हि जशा व्यक्तिस्वभावानुरूप खऱ्या अथवा खोट्या असूं शकत नाहींत तसाच प्रकार जुन्या कागदपत्रांसंबंधानें हि समजावा. राजारामप्रासादीच्या या मोरोपंताच्या चरित्रावरून मोरोपंत या व्यक्तिविषयींच्या भाबड्या आख्यायिकापेक्षां जिला ऐतिहासिक सत्य असे विनधोकपणे ह्मणतां येईल अशी एक हि गोष्ट नवीन समजल्याचें समाधान वाचकाला होत नाहीं. यावरून एक च गोष्ट लक्षांत ध्याव-याची ती ही कीं, ऐतिहासिक व्यक्तींचीं चरित्रे लिहितांनां मिळेल ती साधनसामुग्री मिळवावी, गोळा करतां येतील तितक्या आख्यायिकाहि गोळा कराव्या; परंतु ही सर्व माहिती ऐतिहासिक कसोटीच्या भट्टीतून पचून निघाल्याशिवाय, तीवरून चरित्र-ग्रंथ लिहितांनां कसलींहि अनुमानें काढण्याच्या भरीस लेखकाने पडूं नये हें चांगले. अशा दृष्टीनें मोरोपंताच्या चरित्राचे संशोधन अद्यापि पुष्कळच झाले पाहिजे हे माझ्या विद्वान संशोधक बंधूंनी लक्ष्यांत ठेवावें.

पुणे
वैशाख वद्य १३
१८३८

रा. द. पराडकर

# महादजी शिंदे अलिजाबहादर यांचीं शेवटचीं दोन वर्षें

माझे मित्र रा. रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं भगीरथ प्रयत्न करून सर-दार पटवर्धन घराण्यांच्या दप्तरांत सांपडणारे महत्त्वाचे ऐतिहासिक कागद मिळ-विले व ते प्रायः स्वतःच्या हिंमतीवर छापूनहि बहुतेक काढले. गेल्या महाशिव-रात्रीचे सुमारास मी मिरजेस गेलों होतों, तेव्हां रा. खरे यांच्या अनुग्रहानें मीं कांहीं अस्सल कागद तेथेंच वाचले. वाचतांना व वाद करितांना 'महादजी शिंद्यांचा पुण्यास मुक्काम' या विषयावर मी कांहीतरी लिहावें असें रा. खरे

यांनीं मला सांगितलें व त्यांजवळील छापील व लेखी सामग्री त्यांनीं मला उदारमनानें दिली. या सवलती रा. खरे यांनीं मला दिल्या व स्वतःचा अधिकार मोठा असतांहि मला मनोरंजक व मनसंस्कारी विषयावर लिहिण्याची अनुज्ञा दिली याबद्दल रा. खरे यांचे पूज्यबुद्धिपुरःसर आभार मानून मी आतां स्वीकृत कार्याकडे वळतों.

या विषयासंबंधानें जितकी माहिती अवश्य हवी तितकी मला मिळाली नाहीं हे मी प्रथमच सांगून ठेवितों. रा. खरे यांच्या पत्रांशिवाय माझी सारी भिस्त इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालेली माहितो, भा० इति० सं० मंडळाच्या दप्तरीं असलेल्या श्री० चंद्रचूडदराण्यांतील अद्यापि अप्रसिद्ध असलेल्या कागदांपैकीं कांहीं कागद, जिवबादादांचें चरित्र, कीनकृत महादजी ( माधवराव शिंदे ), भिडेकृत अष्टप्रधानांचा इतिहास, फ्रेझरकृत ‘ आमचे दोस्त निजाम ’ ( Our Ally the Nizam ), काव्येतिहास संग्रहांत प्रसिद्ध झालेल्या बहुतेक सर्व बखरी व कैफियती, श्री. बावडेकरांचा इतिहास, रा. ब. वाडकृत ‘निवडक’ उतारे ( Peshwa's Diaries ), ग्रांट डफचा इतिहास यांवर आहे.

महादजी शिंदे हे अलौकिक पुरुष होते यांत शंका नाही. या रणशूर, सद्वर्तनी, धर्मनिष्ठ, पण महत्वाकांक्षी बहाद्दराने थोरल्या शिवाजी महाराजांची अप्रकट आणि थोरल्या शाहूमहाराजांची प्रकट इच्छा परिपूर्ण केली. यद्यपि नानासाहेबांच्या उद्दामी, धूर्त व कार्याकार्यविवेकी अध्यक्षत्वाखालीं मात्र नियमानें वागणाऱ्या पण स्वभावतः उत्पाती असणाऱ्या रघुनाथराव दादासाहेबांनी अटकेपार भगवा झेंडा नेऊन ‘ गंगेंत घोडे नाहले ’ ही ह्मण सार्थ केली हे खरे आहे, तथापि दिल्लीच्या पातशहास न दुखवितां-नव्हे त्या बिचाऱ्यास आश्रय देऊन-दिल्लीची पातशाही महादजींनीं मराठी साम्राज्यांत अंतर्भूत केली हा अपूर्व योग होय, असें ह्मटलें च पाहिजे. हिंदुस्थानांतील ( अर्थात उत्तर हिंदुस्थानांतील ) मुसलमान सरदार व जहागिरदार व त्याच प्रमाणे रजपूत राजे या सर्वांस मराठी भाल्याचा पराक्रम दाखवून मराठ्यांचे वर्चस्व कबूल करावयास लावणारा, कवायती सैन्य तयार करवून, प्रत्यक्ष इंग्लिशफ्रेंचांसारख्या बलिष्ठ व सुयंत्रित राष्ट्रांशी बरोबरी करण्याची हांव धरून ती सिद्धप्राय करणारा, सैनिकांस प्रेमाने वागवून त्यांची एकनिष्ठता संपादन करणारा, मुत्सद्देगिरीचे डावपेंच मोठ्या कौशल्यानें खेळून आपलें वर्चस्व प्रतिष्ठापित करणारा मराठी सेनापति आठराव्या शतकाच्या तिसऱ्या चरणांत एकटा एक महादजीच होता, असें निःशंक मनानें मी ह्मणतों. राघोबाच्या विघातक बंडाचा बीमोड करण्यांत नानांला जर कोणीं मनोभावें साह्य केलें असेल तर तें शिंदे, फडके व पटवर्धन यांनींच होय. त्यांतहि शिंद्यांचा रुबाब, त्यांचें मिठास भाषण, त्यांचे प्रसंगावधान, त्यांचे धैर्य आणि त्यांचें

वीर्यशाली सेनापतित्व यांचा विशेष उपयोग झाला. येथील म्हणजे दक्षिणेंतील व्यवस्था ठाकसेठीक करून, म्हणजे नानांच्या हातीं देऊन, उत्तर हिंदुस्थानांत महादजींची स्वारी गेली. तेथें त्यानीं १०--१२ वर्षे एकसारखे खपून सर्व पादशाही आपल्या स्वाधीन करून घेतली, बादशाहाचे शत्रूंचा नायनाट केला व पंजाब, बंगाल व अयोध्या हे प्रांत खेरीजकरून बाकीचा सर्व उत्तर हिंदुस्थान आपल्या ताब्यांत आणिला. या पराक्रमी सत्कृत्यांत महादजीस होळकरांचे व अलीबहादराचे साह्य होतें; पण तें त्रुटित, अनियमित आणि अपुरें असें. तथापि या व्यतिचारी संकटांस न जुमानितां ज्या रणधीर वीरानें मराठ्यांच्या आकांक्षा पूर्ण करून त्यांचें नांव जगाच्या इतिहासांत जास्त अभंग करून ठेविलें, तो आह्मांस--सद्यःकालीन सौराज्याचे सौभाग्यसुख अखंडत्वानें उपभोगणाऱ्या आह्मांसहि–सदैव वंद्यच होय.

असो; हिंदुस्थानांतील व्यतिपाती बंडांचा मोड करून व तीं पुन्हां न उद्भवण्याची लष्करी व्यवस्था करून, १७९२ चे आरंभीं महादजी जेव्हां दक्षिणेस यावयास निघाले तेव्हां इकडे येण्याचा या कार्यकर्त्या पुरुषाचा हतू काय असावा, असा प्रश्न सहजच उद्भवला आणि अनेक लोकांनी अनेक तर्ककुतर्क केले यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

( अ ) मराठ्यांस महाराष्ट्राची आवड मोठी. तो च त्यांचा स्वदेश. त्यांच्या सर्व इष्टदेवता व कुलदैवते महाराष्ट्रांत. तेव्हां एक सगळे तपच्यातप बाह्यप्रदेशांत घालविल्यावर विश्रांति घेण्यासाठीं ह्मणा, घरच्या पिढीजाद उंबरठ्याचें व जोतिबाखंडोबांचें दर्शन घेण्यासाठीं ह्मणा, पेशव्यांच्या पायीं मस्तक ठेऊन त्यांच्याकडून शाबासकी मिळविण्याकारितां ह्मणा, किंवा जुन्या इष्टमित्रांस भेटण्यासाठी ह्मणा, महादजीस इकडे येण्याची इच्छा होणे हे अगदीं साहाजिक आहे. अर्थात, मराठ्यांस ‘ लुटारु ’ नांवानें मात्र संबोधणाऱ्या लेखकांस हा हेतू समजणे शक्य नाहीं.

( आ ) बारा वर्षें परदेशांत काढून जी काय आपण कामगिरी केली ती यजमानास श्रुत करून, सालोसालचे हिशेब दाखवून, आपण केलेल्या सर्व कारभारावर यजमानाची मखलाशी करून घ्यावयाची आणि देणे घेणे पहावयाचें, हाहि त्यांचा हेतू होता.

( इ ) हिदुस्थानांत असतांना, होळकरांची व ह्यांची, अलीबहादरांची व ह्यांची चित्तशुद्धता नव्हती; तिच्यासंबंधाने वाटाघाट करून द्वैधभाव मोडून टाकावा व तेथें एकतंत्री कारभार करावा हा हि त्यांचा हेतू असला पाहिजे. होळकर, अलीबहादरास दाक्षिणेंत कायमचे परत बोलावणें हा हेतू नव्हता.

( ई ) बादशाहानें जी मानाची सनद दिली होती ती मोठ्या समारंभानें

आपण यजमानास, ह्मणजे पेशव्यांस, अर्पण करावी व पेशव्यांकडून वकिलातीची सनद आपण घ्यावी, हा तर प्रधान व जाहिराणा हेतू होता.

( उ ) निजामाच्या जहागिरीतील बीड वगैरे प्रांत सोडवून तो प्रांत आपल्याकडे घ्यावा, निजामाशीं स्नेह करून हे काम करावें, वेळ पडल्यास नानांशीं प्रत्यक्ष वांकडें होऊन हि हें काम करावे; व

( ऊ ) हा हेतू साधण्यासाठीं नानांच्या कारभारांतील वैगुण्यें दाखवून सर्व कारभार आपण आटपावा आणि आपल्या गुरूच्या जन्मभूमीचा गांव व प्रांत सोडवावा असा हि हेतू होता.

( ऋ ) बंगाल्याकडील चौथाईची गोष्ट इंग्लिश लोकांस सहन होण्यासारखी नव्हती. तेव्हां प्रतिदिवशीं जड होत जाणाऱ्या इंग्लिश लोकांच्या संबंधानें विचार करावा व पुण्यांतील मुत्सद्यांचें काय ह्मणणें पडतें ते पहावें, हें काम हि त्यांस करून घ्यावयाचें होते.

असे अनेक हेतू धारण करून स्वामिनिष्ठ राणोजी शिंद्यांचा जगद्विजयी, मुत्सद्देगिरींत वाकबगार, मिहास भाषण करणारा, साध्या वर्तनाचा पण आतल्या गांठीचा, सर्वांवर दबाब ठेऊन आपला वक्र बसविणारा, डौली, महावीर दक्षिणेत येणार ह्मणून १७९१ मध्ये वार्ता आली, तेव्हां अनेक लोकांनीं अनेक वेडेवाकडे तर्क आपापल्या बुद्धीनें केले. प्रसिद्ध रणशूर जिवबादादांच्या मनोरंजक चरित्रांत कित्येक पत्रें छापिली आहेत-पत्रांच्या तारखांविषयीं ग्रंथकर्त्यानें फारशी काळजी घेतलेली दिसत नाहीं—त्यांवरून पाटिलबोवांचा इकडे येण्याचा बेत १७९१ सालींच झाला होता असे दिसतें.

रजपूत राजांस नामोहरम करून व दिल्लीकडील कारभाराची व्यवस्था लावून पाटीलबावा उज्जनीहून निघाले, ते ब्ऱ्हाणपूर, बीड , जांबगांव वगैरे मार्गानें दक्षिणेंत आले. येतांना सत्त्वास येथें मातुश्री अहिल्याबाईनी पुष्कळ खर्च करून आपले ठाणें कायम केले होते, ती व्यवस्था मोडून पाटिलबावांनी आपला हि अंमल तेथे जारी केला. सत्त्रस्थ अहिल्याबाईची भेट या राज्यकारस्थानी पुरुषास नको होती, ह्मणून हा नवीनच रस्ता काढून साधा लवाजमा व एक कवायती पलटण बरोबर घेऊन ही स्वारी निघाली. पातशाही सनदा वगैरे मागाहून आणविल्या. यावरून सनदा अर्पण करण्याचा बेत मागाहून ठरला असावा. असो. याप्रमाणें होळकरशाहीविरुद्ध सत्त्वासच्या मालकीचें आणखी एक नसतें भांडण उत्पन्न करून हे यशोदास अलिजाबहाद्दर बीड येथे गेले. तेथे आपल्या एका हस्तकाच्या मुलाचा व जांबगांवी दौलतराव शिंद्यांचा लग्नसमारंभ उरकून महादजीची स्वारी तारीख १३ जून १७९२ रोजी वानवडीवर दाखल झाली. हें जाडें प्रकरण दक्षिण प्रांतांत येणाच्या कित्येक महिने अगोदरच नानांच्या ठायीं पूर्ण

निष्ठा असणारे चतुर सेनापति हरिपंत फडके टिपुसुलतानची लढाई आटपून पुण्यास येऊन हजर झाले होते. चंद्रचूडांच्या पत्रावरून स्पष्ट दिसते की, तुकोजी होळकरांनी नानाचे साहाय्य करण्यास येण्याची इच्छा दर्शविली होती. पण नानांनीं जांबगांवी लग्नाचा आहेर पाठविला व शिंदे यांची व आपली निखालसा करून घेतली होती असें पाहून त्यांनी येण्याचें टाळले असे आपल्या दिग्विजयी कर्त्या सरदारास त्यांच्या पत्रांवरून (इ० सं० पु० १ अं० ३ ऐति० टि०) दिसतें.

ज्येष्ठ वद्य ९ ( ता. १३ जून ) दिवशीं सायंकाळीं श्रीमंत सवाई माधवराव साहेब पेशवे लवाजम्यासह गणेशखिंडीपर्यंत–' संगमकडे नव्हे ' ( डफ )–सामोरे गेले. ' पाटिलबोवांनी श्रीमंतांच्या पायावर डोई ठेविली आणि भेटले, श्रीमंतांनी आपले गळ्यांतील मोत्याची माळ पाटिलबावांचे गळ्यांत घातली. ' (इति० सं० पु. १ ऐति. टि. ) समारंभ फार चांगला झाला. निजामशाहीतील पेशव्यांचे वकील गोविंदराव काळे ह्मणतात " या स्वामीसेवकांच्या भेटीच्या अखबारा रूमशाम पावेतों जातात. या पुण्याईस जोडा नाहीं." पाटिलबोवांची अति विनम्रवृत्ति पाहून सामान्य लोकांस सकौतुक अत्यानंद झाला, परंतु मुत्सद्यांच्या मनांत कोणत्या विचारांचा कोलाहल झाला असेल हें त्या सर्वज्ञ परमेश्वरास ठाऊक. विनम्रतेचा अतिरेक संशयोत्पादक होतो.

दुसरे दिवशीं ( ता. १४ जून ) पाटिलबावा सरकारवाड्यांत गेले आणि "मीरबक्षीगिरीचा बहुमान पातशहांनीं दिला आहे तो घ्यावा अशी श्रीमंतांस विनंति केली." हा बहुमान मोठासा नव्हे, पेशवे सातारकर महाराजांचे चाकर, इत्यादि अनेक प्रकारचे प्रश्न प्रतिप्रश्न होऊन पुष्कळ भवति नभवति झाली. होळकरांचें पत्र (५ जुलै १७९२ नं. २६२) याच हिशेबाचें आहे. प्रश्न तात्त्विक राजनीतीचा होता. येथें मत्सरादिकांचा प्रश्न नाहीं.तथापि पाटिलबोवांचा आग्रह विशेष, पाटिल कार्यकर्ते सेवक,हे सर्व ध्यानांत घेऊन श्रीमंतानीं बहुमान घेण्याची इच्छा दर्शविली आणि साताऱ्याहून परवानगी आणवून" बहुमान" घेण्याचें ठरविलें. मुहूर्त आषाढ शुद्ध ३ चा ( २२ जून ) धरला. समारंभाचें सुंदर वर्णन, ऐति. ले. सं० पत्र नं० ३४८२ व इति० सं० पु० १ अं० २–३, यांत वाचकांस पहावयास मिळेल. त्यांतल्या त्यांत इति० सं० पुस्त० १ अं. ३ मधील गोविंदराव काळे यांचे पत्र अत्युत्तम आहे. या पत्रांत शककर्ते व धर्मराखते शिवाजीमहाराजांचा प्रतापचंडसूर्य, नानासाहेब व भाऊसाहेब पेशवे यांचा, " बुद्धि व तरवार यांच्या " पराक्रमाने पातशहावर हि उपकार करणाऱ्या पाटिलबोवाचा उल्लेख हे पराकाष्ठेचे हृदयंगम आहेत. " न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त **शककर्त्याप्रमाणें** होऊन उपभोग घ्यावे.... कोठे दृष्ट लागेल की काय !.... केवळ मुलुख राज्यप्राप्त इतकें च नाहीं, **वेदशास्त्रसंरक्षण, धर्मसंस्थापन, गोब्रा-**

**ह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व** हातीं लागणें इतक्या गोष्टी आहेत ! हे किमया संभाळणें हक्क आपला ( नानांचा ) व पाटिलबोवाचा ! ...... संशय दूर झाले. अति चांगलें. अति चांगलें. इत्यादि इत्यादि" या विस्तृत उताऱ्यावरून रा. गोविंदरावासारख्या चाणाक्ष व अभिमानी मुत्सद्यांचें स्वराज्यासंबंधानें किती उच्च धोरण होते, **धर्मसंरक्षणासाठीं मात्र स्वराज्य हवें,** हा मुख्य हेतू अद्यापि कसा जागरुक होता, हें कळण्यासारखें आहे. दुर्दैवाची गोष्ट कीं, काळे भीत होते तशी दृष्ट लागली आणि दहा वर्षांच्या आंतच या भारती पेशवाईची उलटी अंबारी झाली ! !

या सर्व समारंभांत कुलीन मराठे क्षत्रिय उदासीन होते असे दिसते. मुसलमानांनीं दिलेला सेवाजनक 'बहुमान' मराठी साम्राज्याच्या प्रधानांनी घ्यावा कीं नाहीं, दातीं तृण धरून दीन झालेल्या पातशाहाची 'बहुमानी' सेवा अखिल भारतवर्षाचे सार्वभौमत्व मिळवूं इच्छिणाऱ्या पेशव्यांनीं पत्करावी की नाहीं, हा प्रश्न त्यावेळीं निदान आतां तरी—पांडित्यात्मक आहे. पाटिलबोवांचा आग्रह, त्यांच्या अद्वितीय कामगिरीचा बडेजाव, ह्या बक्षीगिरीच्या व मुतालकीच्या हक्काने हिंदुस्थानांत होणारी दर्शनी महंती, ह्या दृष्टींनी पेशव्यांनीं बहुमान घेतला हें चांगलें झालें. तत्त्वाच्या अथवा व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीने ह्या बहुमानकींत फारसा 'राम' नव्हता ; ह्मणून नाना, होळकर, मराठे सरदार यांनी प्रथमतः विरोध दाखविला तो गैर होता, असूयाप्रेरित होता, असे ह्मणतां येत नाहीं. मला तर नानाविरुद्ध आक्षेप काढणारे मात्र असूयाप्रेरित दिसतात. ज्यास 'ब्राह्मण कणसा खुपतो ही संवे आहे,' त्यांनी नानास मत्सरी ह्मणावें, त्यांच्यावर घाणेरडे आरोप करून त्यांस आपल्या पंक्तीस आणून बसवावे, बदामीच्या हल्याचे वेळी स्वतः मोर्चात बसणाऱ्या नानांच्या संबंधे 'जिवबादादांच्या तोफांनी नानांचें देहभान गेले,' असे ह्मणून खुशाल आनंद करून घ्यावा, माझी हरकत नाहीं. नानांचा प्रश्न तात्विक व्यवहाराचा होता. तथापि रावसाहेब पेशव्यास पराक्रमी माहादर्जीना "नाखूष" करावेसे वाटेना, हें पाहून नानांनीं आपला आग्रह सोडून दिला व समारंभ साजरा केला. असो, या प्रमाणे जन्मभूमि पाहण्याचा व बहुमान अर्पिण्याचा हे दोन हेतू तर साध्य झाले. पुढे तारीख २८ जूनला शिंद्यांनीं पेशव्यांस कमळाचा हौदा नजर केला. वाटेल तसें हे कळसूत्री कमळ फिरवितां येई.

पुढें लवकरच हिंदुस्थानांतील बारा वर्षांच्या कारभाराची वाटाघाट सुरू झाली. वाद रंगांत येऊं लागला. याचे अगोदरच सरदार परशुरामभाऊ हि आपल्या हिशोबाची ( कर्नाटकची ) पूर्तता करण्यासाठीं आले होते. महादजींनीं सरकारावर सात कोटी देणें काढलें होते ! भाऊंनी हि देणें काढले च होते. मुलुखगिरीची गुजराण बाहेरच्या बाहेर होऊन पुण्यास पैशाचा पूर लोटावा ही पूर्व पद्धति सुटून हल्लीप्रमाणे च त्या वेळीं लढाईस मनस्वी खर्च लागूं लागला होता. महादजी काय, भाऊ काय, होळकर काय, हरिपंत काय, तलब चढली त्यासाठीं शिपायांचे

आणि विशेषतः गारद्यांचे धरणे कोणत्या स्वारीत बसले नाहीं असा महिना च लोटत नसे. तात्पर्य, जिंकलेला मुलूख ताब्यांत ठेवणें व नवीन मुलूख जिंकणें हीं कामे अनावर खर्चाचीं झालीं होतीं. चौथाई व सरदेशमुखी यांच्या साह्यानें स्वधर्मसंरक्षणासाठीं स्वराज्य वाढवावयाचे, हा मराठी राज्यसंस्थापकाचा हेतू कायम होता, तथापि हे साधन अति खर्चिक असल्यामुळे राज्यात सर्वत्र स्वस्थता व सुराज्य करण्यास वेळ च सांपडला नाहीं, हे इतिहासज्ञांनी विसरूं नये. असो. "जिंकलेला मुलुख आमच्याकडे वहिवाटीस द्या म्हणजे देणे फेडतो," असे महादजी व भाऊ म्हणत. पण हे म्हणणे नानास पसंत पडेना. निखालसता झाली होती तरी नानांचें व महादजीचे भांडण जुंपले. नाना बारा वर्षांचा हिशेब मागूं लागले. हिशेब मागणें, मध्यवर्ती सत्तेने हिशेब मागणे, हे हल्लींच्या मनूंत च कायदेशीर आहे असे नाहीं, पेशवाईच्या पहिल्या अमदानींत सुद्धां हे हिशेब दत्ताजी व जनकोजी शिंद्यांकरवीं नानासाहेबांनीं घेतले होते, हे काव्येतिहासांतील दत्ताजीनें रामाजी अनंतास लिहिलेले पत्र वाचले म्हणजे समजेल. तात्पर्य, हिशेब देण्याघेण्याचा नियम पूर्वापार होता. पण महादजीस वाटे कीं आपल्या अपूर्व कामगिरीने आपण कायद्याच्या या नियतकारी कक्षेच्या वर गेलो आहोंत. नानांनीं १२ सालाचा हिशेब मागतांच महादजींनीं सर्व राज्याचा हिशेब मागितला. मध्यवर्ती सत्तेचा अधिक्षेप तो हाच, आणि अनेक गुणसंपन्न पाटिलबावास मी नानांच्या खालच्या दर्जाचे समजतों त्याचे कारण हेंच होय. लॉर्ड किचनेर पाशीं मि. आस्क्विथ हिशेब मागतील पण सेनापती या नात्यानें किचनेरास प्रधानापाशीं सर्व राज्याचा हिशेब मागतां येणार नाहीं. येथील हा धीटपणा म्हणजे दांडगाई होय. असो, ही वाग्युद्धांतील दंडेली नानासारख्या शिष्टसंस्कृतीत तयार झालेल्या पुरुषापुढे चालणे शक्य नव्हते. भाऊस नानाचे म्हणणे कबूल करावें लागले, म्हणजे सेनापतीस मुत्सद्याचे अथवा लष्करी खात्यास मुलकी, खात्याचें म्हणणें कबूल करावें लागलें. पण महादजी जोरावर, ते ऐकेनात. शेवटी आक्टोबर महिन्यांत 'नाना आणि महादजी' च्या या वितुष्टाला रंग चढून कारभारी मंडळांत बैठकी होऊं लागल्या. डिसेंबर महिन्यात गोविंदराव गायकवाडांचा पक्ष धरून महादजींनी पूर्वीची सरकाराला फायदेशीर झालेली व्यवस्था मोडली आणि मानाजी गायकवाडास अधिकार न देतां गोविंदरावास देवविला. महादजीचा रंगेल, विनोदी, मोकळा स्वभाव, त्यांनीं केलेल्या रंगसभा, त्यांची शिकारीची हौस, इत्यादि भर तारुण्यांत गोड वाटणारे विषयांनीं, नुकते वयांत येऊं लागणारे स्वभावतः खिलाडू रावसाहेब महादजीवर प्रसन्न होऊन त्यांच्या भजनी लागले असा भास होऊं लागला. नानांचे गांभीर्य, त्यांची दक्षता, त्यांची टापटीप रावसाहेबांस सहन होत नव्हती व ते केवळ कैदखान्यांत होते व 'आपण नानांचे बांदिवान आहो' अशी माधवराव साहेबांची समजूत होती, असें

भासविण्याचा कित्येक ह्मणजे बहुतेक सर्व इंग्लिश ग्रंथकारांनीं व नानांचा विद्वेष करणें हाच खरा देशाभिमान आहे असे मानणाऱ्या पौरस्त्य लेखकांनीं प्रयत्न केला आहे, पण माधवराव साहेबांच्या बाललीला ज्यांनी इतिहाससंग्रहामधून वाचल्या आहेत, माधवराव साहेबांकडून 'देणे' करवावयाचें ही नवीन पद्धति नानांनी घातली हे ज्यांस ठाऊक आहे, रा. खरे प्रसिद्ध करणार आहेत त्या पुस्तकांतील दीपावलीतील खेळांचा इतिहास जे वाचतील, इति० संग्रहांतील तैलरहित गुलाबी रंगात्मक शिमग्याचा वृत्तांत ज्यांनीं वाचला असेल, 'लइण' उभी करून शिकार खेळणाऱ्या रावसाहेबांचे खेळ वाचिले असतील, त्यांची बालंबाल खात्री होईल कीं नानांनी रावसाहेब मोठे होऊं लागले तसतसे त्यांस जास्त मोकळेपणानें वागण्याची स्वतंत्रता देण्याची पद्धति स्वीकारली होती. शिवाय, पेशव्यांच्या बखरींतील गोष्टी खऱ्या मानल्या तर "नाना माझा उजवा हात, पाटील तुह्मी माझा डावा हात, तुह्मी दोघे दौलतीचा कारभार बघतां, ह्मणून मी हा असा खेळतो!" असे बंदींत असणारा माधवराव भर एकांतांत महादजीस कधीं हि बोलताना! पर्वतीच्या तळ्यांमध्ये नौकाक्रीडा करतांना झालेला हा संवाद जर यथार्थ असेल तर रावसाहेब पेशव्यांच्या समजुतीनें हि लष्करी व मुलकी कारभार एकाच योग्यतेचे किंबहुना मुलकी कारभार हा उजवा हात होय असेंच सिद्ध होतेंसे दिसतें. असो; रावसाहेबांवर रंगेली छाप बसली पण सरकारी कामांत छाप बसत नाही असें पाहून महादजीनीं ग्रांट डफ यास अविदित असलेला 'मोरोबास परत आणावें' असा बूट काढिला. मोरोबा ह्मणजे स्वतःस अक्कलमंद समजणारें एक भोळसर मांजर! मोरोबा राज्यांत आले की खूळ माजणार, हे नानांस माहित; तथापि, एक तपच्या-तप बंदिवासांत काढलेल्या आपल्या च चुलतभावाविरुद्ध त्यांस कांहीं बोलतां येईना. महादजीची कटकट रोज वाढत चालली हे पाहून, नानांनीं विचार केला कीं आपसांत कलह वाढविण्यापेक्षां आपण च काढता पाय घ्यावा हे बरें. महा-दजी फौजबंद सरदार, त्यांचा उपयोग आडअडचणीच्या वेळीं स्वराज्य वाढवूं इच्छिणाऱ्या सरकारला होईल, तितका आपल्या बुद्धिबलाचा होईलच असें नाहीं. तेव्हां सरकारी हित लक्षांत घेऊन व आपले नुकसानाकडे दुर्लक्ष करून नानांनीं श्रीमंतांकडून काशीस जाण्याची परवानगी ता. ३१ आक्टो० रोजी घेतली. (उर्व-रित पत्रें नं. ३६२६ पहा.) पण (इ. सं. पुस्त. १ अं. १० ऐ. टि. ७२) यांत नानांच्या हातचे टिपण आहे, त्यांत शिंदे येण्याचे सुमारास नानांचा काशीचा बेत ठरला होता असें दिसतें. अथापि, शिंद्यांची इच्छा नानांनी काशीस जावें अशी नव्हती. मला वाटतें, नानांची योग्यता ओळखणारे महाराष्ट्राभिमानी शिंदे समजून होते की, नानांनीं क्षेत्रवास केला तर मराठी साम्राज्याचें कायमचें नुकसान होईल. ह्मणून शिंद्यांनीं नानांच्या काशीवासाला जोराचा प्रतिरोध केला. नानांनीं काशी-यात्रेची तयारी केली, तेव्हां परशुरामभाऊ हि काशीस जाण्यास तयार झाले.

( उर्वरित पत्रें नं. ३६२७ ऐ. ले. ) मला वाटतें, परशुरामभाऊंनीं हा केवळ त्रागा केला असावा. नानांची उणीव कदाचित् पोटदुखी असणाऱ्या हरिपंत तात्यांनीं भरून काढली असती. पण कर्नाटकाचा केवळ दरवाजा असणारे भाऊसाहेब पटवर्धन पथकांचा व सरकारी देण्याघेण्याचा राडा टाकून तसेच काशीस जाणार होते, हें मला खरेंसे वाटत नाहीं. स्वामिसेवेमध्यें प्राप्तस्वकर्मानें परमेश्वराची आराधना करणारे नानासारखे बुद्धिवीर व भाऊसारखे खड्गवीर सवाई माधवरावास सोडून क्षेत्रवासास गेले असते, असें सहसा वाटत नाहीं. तथापि, नानास अनिवार पेंच ह्मणून नाना निघाले. पण भाऊवर तसा पेंच असल्याचे सध्यां तरी दिसत नाहीं. तात्पर्य, नानांस अडविण्याचें हें सोंग असावें. असो; हें काशीयात्राप्रकरण कार्तिक पौर्णिमेपासून तो १७१५च्या चैत्र महिन्यापर्यंत (१७९२ नोव्हें० ते १७९३ मार्च ) सुमारे ४-५ महिने घोळत पडले होतें. याच अवधींत रावसाहेब पेशव्यांचें कुटुंब वारलें. अर्थात्, दुसऱ्या लग्नाची वाटाघाट सुरू झाली. मुली आल्या. दोन तीन मुली श्रीमंतांनीं 'रुबरु' पाहिल्या व नंतर "नानांचे विचारास येईल तिचा निश्चय करावा" अशी श्रीमंतांनी आज्ञा केली (ऐ. ले. ३५०२ मार्च १७९३ ) हें रघुनाथराव कुरुंदवाडकर यांच्य पत्रांत नमूद आहे. इतर कोणी वडीलधारे नसणाऱ्या श्रीमंतांनी दुसऱ्या लग्नाची मुलगी प्रत्यक्ष पहावी, हे १८ व्या शतकांतील पेशवाईत हि अपूर्वच होय. गोपाळराव पटवर्धनाचे दुसऱ्या लग्नाची नवरी आईबापांनीच पाहवून व पाहून ठरविली होती. असो; श्रीमंतांच्या संबंधानें मात्र हे मर्यादातिक्रमण चालऊन घेतां आले असेल. पण सातारकर बखरकार, ग्रांट डफ साहेब, त्यांच्या आधारें लिहिणारे आधुनिक लेखक व कोकणस्थ ब्राह्मणास वेळीं अवेळीं शिव्या देणें हे राष्ट्रीय व पवित्र कार्य आहे असें मानणारे व लिहिणारे इतिहासज्ञ कंठरवानें सांगतात कीं, "बिचारा माधवराव नानाच्या रुपेरी तुरुंगांत होता;" त्यांना रावसाहेबांच्या मुखांतून आपखुषीने निघालेलें नानांच्या पसंतीसंबंधाचें वरील वाक्य वाचून काय वाटेल बरे ? हें वाक्य काय बंदिखान्यांत गांजलेल्या दीनाचें आहे काय ? असो ; पूर्वग्रहानें एकाद्यास वाईट ठरवून मग त्याच्या कृत्याची परीक्षा करणाऱ्यांच्या सत्यप्रियतेची स्तुति करावी तेवढी थोडीच आहे. लग्नाचा समारंभ उत्तम झाला. हजारो आहेर झाले(ऐ. ले. ३५०३. 'इंद्रसपत्तीहून अन्य उपमा नाही ') असे या हि लग्नाचें वर्णन आहे. पण याच वेळीं एका मजेदार उपनाटक सुरू होणार होते. या उपनाटकाची वार्ता डफ साहेबांस नाहीं. निदान आपल्या ऐतिहासिक बखरींत अगर बखरवजा इतिहासांत या उपनाटकाचा प्रवेश करणें योग्य नाहीं असे त्यांस वाटलें असावे. या नाटकाचे सूत्रधार पाटीलबोवा असावेत असा माझा तर्क आहे. उपनायक निजामअल्ली होते. श्रीमंतांची पाहिली बायको वारून एक दोन महिन्यांतच दुसरे लग्न ठरलें व ते झालें हि. पण, निजाम साहे-

यांनीं लिहिले, " आह्मी पहिल्या लग्नात हजर नव्हतों. आतां आह्मी बेदरास येतों. रावसाहेबांस तेथें घेऊन यावे येथे आह्मी समारंभ करतो ? पुढें, 'लग्न झालें' असें कळले तेव्हां, 'लग्न झाले तरी काय चिंता ? दुसरें (तिसरें) लग्न करावें, आह्मी पुण्यास येतों'! जसे कांहीं ब्राह्मणाचे लग्न चुटकी सारखे ठरून त्याला वाटतील तितक्या बायका करितां येतात ! असो. हा वरील सफेता झाला आंतील ठरलेला बेत असा.—शिद्यांनीं निजामअल्लीपासून पंचवीस लाख रुपये आणून पुण्यांत खाल्ले होते. याचा मोबदला म्हणजे बेदर सरकारच्या चौथाईचा अंमल स्वराज्याचा आहे तो (शिद्यांनी) नबाबास देववावा. नाना भाऊस सांगतात—'आमचा बंदोबस्त करावा, श्रीमंतांजवळ राहून दौलतीचा कारभार करावा असा शिद्यांचा डौल आहे.' शिद्यांची सोळा पलटणे, पाऊणशे, शंभर तोफा, चार हजार फौज; त्यासच नबाब वीस हजार फौजेनिशीं येऊन मिळावे, असा बेत होता. हरिपंतांजवळ या बेदरचौथाईचा चूट टिपूवरील स्वारीतच निघाला होता. तथापि, भाऊ लिहितात, 'नानाचा व शिद्यांचा ऋणानुबंध चांगला ते ते स्वच्छतेनें आहेत या पक्षीं सर्व नीटच होईल. श्रीमंतांचे पुण्य विचित्र आहे'! 'सर्व नीटच होईल' व 'श्रीमंतांचे पुण्य विचित्र आहे' अशी खंबीर श्रध्धा असणारी कर्ती मनुष्यें ज्या राजवटीत असतात तेथील प्रकार सहसा वांकडे होत नाहीत. नाना मात्र फार घाबरले होते व बेदर सरकारची चौथाई बुडणार असे त्यांस वाटूं लागले होते.

याच संधीला " सचीव प्रकरणाचा " उद्भव झाला. माधवराव शिंदे यांच्या चरित्रांत कै० नातू, बेळगांव येथील सुप्रसिद्ध व विद्याव्यासंगी वकील, ह्मणतात त्याप्रमाणें, ब्रिटिश सरकारच्या अमदानीत पसतीस वर्षांमागे दक्षिण महाराष्ट्रांत जो " दांडगाईचा " प्रकार झाला, तसाच प्रकार पेशवाईत आणि सर्वदक्ष नानांच्या अमदानीत झाला. भोर संस्थानांत अव्यवस्था, पुण्याहून बाजी मोरेश्वर नामक कारभाऱ्याची योजना, तेथील गृहकलह, सचिवाचे व कारभाऱ्याचे वांकडें, सचिवाचा बाजी मोरेश्वर याने केलेला छळ, सचिवाचे जेजुरीस प्रयाण, त्यास पकडण्यासाठीं झालेली दांडगाई, इत्यादि सुप्रसिद्ध गोष्टी व महाराष्ट्रांतील गोष्टी यांत फारशी तफावत नाहीं. 'यजमान वेडे आहेत' (दंतकथा) ही हि भुमका समसमानच. चैत्र शुद्ध १३ (२५।३।१७९३) ला कारभाऱ्यांनी जेजुरीस गर्दी केली. शुद्ध १४ स महादजी शिंदे यांनीं, 'चाकराने धन्याची अबरु घ्यावी हें चांगलें नव्हे,' असें श्रीमंतांस विनवून आपणच पलटण पाठवून सचिव यास वद्य चतुर्थीस आपल्या लष्करात नेले. श्रीमंतांच्या आज्ञेनें चौकशी होऊन बाजी मोरेश्वरास व त्याच्या साथीदारास शिक्षा झाल्या. 'शिद्याचे जरबेनें'—भाऊ लिहितात--'ही चौकशी झाली.' तथापि, शिद्यानी सरकारमर्जीविरुद्ध सचिवास गादीवर बसविले, असें ग्रॅट डफ ह्मणतात ते निराधार दिसते.

मांडलीक व मंडलाधिपति असा संबंध असला ह्मणजे हे असले प्रकार केव्हांना केव्हां तरी व्हावयाचेच. विश्वासाचा कारभारी नेमून पाठविला ह्मणजे त्याचे ह्मणणे सत्ताधीशास खरे वाटते आणि तो कृतघ्न निघाला तर, ' सेवकापराधे धनिनो दंडः ' या न्यायाने सत्ताधीशाची मानहानि होते. माझे मित्र रा. खरे-शास्त्री या प्रकारास ' दिव्याखाली अंधेर ' ह्मणतात व तो तसा असतो हि. जावत्-काल पर्यंत पारदर्शक वाती व कंदिलाच्या अथवा दिव्याच्या सर्व बाजू हि पार-दर्शक निघाल्या नाहीत तावत्काल पर्यंत दिव्याखाली अंधेर असावयाचाच. याच न्यायानें स्वार्थसाधू लोक जोपर्यंत जिवंत आहेत तोंपर्यंत मध्यवर्ती सत्ता किती हि शुद्ध व निष्पाप असली तरी हे विश्वास संपादणारे कृतघ्न स्वार्थसाधू मध्यवर्ती सत्तेचे लोकहितकारी उद्देश हि विलयास नेतात. कर्णोपकर्णी जी हकीगत ऐकूं येते तीवरून हे आल्या संचीव १७९१ च्या जुलई महिन्यांत गादीवर बसले. त्यांचा स्वभाव भोळसर असे. त्यांच्या आईचे ( ही सापत्न माता असावी ) व त्यांचे पटेना. वाढतां वाढतां एका केशवपनाचे प्रकरणा वरून गोष्ट चिरडीस गेली. राचीव दरबारात दोन फळ्या झाल्या. अव्यवस्थेची मजल येथ-पर्यंत येण्यास ४–६ महिने ह्मणजे १७९२ साल उजाडले असलें पाहिजे. नंतर बाजीची नेमणूक झाली असली पाहिजे. आईचा पक्ष बाजीने उचलण्यास हि कांही दिवस गेले असतील, ह्मणजे बाजीच्या छळाला फार फार तर मार्च, एप्रिल आला असला पाहिजे. ' यजमान वेडे आहेत, वस्त्रे फाडतात ' इत्यादि मजकूर नानांच्या कानांवर आला. बाजीने गैरवाका सरकारांत समजावून गाडद वगैरे सरंजाम नेला, ( भिडेकृत अष्टप्रधान, व चिटणीसकृत दुसरे शाहु महाराज पहा ) तेव्हां कडक देखरेख सुरू झाली असली पाहिजे. त्यांतच सखाराम बापूंची मुलगी ती या ' वेडगळ ' सचीवाची पत्नि ! तेव्हां स्वाभाविकपणेच नानांनी इतर ठिकाणाहून आलेल्या बातमीकडे दुर्लक्ष केले असलें पाहिजे आणि बाजी मोरेश्वराला घाशीरामी अंमल बसविण्यास स्फुरण आले असले पाहिजे. पण यावरून नानांच्या कारकीर्दीचें सूक्तासूक्तत्व ठरविणे न्याय्य होणार नाही. होळकर एका पत्रांत ह्मणतात त्याप्रमाणें 'राज्य आहे तेथ एकाददुसरे खूळ असावयाचेच ! त्याचा इतका बभ्रा करण्याचें कारण काय? ' शिद्याचे कारभारी आबा चिटणीस यानी दोन चार वेळ सचिव-प्रकरणी अर्जदास्त केली, तेव्हां श्रीमंत राजेश्री रावसाहेबांनी आज्ञा केली की, ' जें केलें ते सरकारांतून समजून केले तुह्मी दाटका करून विचारल्यास काम पुरसीस(?) होईल. ' ( खरेकृत ऐ. ले. ) अर्थात, याहि प्रसंगी रावसाहेबांनीं नानांचा कारभार सांवरून धरणें हें नानास उत्कृष्ट पक्षीस व रावसाहेबांच्या गुणज्ञतेचें दर्शक् होय.

एप्रिल महिन्यांत ' नबाब बेदरास येणार ' ही दाट आवाई झाली. तेव्हां

शिंद्यांनीं स्वच्छ मनानें सांगितलें कीं ' तोतयाचा नाश केला, तसा नबाबाचा हि मी समाचार घेईन'. शिंद्यांची फौज तयार होतीच. नानांनीं हि भाऊस फौजेची ताकीद दिली. नबाब बेदर शहरीं आले; पण याच सुमारास राजकारस्थानी नानांचें व रणधीरवीर पाटीलबोवांचे निखालस ऐक्यमत्य झालें. ( ३६३६ ऐ० ले० ) हरिपंततात्यांनीं हा योग जमवून आणिला. दोघेहि समंजसच. निजाम, टिपू, हिंदुस्थान, इंग्लिश, या प्रकरणीं याच वेळीं दोन चार बैठकांत बोलणीं होऊन मराठी पादशाहीचें परंपरागत धोरण कायम ठेवण्यास प्रत्येकानें काय करावयाचे हें ठरलें असावें. तात्पर्य, सुवर्ण आणि सुगंध एक झालीं. हे राजकारणी बेत ठरल्यावर व महादजीकडे हिंदुस्थानच्या अमलाची दखलगिरी आल्यावर ( फ्रेजरचा निजाम व चंद्रचूडांचें दप्तर पहा ) महादजीनीं निजाम दरबाराकडे पेशव्यांच्या वतीनें चौथाईची जोराची मागणी केली. ही पाहून मशिरूनमुल्कास सखेदाश्चर्य वाटले, असें फ्रेझर साहेब ह्मणतात ! याच वेळीं बंगालच्या चौथाईबद्दल इंग्लिश लोकांच्या कलकत्ता येथील वरिष्ठ सरकाराजवळ महादजीनीं जोराची मागणी केली. निजामचे दरबार भ्यालें; पण इंग्लिश लोक जोरावर; ते भ्याले नाहीत. मुद्दा हा नाही. मुख्य गोष्ट ही कीं नानांचें व पाटीलबोवांचे सख्य होऊन, बुद्धीचें व हाताचे ऐकमत्य होऊन अथवा कर्मयोगात्मक वेदांती भाषेंत बोलावयाचे ह्मणजे ज्ञान कर्मसमुच्चय होऊन, सर्व विरोध परिहार झाला. या परिहारानें पेशवाईला अथवा मराठ्यांच्या पातशाहीला पुनः तीस बत्तीस वर्षांनीं निराळेच वळण लागणार होतें. इंग्लिशांनीं ' आम्हीं एकादी मसलत केली तर त्यास तुम्ही शरीक आहा कीं नाही ? ' ( ३५२० आणि २१ ऐ० ले० ) असें विचारतां, ' पुनः करार करण्याचें कारण काय ? ' असें उत्तर पेशव्यांच्या सरकारानें दिलें; यावरून हि नाना महादजीचें सख्य पक्कें झाले होतें असें दिसतें.

पुण्यांतलि ' फौजेमध्यें फोडाफोड करण्यासाठीं मुसलमानांनीं पैका वाटला व तो उमगला ' असें विसाजी नारायण ३५१७ च्या पत्रांत ( १ जुलै १७९३ ) लिहितात. नानांवर ' मौनत दौलानें मारेकरी घातले ( ३६३९ पोच ता. २०-७-९४ ) या प्रमाणें पक्की बातमी. तेव्हां विसाजीपंत म्हणाले 'तुर्कांची चालच. पगे ( दगे ? ) करून दौलत साधल्यास करावी ' नाना म्हणाले, " आम्हांस दगा फटका केला असतां श्रीमंतांची दौलत त्याचे हातास लागल्ये असा अर्थ नाहीं ". या एका वाक्यावरून हि नानांची निःस्वार्थता दिसून येते. असो; पण हा भाग महादजी वारल्यानंतरचा आहे.

सुमारें १८ महिने महादजी पुण्यास तळ देऊन राहिल्यानें पुण्यास धान्याचा दुष्काळच प्रायः उत्पन्न झाला. धारण साडेतीन शेर होती ! यांतच इंद्रानें हि वक्रदृष्टि केली ! मग लोकांचे हाल काय पुसावे ? श्रावण मासच्या, दक्षिणेचा

समारंभ हि यथातथा च झाला. १ लक्ष १३ हजार पर्यंत दक्षणा वाटली ! महादजी हि एक दिवस येऊन बसले होते. पर्जन्य पडला नाही ह्मणून ओंकारेश्वरास अभिषेक केला हे धार्मिक वृत्ति दाखविणारें वृत्त डफ साहेबांस ' इतिहासाच्या दर्जा खालचें ' वाटले हें नीट च आहे.

असो; नाना महादाजीचा राजप्रकरणीं सलोखा झाल्यावर शिदे व होळकर यांचें सख्य करून देण्यासाठीं देवराव हिंगणे यांस मुद्दाम इंदुरास पाठविलें. होळकरास परत बोलवावयाचे नव्हतें तर महादाजीचे व त्यांचें सख्य करून द्यावयासाठीं इकडे बोलवावयाचे होते. हिदुस्थानांत बरोबर वाटणी मिळत नाहीं, शिंदे बळाच्या जोरावर आपलाच हेका चालवितात, त्यांनीं जुन्या चाली सोडल्या इत्यादि प्रकारच्या होळकरी तक्रारी आहेत. पवित्र अहिल्याबाईचीं धार्मिक कृत्यें वजा केलीं व तिने जें लोकप्रेम संपादन केले होतें तें वजा केलें तर मला असें ह्मणावे लागतें की, यद्यपि मराठी राज्याचा अहिल्याबाईस व तुकोजीस अभिमान होता तथापि, महादजींनी जो कार्योत्साह दाखविला तितका नसो, पण सामान्य प्रतीचा स्वार्थत्याग करण्याची हि होळकरांची तयारी नव्हती. तुकोजीच्या बेशिस्त वागणुकीमुळें संस्थान ओढगस्तीला आलें होतें. तुकोजीला मद्यसेवनाचें भयंकर व्यसन लागलें होतें. तुकोजीचें व पुण्यशील अहिल्याबाईचे ऐकमत्य नव्हतें. हिदुस्थानांत यामुळें महादजीला होळकराकडून ह्मणण्यासारखी मदत मुळींच झाली नाही असें शिंदेपक्षाचे ह्मणणे आहे. शिदे ' अरेरावीनें ' वागतात ही होळकरांची तक्रार आहे. शिंद्यांचे गोपाळराव वगैरे सेनापती उन्मत्त झाले होते यांत शंका नाही. तथापि एकंदरीनें तुकोजी थोरले मल्हाररावा प्रमाणे निधड्या छातीचे व मोकळ्या स्वभावाचे नसून त्यांनी आपल्या उतार वयांत महादजीच्या वाढत्या कार्यचक्राला वरचेवर खीळ घालण्याचा प्रयत्न केला असें महादजीचा व मराठ्यांचा कट्टा शत्रू जो इस्माइल बेग त्याला त्यांनी आश्रय दिला, या एकाच उदाहरणावरून दिसते. असो; शिंदेहोळकरांमध्यें कायमचा समेट झाला नाहीं तो नाहींच.

हिंदुस्थानच्या कारभारांत महादजीची शिस्त उत्तम तर नव्हतीच; पण दक्षिणेकडे नानांनीं जी चांगली शिस्त ठेवली होती तशी सुद्धां शिंद्यास ठेवतां आली नाहीं, हें सिद्ध करण्यास इति० संग्र० तील दिल्लीचीं पत्रे, जोधपुरचीं पत्रें व देवरावांचीं पत्रें पुरेशी आहेत. पुण्याचा कारभार त्यास रेटला नसता हें ह्मणण्यास मला बिलकुल भय वाटत नाही.

तथापि, शिंदेफडणीसांचें ऐकमत्य झालें. ! हिदुस्थानांतील कारभार शिंद्यास मिळाला. होळकरांची कटकट तात्पुरती मिटली, महादजीचा दक्षिणेमध्यें बोलबाला झाला, देवदर्शन होऊन स्वभूमि दिसली आणि केलेल्या चाकरीचा मजूरा स्वामी-५डून झाला. तात्पर्य, शिंद्यांचे बहुतेक सर्व हेतू पूर्ण झाले. तथापि, मोरोबाच्या

कामीं ते फसले, सर्वांवाचा डाव साधावा तसा साधला नाही, नानांचा कारभारें निघाला नाहीं, नबाबाचे राजकारण फसले इत्यादि अप्रिय गोष्टी झाल्या, पण त्यांकडे लक्ष न देतां त्यांनी व नानांनी थोर मन करून परस्परांस अंतःकरणपूर्वक साह्य करण्याचे ठरविले, ही मराठी इतिहासांत अपूर्व गोष्ट झाली. पण गोविंदराव काळे ह्मणतात त्याप्रमाणे मराठेशाहीला दृष्ट लागली. मराठ्यांच्या दुर्दैवानें महादजीस नवज्वर होऊन १७९४ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत ते वारले. रावसाहेब पेशवे व नाना समाचारास गेले होते. महादजीवर नानांनी मारेकरी घातले अशी फ्रेझर साहेबांची काहणी आहे; पण तिला कोणत्याहि प्रामाणिक आधारांचा पुरावा नाहीं. असो; लवकरच हरिपंत तात्यांनी देह ठेवला, सवाई माधवरावांचा दुर्दैवाने बळी पाडला आणि मराठी राज्यावर नांगर फिरविण्याचे व्रत घेऊन तपश्चर्या करीत असलेल्या आनंदी-राघोबांचे अद्वितीय पुत्ररत्न राज्य बुडविण्यासाठी पेशव्यांच्या गादीवर येऊन बसले ! ! हीच ‘ दृष्ट ’ होय !

महादजी जिवंत राहते, सवाई रावसाहेब जाऊन रावबाजी येतेना, नानांची कर्तृत्वशक्ति अढळ असती तर शिंदे होळकर अनावर झाले नसते, दुसऱ्या मराठ्यांच्या लढाईला कदाचित् निराळे स्वरूप आले असते. तीन चार लढायांनी मराठे चीत न होतां गनिमी विरुद्ध कवायती लढाई दहा वीस वर्षे खेळत राहिली असती आणि शेवटी शिस्तीचा, शिक्षणाचा व राष्ट्राभिमानाचा निःसीम आश्रय असल्यामुळे यद्यपि इंग्लिश लोकांचा जय झाला असता, तथापि रावबाजीच्या ह्मणजे डेंगळ्याच्या अमदानींत मराठेशाहीला जे ओंगळ व हिडिस स्वरूप आले ते न येतां “ रिक्रूट येता कां रिक्रूट ” असे जाहिरनामे लावण्याची पाळी येतीना, स्थानिक स्वराज्यासाठी लोकांस कमिशनर मागावे लागतेना व व्यापारांतील व्यॅकादिकाची सचोटी संकटांस जुमानतीना. असो; इंग्लिश राज्यव्यवस्थेने आह्मांस आज शंभर वर्षे सुख होत आहे, आमची हळू हळू प्रगति होत आहे हे खरे; पण या सुखांत आमच्या कर्तृत्वाचा भाग अगदींच थोडा व आमची प्रगति फारच मंदगती यांत शंका नाहीं.

असो; महादजीच्या येण्यानें पुणे प्रांतांत मोठा दुष्काळ पडला. मुलकी अधिकारापेक्षां लष्करी अधिकार जास्त जोराचा असतो, लेखणीपेक्षां खड्गाची योग्यता जास्त मोठी, असें थोडा वेळ ठरलेंसा भास झाला, त्याच्या येण्याने सचिवास आभासिक सुख झाले आणि सातारकर महाराजांस माहुलीपर्यंत फेरफटका करण्याची परवानगी मिळाली ! ! पण खरा फायदा हा झाला की, पातशहाला आश्रय देऊन त्याच्या छलकास शिक्षा करणारे व हिंदुस्थान कार्बाज करणारे अलिजाबहादर महादजी १८–२० वर्षांच्या आंत बाहेर असणाऱ्या तरुण रावसाहेबांच्या पायावर डोई ठेवतात; नाना हजर असताना आसनावर बसत नाहीत, या चाकरांच्या--नाटकी

म्हणा हवें असेल तर, वागणुकीवरून पेशवाईची इभ्रत हजारोपटीनीं वाढली व खर्ड्याची स्वारी यशस्वी झाली. मात्र, महादजीस अहिल्याबाईचा शाप भोंवला म्हणा, पेशवाईवर साडेसातीची धाड आली म्हणा, जे शिंदे दक्षिणेंत आले ते परत गेले च नाहीत; आणि जे परत गेले ते पेशवाई व मराठेशाही खिळखिळी करून गेले.

ग. रा. खरे जी पत्रे प्रसिद्ध करीत आहेत ती बिनमोल आहेत. मराठी राज्याचें एक अंतरंग उत्कृष्ट रीतीने विशद करणारी ही पत्रें आहेत. या पत्रांचा (३५०६-०७) व श्री० चंद्रचूडांच्या अप्रसिद्ध पत्रांचा मला भारी उपयोग झाला. या सर्वांचे आभार मानून मी हा लेख येथें पुरा करितो.

चिं. गं. भानू



# मुसलमानांचा संजीवनी मंत्र

खानदेशांत येरंडोल येथें एका देशपांड्यांच्या घरी हा ताम्रपट मिळाला. त्याचा विशिष्ट आकार व त्यावरील प्रथमदर्शनी फारसी म्हणून समजली जाणारी लिपी पाहून कौतुक वाटलें. नंतर एका काजीस तो दाखविला. तो पाहतां च त्यानें तत्संबंधी दाखविलेला आदर पाहून जिज्ञासा बळावली. त्यास विचारतां त्यानें सांगितलेली हकिकत अशी:—

"महमद पैगंबर एक वेळ बसला असता एका धीवरानें एक मेलेला मासा हातांत आणला आणि तो पैगंबरास दाखवून म्हणाला, जर तूं पैगंबर खरा तर यास जिवंत कर; तेव्हां महमदानें तो मासा हातांत घेऊन एक मंत्र म्हटला. तसा तो मृत मासा जिवंत झाला आणि मग त्यास पाण्यांत सोडून देण्यात आलें."

ही कथा कुराणांत आहे आणि तो च मंत्र या मत्स्याकृति ताम्रपत्रावर लिहिलेला आहे.

हें ताम्रपत्र १२ बोटें लांब असून त्याचा विशेष असा कीं, त्यावर कोरलेल्या मंत्राच्या पूर्वेतिहासावर लक्ष्य देऊन त्याचा आकार हि मत्स्याकृति केलेला आहे. ताम्रपट उलटा कोरलेला आहे. आरशांत सुलटा दिसतो.

या मंत्राची पवित्रता मुसलमान लोक इतकी समजतात कीं, ज्या कागदावर हा मंत्र अगर त्याचा एखादा भाग हि लिहिला असेल तो कागद पायदळीं न पडूं देता त्याचें पाण्यांत विसर्जन करतात. सदरचे काजीनें मला ती च विनंति केली.

## मंत्र*

### बिसमिला उल् रहेमान अल् रहीम

१ ला इलाह इल्लल्लाह् महमद् रसूलल्लाह्
२ अल्लाह् ममल अली महमदुल्खलायक ...
३ अफजलल् बशर बषफए + वल हषर + + महमद्
४ अली कुल मालुम लफ + + अल्लाह्
५ अलो + + महमद् + + + + + + + +
६ व अला बषर्गान वल् मुकरर्बानी व अला ...
७ ... ... ...

८ बिसमिल्ला उर रहिमान अल् रहीम अलबरकात ...
९ आमना दुआए औरद अन्द के रोजे रसूल—
१० निशस्ता बुदन्द तपूत
११ अज ए गुफत या रसूलिल्लाह———
१२ माही आबीस्त हजरते रसूलिल्लाह गुफ्त
१३ . . नामाम एराबी गुफ्त या रसूलिल्लाह्
१४ नसए रसूल ईनस्त म हीरा . ...
१५ ... ... ... करीम
१६ .. ... ...
१७ अली हजरते ई सखुन एराबी शनीद्
१८ मुतफक्किर शुद् फी अलहाठ
१९ जिबराइल आमद् व गुफ्त
२० आवाजे दरूद् दर गोषे
२१ माही उफतादा हर के
२२ पोशे खुद आरद्
२३ ... ...
२४ के बाशद ... ...
२५
२६ बहरके शक

---

*संमेलनप्रसंगी हा ताम्रपट ना. केशवराव वकील व श्री. आबासाहेब मुजुमदार यांनी पाहून लावण्यास साहाय्य केलेलें आहे.

२७ आग्द् का

२८ फर गरद्द्

वरील ताम्रपट येरंडोलास जेथें मिळाला तेथें र पुढील मिळाला. याची लांबी ८ बोटें असून रुंदी ४ बोटें व जाडी अर्धा सूत आहे. एकंदर ओळी १३ आहेत. त्यांत शेवटल्या २ ओळी आडव्या* कोरलेल्या आहेत. श्रीकाराच्या खाली डावे बाजूस पर्शिअन २ ओळी असून उजवे बाजूस ३ ओळींचा पर्शिअन व गोल शिक्का आहे. अक्षरें मोडीत खोदलेली आहेत. पत्रा पातळ असल्यानें ती सर्व मागे उमटली गेली आहेत. यांत कालाचा उल्लेख आलेला नाही. अक्षर गोलाईवरून शककाल नक्की असावा असें वाटतें. यांत ज्या भंवरखेड्याचा नामनिर्देश केलेला आहे तें गांव हल्ली त्याच नावानें अस्तित्वांत आहे व ज्या देशपांड्यांच्या घरी हा ताम्रपट सापडला त्यांच्या पूर्वजांना तें गाव पूर्वी इनाम होतें, हल्ली नाही. ताम्रपट असा:—

श्री

मुसलमानी अक्षरें

मुसलमानी शिक्का

(१) आद्य घ र घो छ व

(२) प गभीरराव पन

(३) प रा व फु र ना थ च (घ?)

(४) स त्री मो का दे राम

(५) जी व ॥ मदन प ॥ (व ॥)

(६) मोजे भवरखेड

(७) परगने यरोडोद्दा

(८) +[1] (ड) मोयजे षीम तळे[2]

(९) १० पजदे पत्र ग॥ सही

(१०) रावजी दे स द भ ट

(११) द्र गावजी धा सी ल

(*आडव्या ओळी)

(१२) सही रामजी व॥ मदण पा॥

(१३) मो जे सा प र द् ख र त प र नी ये रा

**पां. मा. चांदोरकर**

---

१ येथे अक्षर खोडलें आहे.

२ वर दोन अक्षरें खोदलेलीं आहेत.

## साष्टीची बखर

सदर बखर हिरा हरी भंडारी मु. वसई यांजकडे मिळाली. ती १५३५ संवतांत मूळ लिहिली गेली. तिची प्रस्तुतची नकल शके १७४१ त केलेली आहे. बिंबराजाचे वेळची हकिकत त्यांत आहे. हल्लीच्या भंडाऱ्यांची व साष्टींतील सोमवशी सूर्यवशी पाठारे, प्रभु व भंडारी कुळांची पूर्वपीठिका यात आहे. इचा प्रत्यंतर पुराव्यासह विस्तृत परामर्ष पुढें घेण्याचा विचार आहे.

स. म. दिवेकर

## व्यवहारनिर्णयपद्धति
## वाक्पारुष्य, दंडपारुष्य, इत्यादि व्यवहारस्थानें

१ प्रस्तुतकाळीं व्यवहाराचे ठोकळ दोन प्रकार समजले जातात—या दोन्ही प्रकारच्या व्यवहारांचा निर्णय करण्याकरिता निरनिराळ्या संस्था व निरनिराळे विवादपद निबंध ग्रंथ अस्तित्वांत आहेत—हे व्यवहाराचे दोन प्रकार म्हटले म्हणजे दिवाणी व फौजदारी हे होत. स्मृतिकारांनीं व्यवहाराचे जे अठरा प्रकार सांगितले आहेत त्यांपैकीं, ऋणदान, निक्षेप, जो स्वामी नव्हे अशा पुरुषाने केलेला वस्तूचा विक्रय, संभूयसमुत्थान, दिलेलें धन अपात्र बुद्धीनें अथवा क्रोधानें परत घेणें, सेवकाचें वेतन न देणें, केलेल्या संकेताचें उल्लंघन करणें, विकत दिलेली वस्तू किंवा विकत घेतलेली वस्तू पसंत न पडल्यामुळें देणारास किंवा घेणारास पश्चात्ताप होऊन त्यामुळें उत्पन्न होणारा वाद, स्वामी व पशुपाल यांच्यामधील पशूंविषयी होणारा वाद, ग्रामादि सीमांचा वाद, स्त्रिया व पुरुष यांची धर्मामध्यें व्यवस्था, पितृसंबंधी धनाचा विभाग इत्यादि व्यवहारस्थानांचा समावेश प्रस्तुत काळीं दिवाणी हि संज्ञा ज्या व्यवहारास आहे त्यामध्यें होतो. वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय, साहस, स्त्री व पुरुष यांचे समागमापासून होणारा वाद, द्यूतादि क्रीडांचे धर्म निश्चित करणें, पक्षी व बकरें इत्यादि प्राण्यांची लढाई, वगैरे व्यवहारस्थानांचा फौजदारी ही संज्ञा असलेल्या व्यवहारांत समावेश होतो.

दिवाणी आणि फौजदारी हा भेद स्मृतिकारांच्या वेळचा नसून तो मुसलमानी रियासतींत प्रथम अस्तित्वांत आला. मुसलमानी रियासतींत प्रत्येक परगण्याचे मुख्य ठिकाणी दोन प्रकारचे अधिकारी असत. एक दिवाण व दुसरा फौजदार. ऋणदान, लग्नसंबंधी वाद, वारसासंबंधी धनाचा विभाग, स्थावर मिळकतीचा वाद इत्यादि व्यवहारांचा निर्णय करण्याचें

काम दिवाणाकडे असे. सार्वजनिक शांततेचा भंग ज्यामुळें होईल अशीं कृत्ये करणारास शासन करणें, त्याचप्रमाणें भयंकर स्वरूपाचे गुन्हे करणाराचें पारिपत्य करणें ही कामें फौजदाराकडे असत. याप्रमाणे दोन निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे व्यवहारनिर्णयाचें काम सोंपविलें गेल्याकारणानें व्यवहाराचे वरील दोन मुख्य प्रकार अस्तित्वांत आले. बंगालच्या नबाबापासून क्लाइव्हनें बंगाल प्रांतावरील राजकीय वर्चस्व जेव्हां संपादन केलें त्या कालीं दिवाणी आणि फौजदारी अदालती अशा दोन प्रकारच्या निरनिराळ्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था अस्तित्वांत होत्या व वर दर्शविलेल्या व्यवहारांचा निर्णय या संस्था पृथक्‌पणे करीत असत. इंग्रजांच्या हातीं राज्याची सूत्रें आल्यानंतर त्यांनी या च संस्थांचा अंगिकार करून व्यवहारनिर्णय करण्याचें कार्य चालूं ठेविलें. दिवाणी आणि फौजदारी या संज्ञा व या संज्ञांनी दर्शविला जाणारा भेद यांचा उगम प्रथम मुसलमानी रियासतींत होऊन तो इंग्रजी रियासतींत तसा च कायम राहिला, हें वरील विवेचनावरून उघड होत आहे.

मराठी रियासतींत वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय इत्यादि व्यवहारस्थानांसंबंधी ज्या विशिष्ट स्वरूपाची व्यवस्थापद्धति अस्तित्वांत आली, तशा विशिष्टस्वरूपाची पद्धत अस्तित्वात येण्यास कोणती कारणे झाली याचा बरोबर उलगडा होण्यास मनुस्मृतीचे कालापासून ते मुसलमानी सत्ता नष्ट होईतोंपर्यंत महाराष्ट्रांत कोणकोणत्या धर्मशास्त्रपद्धति अस्तित्वांत होत्या व त्या पद्धतींचे ह्या प्रकारच्या व्यवहारव्यवस्थेचे बाबतीत काय काय परिणाम झाले याचा शोध घेणे जरूर आहे. या दृष्टीनें विचार करावयाचा म्हटला म्हणजे मनुस्मृतिकालापासून महाराष्ट्रांत कोणकोणत्या राजकीय सत्ता अस्तित्वात येऊन लयास पावल्या व कोणकोणत्या धर्मशास्त्रपद्धतीचा महाराष्ट्रात अंमल सुरू होता याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे.

२ खिस्तपूर्व दोन शतकापासून खिस्तपश्चात् ३२० वर्षांच्या दरम्यानचे *कालांत केव्हां तरी मनुस्मृति ग्रंथ रचला गेला असें तज्ज्ञांचें मत आहे.

मनुस्मृतीचे कालापासून आजपावेतों महाराष्ट्रांत अनेक देशी व विदेशी अशा निरनिराळ्या राजकीय सत्ता अस्तित्वांत येऊन लय पावल्या. मुसलमानी राजसत्ता महाराष्ट्रांत शक १२०० ते १३०० चे दरम्यान स्थापीत झाली. त्याचे पूर्वी महाराष्ट्रांत चालुक्य, राष्ट्रकूट, होयसल, कलचुरी, शिलाहार, यादव इत्यादि देशी क्षत्रिय राजघराण्यांचा अंमल अस्तित्वांत होता व या कालांत विज्ञानेश्वर, हेमाद्रि, अपरार्क इत्यादि नामांकित धर्मशास्त्रकार महाराष्ट्रांत होऊन गेले. याज्ञवल्क्य स्मृतीवर विज्ञानेश्वरांनीं मिताक्षरा या नांवाची प्रसिद्ध टीका, कल्याणीचे विक्रमादित्य

---

*डॉ० केतकर यांचे हिस्टरी ऑफ् कास्ट् इन् इंडिया व्हाल्युम् पहिला पान ६२.

राजाचे कारकीर्दीत रचिली. शके ११०९ चे सुमारास शिलाहार घराण्यांतील अपरार्क ह्या नांवाचे राजाचे कारकीर्दीत 'अपरार्क' ह्या नांवाची याज्ञवल्क्य स्मृतीवर दुसरी एक टीका निर्माण जाहाली. त्यानंतर देवगिरीचे यादव घराण्याचे प्रधान हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत यांनीं चतुर्वर्ग–चिंतामणी व दुसरे कितीएक नामांकित धर्मशास्त्र-विषयक ग्रंथ केले. हेमाद्रीनंतर चवदावे शतकांत सायनाचार्यांनी हि धर्म-शास्त्रावर ग्रंथरचना केली. बुंदेलखंडांतील सेनगर राजघराण्यांतील भगवंत नांवाचे राजाचे पदरीं असलेल्या निळकंठभट्ट नांवाचे महाराष्ट्रीय पंडितानें धर्मशास्त्रावर निरनिराळे 'मयूख' ह्या नांवाचे अठरा धर्मशास्त्र–ग्रंथ रचले. मुसलमानी सत्ता अस्तित्वांत येण्यापूर्वी स्मृतिप्रणीत धर्मानुयायी क्षत्रियाचे हातीं राजसत्ता असल्याकारणानें आतां दर्शविलेल्या धर्मग्रंथांस अनुसरून व्यवहारनिर्णय महाराष्ट्रांत तत्कालीन राजसत्तेचे अंकित असलेले न्यायाधीश करीत असले पाहिजेत हें उघड आहे. मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत स्थापीत झाल्यानतर हि धर्मशास्त्रावर ग्रंथरचना करण्याची परंपरा महाराष्ट्रांत सुरू राहिली व या कालांत स्मृतिग्रंथात आढळणारे आचार, व्यवहार व प्रायश्चित्त हे जे मुख्य तीन भाग त्यावर अनेक निबंधरूपी टीका ग्रंथ अस्तित्वांत आले. मुसलमानी सत्ता जरी महाराष्ट्रांत स्थापीत झाली तथापि आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि बाबतीत, मुसलमानी राजकर्त्यांनी हात न घालतां महाराष्ट्रीय हिंदूंस या बाबतीसंबंधी, पूर्ण स्वातंत्र्य दिल्याकारणानें राजसत्ता धारण करणाऱ्या व्यक्तीत जरी अदलाबदल झाली तथापि राज्यक्रांतीमुळे, धर्मशास्त्रीय वाङ्मयाचे विकासास कोणत्या हि प्रकारचा व्यत्यय आला नाही. महाराष्ट्रांतील मुसलमानी राजसत्तेस ओहोटी लागून छत्रपती शिवाजीमहाराजांनी स्वराज्यस्थापना केली त्या काळी धर्मशास्त्रीय वाङ्मयरचनेस अधिक च उत्तेजन प्राप्त होऊन गागा-भट्टादि नामांकित शास्त्रकार उदयास आले. शिवाजीमहाराजानी धर्मराज्य स्थापिलें असे तत्कालीन कागदपत्रांत अनेक ठिकाणी उल्लेख आढळतात. वाड भाग २ पान १९९ वरील यासंबंधाचा एक उल्लेख फार महत्त्वाचा आहे. "फिरंगाण प्रांती यजुर्वेदी ब्राह्मण होते त्यास कित्येकांनी संमत देऊन मामाची कन्या भाच्यास द्यावी ऐसें करून एका दोघांनी शरीरसंबध हि केले. त्यास आतां धर्मराज्य झाले, धर्मशास्त्र पाहातां हें अयोग्य कर्म. याकरितां ऐसें कर्म करील त्याजजवळून दंड रुपये पन्नास घेणें." इ. स. १७४४–४५ सालांतला हा उल्लेख आहे. धर्मराज्याचे छत्राखालीं स्मृत्यादि धर्मशास्त्रीय ग्रंथांतील नियमांस अनुसरून सर्व प्रकारच्या व्यवहाराची व्यवस्था केली जाणें अत्यंत आवश्यक समजलें जात असे, हें वरील उल्लेखावरून स्पष्ट सिद्ध होत आहे. व्यवहारनिर्णयपद्धतीसंबंधी जे दोन निबंध मी मंडळास ह्यापूर्वी सादर केले आहेत त्या निबंधांत, मुसलमानी व मराठी रियासतीत महाराष्ट्रांत व्यवहारनिर्णय स्मृत्यादि धर्मशास्त्रीय ग्रंथांतील नियमांस अनुसरून केला जात असे,

ही बाब मीं तत्कालीन कागदपत्रीय पुराव्याचे आधारें शाबीत केली आहे. मीं जे दोन निबंध मंडळास सादर केले ते मुख्यत्वेंकरून ऋणदानादि दिवाणी स्वरूपाचे व्यवहारनिर्णयासंबंधी होते. वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय, साहस इत्यादि व्यवहार-स्थानांसंबंधी मराठी रियासतीत कोणत्या पद्धतीचा अवलंब केला जात असे या प्रश्नाची चर्चा त्या निबंधांत केलेली नव्हती. या प्रश्नाची चर्चा आजचे प्रसंगी कर-ण्याचें मी योजिलें आहे.

वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय, साहस इत्यादि व्यवहारांचा, प्रजेंत शांतता राखणें हें जें कोणत्या हि राजसत्तेचें प्रमुख कर्तव्य समजलें जातें त्याशीं निकट संबंध येतो. यास्तव मुसलमानी राजसत्ता हिंदुस्थानात स्थापन झाल्या-वर वाक्पारुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहारांच्या व्यवस्थेचे बाबतीत मुसलमानी राज्यकर्त्यांनी स्वतांचे पद्धतीचा बरा च अवलंब केला असला पाहिजे हें उघड आहे. मुसलमानी राजसत्ता नष्ट होऊन त्या ठिकाणी मराठ्यानी आपली सत्ता स्थापीत केल्यानंतर मुसलमानी रियासतीत वाक्पारुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहाराच्या व्यवस्थेचे बाबतीत जी पद्धत चालू होती तिचा च थोड्याबहुत प्रमाणानें मराठ्यांनीं अंगकार करणे स्वाभाविक आहे ह्या दोन बाबी लक्षांत घेतल्या असतां ऋणदानादि व्यवहाराचे बाबतीत मराठी रियासतीत स्मृत्यादि ग्रंथांतील नियमांचें जितक्या प्रमाणानें अवलंबन केलेले दृष्टोत्पत्तीस येतें तितक्या च प्रमाणानें वाक्पारुष्य, दंड-पारुष्य इत्यादि व्यवहारांच्या व्यवस्थेचे बाबतीत सदर नियमांचें अवलंबन केलेलें आढळून येणे शक्य नाही. तथापि, स्मृत्यादि ग्रंथात वाक्पारुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहारासबंधी जे नियम आहेत त्या नियमाचा अंगिकार, बऱ्या च प्रमाणानें मराठी रियासतीत, या व्यवहाराचे निर्णयाचे बाबतीत केला जात असे, असें आज मी जें विवेचन करणार आहे त्यावरून आपले लक्षांत येईल. मराठी रियासतींतील वाक्पा-रुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहारस्थानांच्या व्यवस्थापद्धतीचें स्वरूप मुसलमानी आणि स्मृत्यादि धर्मशास्त्राचे नियमांचे मिश्रणानें युक्त असे आढळून येईल, हें वरील विवेचनावरून उघड होत आहे.

दिवाणी आणि फौजदारी हे जे व्यवहाराचे दोन भेद मुसलमानी रियासती-पासून अस्तित्वात असल्याचें आतां सांगितलें, तशा प्रकारचे भेद स्मृतिकाळीं अस्ति-त्वांत होते किंवा काय या प्रश्नाचा विचार करणें ह्या ठिकाणी अप्रस्तुत होणार नाहीं. स्मृतिग्रंथात अशा प्रकारचा भेद केल्याचें आढळून येत नाहीं. हल्ली उपलब्ध अस-लेल्या स्मृतिग्रंथांत जरी दिवाणी आणि फौजदारी असे व्यवहाराचे दोन प्रकार केल्याचे आढळत नाहीं; तथापि दिवाणी आणि फौजदारी या व्यवहाराचे प्रकारां-सारखे कांही एका निराळ्या तत्त्वास अनुसरून व्यवहाराचे दोन प्रकार खिस्ती शत-कापूर्वी ४०० वर्षापासून अस्तित्वांत असावे असें मानण्यास आधार आहे. चाण-

क्यानें केलेला अर्थशास्त्र या नांवाचा ग्रंथ अलीकडे उपलब्ध झालला आहे. चाणक्य हा सुप्रसिद्ध सम्राट् चंद्रगुप्त याचा प्रधान असून खिस्ती शतकापूर्वी चवथ्या शतकांत होऊन गेला असें तज्ज्ञांचे मत आहे.[1] अर्थशास्त्रामध्यें व्यवहारनिर्णय करणाऱ्या दोन प्रकारच्या संस्था अस्तित्वांत असल्याचा उल्लेख केलेला आहे. एक धर्म्मस्थिय व दुसरी कंटकशोधन. या व्यवहारनिर्णय करणाऱ्या दोन संस्थांची रचना व या संस्थांकडे व्यवहारनिर्णय करण्याकरितां सोंपविले जाणारे वाद यांमध्यें भेद असे.[2] धर्म्मस्थिय न्यायसभेकडे खालील व्यवहाराचे निर्णय करण्याचें काम असे.

व्यवहारस्थापना, समयस्यानपाकर्म, माम्याधिकारः, भृतकाधिकारः, दासकल्पः, ऋणदानम्, औपनिधिकम्, विक्रीतक्रुतानुशयः, दत्तस्यानपाकर्म, साहसम्, दण्डपारुष्यम्, वाक्पारुष्यम्, द्यूतसमाह्वयम्, अस्वामीविक्रेयः, स्वम्वामीसबंधः, सीमाविवादः, मर्यादास्थापनम्, वास्तुकम्, वास्तुविक्रयः, विवितपथक्षेत्रहिंसा, बाधावाधिकम्, विवाहसंयुक्तम्, विवाहधर्मः, स्त्रीधनकल्पः, सम्भूयसमुत्थानम्, दायविभागः, दायकर्मः प्रकीर्णानि.

येणेंप्रमाणें व्यवहारांचा निर्णय करण्याचें काम धर्म्मस्थिय सभेकडे असे. आतां कंटकशोधन न्यायसभेकडे कोणते व्यवहार निर्णय करण्याकरितां येत असत ते नमूद करतों. कारूकरक्षणम्, वैदेहरक्षणम्, उपनिपातप्रतिकारः, गूढाजीविनाम् रक्षा, सिद्धव्यञ्जनैर्मानवप्रकाशनम्, शकारूपकर्माविग्रहः, आशमृतकपरीक्षा, वाक्यकर्मानुयोगः, सर्वाधिकरणरक्षणम्, एकाङ्गवधनिष्क्रयः, शुद्धश्चित्रश्च दण्डकल्पः, कन्याप्रकर्म, अतिचारदंडः.

येणेंप्रमाणें व्यवहाराचा निर्णय करण्याचें काम कंटकशोधन न्यायसभेकडे असे. समाजाला कांट्यासारखे बोचणारे जे दुर्जन त्यांचे पारिपत्य करण्याचें काम या न्यायसभेकडे असल्या कारणानें कंटकशोधन ही संज्ञा या सभेस प्राप्त झाली. अर्थशास्त्रामध्यें व्यवहाराचे जे दोन प्रकार दर्शविले आहेत ते नंतरच्या स्मृतिग्रंथांतून कां आढळत नाहींत हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. अर्थशास्त्रामध्यें हे जे व्यवहाराचे दोन प्रकार नमूद करण्यांत आले आहेत ते दिवाणी आणि फौजदारी या दोन प्रकारांहून थोडेसे भिन्न स्वरूपाचे आहेत हें उघड आहे.

हल्ली प्रचारांत असलेल्या पाश्चात्य धर्मशास्त्राच्या विधिनिषेधरूपी आज्ञांत व स्मृतिकारांच्या विधिनिषेधरूपी आज्ञांत बरी च तफावत असल्याकारणानें भारतीय स्मृतिकारांच्या व पाश्चात्य धर्मशास्त्रवेत्त्यांच्या विधिनिषेधरूपी आज्ञांची ज्या तत्त्वांवर उभारणी केलेली आहे, त्या तत्त्वांची तुलना करणें ओघानें च प्राप्त होतें. स्मृतिकारांनी केलेले गुन्ह्यांचे वर्गीकरण, त्याचप्रमाणें गुन्ह्यांचे लघुत्व अगर गुरुत्व व गुन्ह्यास सांगितलेला दंड इत्यादि बाबतींत स्मृतिकारांनी व पाश्चात्य धर्मशास्त्रवे-

---

१ नरेंद्रनाथ लॉ याचा ग्रंथ स्टडीज् इन् एनशंट् हिंदु पालिटी पान १०

२ नरेंद्रनाथ लॉ याचा ग्रंथ स्टडीज् इन् एनशंट् हिंदु पालिटी पान ११९

त्यांनीं घातलेल्या नियमांत जो फरक दिसून येतो त्या फरकाचे उपपत्तीवर ह्या तूलनात्मक विवेचनाचे योगानें प्रकाश पडणार आहे. पाश्चात्य धर्मशास्त्रवेत्त्यांनीं जी धर्मशास्त्रपद्धति प्रतिपादन केली आहे तिचा पाया *आधिभौतिक सुखावर उभारला आहे. प्रस्तुत काळीं अमलांत असलेल्या इं. पी. कोड मधील विधिनिषेधरूपी ज्या आज्ञा आहेत त्या पाश्चात्य धर्मशास्त्रवेत्त्यांच्या आधिभौतिक सुखवादाचे तत्त्वास अनुसरून रचल्या गेल्या आहेत, हे उघड आहे.

पाश्चात्य धर्मशास्त्रपद्धतीचा पाया जो हा आधिभौतिक सुखवाद, त्याचें स्वरूप थोडक्यांत खालीं दर्शविल्याप्रमाणे आहेः—कोणते हि कर्म बरें आहे का वाईट आहे याचा निकाल सदर कर्माचे जे बाह्य परिणाम आपल्या प्रत्यक्ष नजरेस पडतात तवढ्यावरून च केला पाहिजे कारण मनुष्य जे जे कर्म करितो ते सर्व सुखासाठीं किंवा दुःखनिवारणार्थ करीत असतो, किंबहुना सर्व मनुष्यांचें सुख हे च ऐहिक परम साध्य आहे; व ज्या कर्मापासून सुखप्राप्ति किंवा दुःखनिवारणात्मक बाह्य फल अधिक तें च नीतिदृष्ट्या हि श्रेयस्कर समजलें पाहिजे. आधिभौतिक सुखवाद्यांच्या अनेक पंथापैकी सर्वांत जो श्रेष्ठ पंथ त्याचे असे मत आहे की, एका च मनुष्याच्या सुखाकडे न पाहतां सर्व मनुष्यांच्या आधिभौतिक सुखदुःखांचें तारतम्य पाहून नैतिक कार्याकार्याचा निर्णय केला पाहिजे. पुष्कळ लोकांस जेणेकरून पुष्कळ सुख होईल ती च गोष्ट नीतिदृष्ट्या न्याय्य व ग्राह्य समजली पाहिजे; आणि अशा रीतीनें वर्तन करणें हें च या जगांत मनुष्याचें खरें कर्तव्य होय. आधिभौतिक सुखवाद्यांच्या या विचारसरणीसंबंधीं पुढे दर्शविलेले आक्षेप सहज येण्यासारखे आहेत. लाखों दुर्जनांना सुख होईल त्यापेक्षा एका च कां होईना पण सज्जनाला ज्यामुळें संतोष होईल तें च खरें सत्कृत्य होय, असे व्यवहारात सर्व लोक समजतात. हा समज खरा ठरण्यास एका सज्जनाच्या सुखास लाख दुर्जनांच्या सुखापेक्षां अधिक किंमत द्यावी लागते; आणि तसें केलें म्हणजे पुष्कळांचे पुष्कळ बाह्य सुख हें च काय तें नीतिमत्तेच्या परीक्षेचें साधन, हा जो आधिभौतिक सुखवाद्यांचा सिद्धांत तो ह्या विचारसरणीचे दृष्टीनें लंगडा पडतो. म्हणून सुखाचा लाभ होणाऱ्या लोकांची संख्या कमी किंवा जास्त असणें याचा नीतिमत्तेशी नित्य संबंध असूं शकत नाही हें उघड दिसतें. दुसरे असे हि लक्षांत ठेविलें पाहिजे की, सामान्यतः सर्व लोकांस कधी कधीं जी गोष्ट सुखावह वाटते, ती च दूरदर्शी पुरुषांस परिणामीं सर्वांच्या च गैर फायद्याची आहे असे दिसत असते. अशा स्थितीत कोणते हि कृत्य चांगलें किंवा वाईट, धर्म्य अगर अधर्म्य किंवा नीतीचें अगर अनीतीचें आहे, याचा खरा निर्णय त्या कृत्याच केवळ बाह्य फल अथवा परिणाम, म्हणजे तें कृत्य पुष्कळांस पुष्कळ

* Utilitarianism.

सुख देणारें आहे किंवा नाहीं, एवढें च पाहून ठरवितां येत नाही. सदर कृत्य करणाराची बुद्धि, वासना किंवा हेतु कसा आहे हें हि लक्षांत घ्यावे लागते. आतां, भारतीय धर्मशास्त्रवेत्त्यांनीं स्मृत्यादि ग्रंथांतून ज्या विधिनिषेधरूपी आज्ञा केल्या आहेत, त्या आज्ञांची रचना कोणत्या तत्त्वांवर केलेली आहे, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों. स्मृतिग्रंथांतील विधिनिषेधरूपी आज्ञांची उभारणी अध्यात्मवादावर केलेली आहे आत्मप्रसादरूपी अत्यंत सुख आणि त्याला च जोडून असणारी कर्त्याची शुद्ध बुद्धि या आध्यात्मिक कसोटीनें च कर्माकर्माची परीक्षा केली पाहिजे, असें अध्यात्मवादी पंथाचें मत आहे. सर्व जड सृष्टीच्या बुडाशी एक परब्रह्म तत्त्व असून तें प्राप्त करून घ्यावयाचें हें मानवी जीविताचें अंतिम ध्येय समजलें जाते. अखिल मानवी प्राणी सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांनी युक्त असून, तमोगुणाचा आणि रजोगुणाचा ऱ्हास होऊन सत्त्वगुणप्राधान्य कर्मे मानवी प्राण्यांचे हातून जसजशीं होत जातील तसतशी जड सृष्टीचे बुडाशी असलेलें परब्रह्म तत्त्व जाणण्याची पात्रता मानवी प्राण्याचे ठिकाणीं अधिक येते, असें अध्यात्मवादी पंथाचें मत आहे. यास्तव प्रत्येक मानवी प्राण्यानें सत्वगुणप्राधान्य कर्म करीत राहिलें पाहिजे असें अध्यात्मवादी सांगतात. कोणतें हि कर्म चांगले अगर वाईट ठरवावयाचे तें, कर्म करणारा प्राधान्येकरून सत्वबुद्धीनें कर्म करण्यास प्रवृत्त झाला आहे किंवा कसें ह्यावरून ठरविलें जातें. एखाद्या विशिष्ट कर्मापासून कर्म करणारास अगर कर्म करणाऱ्या व्यतिरिक्त व्यक्तीस सुख अगर दुःख होतें अगर ते कोणते प्रमाणांत होतें ह्या बाबिवरून त्या कर्माचा बरेवाईटपणा ठरविला जात नाही. याशिवाय ऐहिक सुखप्राप्ति हें च मानवी जीविताचें अंतिम ध्येय असें जें पाश्चात्य आधिभौतिकवादी मानतात ते भारतीय धर्मशास्त्रवेत्त्यांस मान्य नाही, हा एक दुसरा महत्वाचा मुद्दा लक्षांत ठेवणें जरूर आहे.

लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्ति जन्तोर्न हि तत्र चोदना ।
व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ॥ १ ॥

**अर्थः**—या जगांत मैथुन, मांस व मद्य यांचें सेवन कर म्हणून कोणास सांगावयास नको. तीं मनुष्यास स्वभावतः च हवीं असतात. या तिहींची कांहीं व्यवस्था लावावी, म्हणजे त्यांस मर्यादा किंवा आळा घालून व्यवस्थित रूप यावें या हेतूनें विवाह, सोमयाग व सौत्रामणि यज्ञ यांची शास्त्रकारांनीं अनुक्रमें योजना केलेली आहे, असें एक भागवतांत वचन आहे. मानवी प्राण्याचे ठिकाणीं स्वभावतः च असणारी सुखलालसा तृप्त करण्याचा हव्यास न धरितां तिला आळा घालणें हें आध्यात्मिक पंथाचें एक महत्त्वाचें कलम आहे.

याप्रमाणें आध्यात्मिक वादाचें थोडक्यांत स्वरूप आहे. पाश्चात्य आणि भारतीय धर्मशास्त्रवेत्त्यांनीं प्रतिपादलेल्या तत्त्वांत वर दर्शविल्याप्रमाणें महत्त्वाचे

बाबतीत फरक असल्याकारणानें गुन्ह्याचें स्वरूप, वर्गीकरण व दंडाचे प्रमाण या बाबतीत उभयतांचे पद्धतींत महत्त्वाचे फेरफार उपस्थित झाले आहेत. मनुस्मृतीचे नववे अध्यायांत २३५ व्या श्लोकांत—

ब्रह्महा च सुरापश्च स्तेयी च गुरुतल्पगः ॥
एते सर्वे पृथग्ज्ञेया महापातकिनो नराः ॥ १ ॥

**अर्थः**—ब्राह्मणांस मारणारा, पिठाचें मद्य प्राशन करणारा, ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणारा व गुरुपत्नीशीं गमन करणारा हे सर्व निरनिराळे महापातकी आहेत असें समजावें—असें वचन आहे. त्या च अध्यायांत ही महापातकें करणारास मारून टाकावें असें सांगितलें आहे. हल्लीं प्रचारांत असलेल्या इं. पी. कोडचे दृष्टीनें विचार केला असता सुरापान, स्तेय, गरुपत्नीगमन इत्यादि गुन्ह्यांचें स्वरूप, स्मृतिकारांचे दृष्टीनें जितकें गर्ह्य समजलें जातें तितकें गर्ह्य समजलें जात नाहीं. सुरापान करून सार्वजनिक ठिकाणीं गैरशिस्त वर्तन करणें, अगर शांततेचा भंग करणें, हा गुन्हा इं. पी. कोडाप्रमाणें अगदीं क्षुल्लक समजला जातो. शिवाय हा गुन्हा अगदीं क्षुल्लक लेखीला असून त्यास दंड हि अत्यंत अल्प सांगितला आहे. आतां सागितलेल्या सुरापानाव्यतिरिक्त इतर सुरापान दंड्य समजलें जात नाहीं. जे कृत्य इं. पी. कोडचे दृष्टीनें गुन्हा ठरत नाहीं अगर विशिष्ट परिस्थितीत क्षुल्लक अपराध ठरतो तें च कृत्य भारतीय धर्मशास्त्रकार महत्पातक समजतात. हा एवढा जमीनअस्मानचा फरक वर नमूद केलेल्या भारतीय व पाश्चात्य धर्मशास्त्र-पद्धतीच्या तत्त्वांतील असणाऱ्या तफावतीमुळें उत्पन्न झाला आहे हें उघड आहे. सुरापान तमोगुणप्राधान्य असून सुरेचें सेवन कारणाराचे हातून सात्विक कर्मे घडण दुरापास्त असल्याकारणानें स्मृत्यादि ग्रंथकारांनीं सुरापानाची महा-पातकांत गणना केली आहे. पाश्चात्य धर्मशास्त्रवेत्त्यांचे तत्त्वाप्रमाणें सुरापान करण्यानें जोपावेतों सुरापान करणाऱ्या व्यतिरिक्त इतरांस कोणत्या हि प्रकारचा त्रास होत नाही तोंपावेतों सुरापान करणें हें कृत्य दंडास पात्र होत नाहीं. ह्याचप्रमाणें स्तेय आणि गुरुपत्नीगमन या गुन्ह्यांचे बाबतींत हि इं. पी. कोड आणि स्मृत्यादि ग्रंथ यांचे मतांत फार तफावत कोणत्या कारणानें उपस्थित झाला आहे हें दाखवितां येईल. पाश्चात्य व भारतीय धर्मशास्त्रवेत्त्यांच्या विधिनिषेधरूपी आज्ञांच्या बुडाशीं असणाऱ्या तत्वांची तूलना करून त्यांचेमध्यें उत्पन्न होणाऱ्या मतभेदाचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. आतां मनुस्मृतीत सांगितलेले गुन्ह्यांचे नानाविध प्रकार, दंड व त्यांचें स्वरूप, वाक्पारुष्य, दंडपारुष्य व स्तेय इत्यादि व्यवहारस्थानांसंबंधीं आढळणाऱ्या सामान्य तत्वांचें थोडक्यात दिग्दर्शन करतों.

१ यावानवध्यस्य वधे तावान्वध्यस्य मोक्षणे ॥ (म. स्मृ. अ. ९
अधर्मो नृपतेर्दृष्टो धर्मस्तु विनियच्छतः ॥ १ ॥ (श्लोक २४९

**अर्थः**—अवध्य पुरुषाच्या वधामध्यें जितका अधर्म राजास लागतो तितका च वध्य पुरुषास सोडून दिल्यानें लागतो; व यथाशास्त्र दंड करणारास धर्म प्राप्त होतो, यास्तव सर्व अपराध्यांस दंड करावा.

२ न होढेन विना चौरं घातयेद्धार्मिको नृपः ॥
सहोढं सोपकरणं घातयेदविचारयन् ॥ १ ॥ (म. अ. ९ श्लो. २७० )

**अर्थः**—धार्मिक राजानें चोराचा अपराध निश्चित झाल्यावांचून त्यास दंड करूं नये.

३ मत्तोन्मत्तार्ताध्यधीनैर्बालेन स्थविरेण वा ॥
असंबद्धकृतश्चैव व्यवहारो न सिध्यति ॥ १ ॥( म. स्मृ.अ.८ श्लो.१६३)

**अर्थः**—मद्यादिकांच्या योगानें मत्त, मस्तक फिरल्यामुळें उन्मत्त, पराधीन, व्याधि इत्यादिकांनी पीडित, बाल व वृद्ध या अस्वतंत्र झालेल्या पुरुषांनी पिता, भ्राता इत्यादिकांच्या संमतीवाचून केलेला ऋणदानादि व्यवहार सिद्ध होत नाही.

४ तीरितं चानुशिष्टं च यत्र क्वचन यद्भवेत् ॥
कृतं तद्धर्मतो विद्यान्न तद्भूयो निवर्तयेत् ॥ १ ॥ (म.अ. ९ श्लो. २३३ )

**अर्थः**—ज्या एकाद्या ऋणदानादि व्यवहारामध्यें जे कार्य यथाशास्त्र करून सोडलें आहे म्हणजे त्याचा एकदां निर्णय झाला आहे व जें दंड देऊन समाप्त झालें आहे तें धर्मतः झालेलें आहे असें समजावें व त्यास पुनरपि फिरवूं नये.

५ गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ॥ ( म. स्मृ. अ. ८ )
आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ॥ १ ॥ ( श्लो. ३५० )

**अर्थः**—गुरु, बालक, वृद्ध व बहुश्रुत ब्राह्मण यांतील कोणी हि जरी शस्त्र उचलून वध करण्याकरितां आपल्यावर येऊं लागला व पळून जाऊन हि आपले संरक्षण करणें अशक्य, तर त्यास मारून टाकावें.

६ अष्टापाद्यं तु शूद्रस्य स्तेये भवति किल्बिषम् ॥
षोडशैव तु वैश्यस्य द्वात्रिंशत्क्षत्रियस्य च ॥ १ ॥

ब्राह्मणस्य चतुःषष्टिः पूर्णं वापि शतं भवेत् ॥
द्विगुणा वा चतुःषष्टिस्तद्दोषगुणविद्धि सः ॥१॥ (म.अ.८श्लो.३३७–३३८)

**अर्थः**—ज्या चोरीस जो दंड सांगितलेला आहे तो च दंड चोरीचे गुण व दोष जाणणाऱ्या शूद्रानें चोरी केल्यास त्यास ८ पट, वैश्यास १६ पट, क्षत्रियास ३२ पट, ब्राह्मणास ६४ पट आणि राजास पूर्ण म्ह० १०० पट अथवा १२८ पट करावा. कारण, राजा सर्व गुणांस व दोषांस जाणणारा असतो. प्रस्तुत काळीं इं.पी. कोडची उभारणी ज्या साधारण तत्त्वांवर करण्यांत आलेली आहे तीं तत्त्वें आपणां सर्वांस विदित आहेत.

वर नमूद केलेली तत्त्वे त्या तत्त्वांहून भिन्न आहेत अशांतला प्रकार नाही. सहावें तत्त्व बरीक आपले धर्मशास्त्रास विशिष्ट आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्थेनरूप वर्णाचे श्रेष्ठत्वाबःगेवर श्रेष्ठत्वास अनुरूप अशी जबाबदारी श्रेष्ठवर्णीयावर येते. या तत्वास अनुसरून वरील तत्त्व ग्रथित करण्यांत आलें आहे. इंग्रजी कायद्यांत जरी हे तत्व स्पष्टपणें नमूद करण्यांत आलेले नाही तथापि व्यवहारनिर्णयप्रसंगी या तत्वास अनुसरून न्यायाधीश अपराधी ठरलेल्या इसमास कमीअधिक प्रमाणानें शिक्षा करितात, असें नेहमीं आपल्या आढळण्यांत येतें.

आतां मनुस्मृतीत गुन्ह्याचे जे नाना प्रकार दिले आहेत त्यांचें दिग्दर्शन करितों. इंडियन पिनल कोडमध्यें गुन्ह्यांचें ठोकळ वर्गीकरण—Offences against public justice, offences against person, offences against property and offences against reputation,

अशा प्रकारचें केलें आहे. हें वर्गीकरण स्मृतिकाराच्या दृष्टीनें शास्त्रीय ठरणार नाही. कोणत्या हि कृत्याचा चांगुलपणा अगर वाईटपणा तें कृत्य करणाऱ्या माणसाचें आत्म्यावर त्या कृत्यापासून कोणता परिणाम घडतो, यावरून ठरविण्याची स्मृतिकारांची पद्धत आहे. कोणतें हि कृत्य सत्वगुणापासून जितकें दूर, व तमोगुणप्राधान्य, तितकें तें कृत्य जास्त गर्हणीय व दंड्य असा स्मृतिकारांचा सिद्धांत आहे. या तत्वास अनुसरून स्मृतिकारांचे गुन्ह्यांचें वर्गीकरण निराळ्या स्वरूपाचें होईल हे उघड आहे.

१ ब्रह्महत्या, सुरापान, स्तेय, गुरुपत्नीगमन आणि ह्या लोकांशी संसर्ग ठेवणारे यांस पंचमहापातकी समजतात.

या पंचमहापातकांपैकी कोणतें हि पातक इच्छा नसतांना एखाद्या गुणवान् ब्राह्मणानें केल्यास त्यांस मध्यम साहस दंड सांगितला आहे. पण ही च कृत्यें इच्छापूर्वक केल्यास त्यास राष्ट्रांतून घालवून द्यावे असें सांगितलें आहे. कांहीं विवक्षित प्रकारची चिन्हे—तप्तमुद्रा—करून या लोकांचे डोक्यावर उठवावीत असें हि सांगितलें आहे. ब्राह्मणेतर क्षत्रियादिकांनीं ही कृत्यें इच्छा नसतां केल्यास त्यांचें सर्वस्व हरण करावे, इच्छापूर्वक केल्यास त्यास ठार मारावें.

२ शास्त्रीय होमादि अभिचार कर्में केली असतां व मूठ मारणें इत्यादि लौकिक कर्में केली असतां, ज्यांस इच्छून तीं केली असतील, त्यांस मरण आल्यास मनुष्यवधास सांगितलेली शिक्षा हीं कर्में करणारास करावी. मरण न आल्यास दोनशें पण दंड करावा.

३ खोट्या राजाज्ञा लिहिणे

४ अमात्यांमध्यें भेद पाडणें

५ स्त्री, बालक व ब्राह्मण यांस मारणें

६ शत्रूंचें सेवन करणें

तीन, चार पांच व सहा या गुन्ह्यास ठार मारणें, ही शिक्षा सांगितली आहे.

७ व्यवहाराचा अयोग्य निकाल करणें सहस्र पण दंड.

८ लांच खाणें—सर्वस्व हरण करणें ही शिक्षा.

९ असत्य भाषण—शिक्षा, प्रथम साहस इत्यादि दंड.

१० खोटी साक्ष देणें—शिक्षा, क्षत्रियादि तीन वर्णांचे लोकांस दंड करून राष्ट्रांतून घालवून देणें; ब्राह्मणांस दंड न घेतां राष्ट्रांतून घालवून देणें.

११ प्रतिवादीनें द्रव्य नाकारणे किंवा वादीनें अधिक द्रव्याकरितां खोटें बोलणें, शिक्षा—जेवढें द्रव्य नाकारलें असेल अगर जेवढें द्रव्याची वाजवीपेक्षां अधिक मागणी केली असेल त्याच्या दुप्पट दंड.

१२ गांवांत व देशांत राहणाऱ्या लोकाच्या संघांत सत्यादि शपथ वाहून एखादा नियम ठरला असतां तो नियम न पाळणें, शिक्षा—राष्ट्रांतून घालवून देणें अगर फार मोठा दंड करणें.

१३ ग्रामांतील ब्राह्मणसमूहापैकी समयाचें उल्लंघन करणें,—वरीलप्रमाणें दंड

१४ ज्या मिळकतीचा मालक कोण आहे हे माहीत नाही, त्या मिळकतीवर मालकी नसतां मालकी सांगणें, शिक्षा—जितकें धन तितका दंड.

१५ नष्ट झालेलें धन राजाचे अधिकाऱ्यास सांपडल्यावर व त्याचे उत्तम प्रकारें संरक्षण होत असतां तें चोरणें अगर चोरण्याचा प्रयत्न करणें, शिक्षा—हत्तीच्या पायाखालीं देऊन मारणें.

१६ राजा रागावला आहे, तुझें धन लुटून नेईल सबब मजजवळ दे, असें सांगून धन, कन्या इत्यादि परधनाचा कपटानें अपहार करणें, शिक्षा—हातपाय तोडणें इत्यादि नानाप्रकारें शिक्षा देऊन मारणें.

१७ द्यूत व समाव्हय, शिक्षा—हात तोडणें.

१८ यज्ञोपवीतादि शूद्रानें धारण करणें, शिक्षा—देहांत.

१९ द्यूतादि करणारे, नाच व गाण्यावर निर्वाह करणारे, वेदाचा द्वेष करणारे, श्रुतिस्मृतिबाह्य व्रतें करणारे व मद्यपान करणारे; शिक्षा—राष्ट्रांतून घालवून देणें.

२० राजाच्या धनगृहांतून धन नेणारे, त्याची आज्ञा न मानणारे, शत्रूचें राजाशीं अधिक वैर वाढविणारे; शिक्षा—कर, चरण, जिव्हा इत्यादिकांचें छेदन ताडण.

२१ राजसंबंधी धनागार, आयुधगृह, देवांचे प्रतिमेचें गृह फोडून हत्ती, अश्व इत्यादिकांस हरण करणें, शिक्षा—ठार मारणें.

२२ तट फोडणें, खंदक बुजविणें, द्वारें तोडणें, शिक्षा—देशांतून घालवून देणें.

२३ स्नानदानादि जलाशयाचा बांध फोडणे, पाण्यांत बुडवून किंवा दुसऱ्या उपायानें ठार मारणे, शिक्षा—दंड देण्यास तयार असल्यास उत्तम साहस दंड.

२४ मना केलेले धान्य व इतर पदार्थ परदेशांत नेणें, शिक्षा—सर्वस्व हरण करण.

२५ वाक्पारुष्य, शिक्षा—द्रव्यदंड.

२६ दंडपारुष्य, शिक्षा—द्रव्य व देहदंड.

२७ शूद्राने करचरणादि अंगाने द्विजास प्रहार करणें, शिक्षा—ज्या अंगानें प्रहार केलें असेल ते अंग छेदन करणें.

२८ शरीरपीडा, धनग्रहण इत्यादिकांच्या द्वारां इच्छापूर्वक शूद्रानें ब्राह्मणांस पीडा करणें, शिक्षा—हातपाय तोडणें.

२९ स्तेय, शिक्षा—द्रव्य व देहदंड.

३० वस्त्राम[ध्य] बांधलेल्या सुवर्णादिकांस गांठ सोडून घेणें—प्रथम कृत्य असल्यास बोटें तोडणें, दुसरे कृत्यास हात व पाय तोडणें, तिसऱ्या वेळी कृत्य केल्यास वध करणें

३१ चोरांस मदत करणें—चोराप्रमाणें शिक्षा

३२ चोराचें चौर्य जाणून त्यास भोजन व चोरीच्या उपयोगी असलेली भांडी देणे—चोराप्रमाणे शिक्षा.

३३ राष्ट्रांमध्यें लोकाचे रक्षणाकरितां ठेवलेल्या लोकांनी चोरास मदत करणें—चोराप्रमाणें शिक्षा.

३४ शेतीच्या उपयोगी असलेल्या नांगर, कुदळी इत्यादि औताची व खड्गादि शस्त्रांची व कल्याणघृतादि औषधांची चोरी करणें, शिक्षा—द्रव्यदंड.

३५ रात्री भिंत फोडून चोरी करणें,—हात तोडून तीक्ष्ण शूलावर चढविणें.

३६ तस्करादि ग्राम लुटीत असतां, जलाचें धरण फुटलें असतां, मार्गांत चोर भेटला असतां, जवळ असणाऱ्या लोकांनीं या कृत्याचे प्रतिबंधार्थ मदत न करणें —देशांतून घालवून देणें.

३७ साहस—शिक्षा, द्रव्य व देहदंड.

३८ परस्त्रीसंभोग, शिक्षा—देशांतून घालवून देणें.

३९ शूद्रानें ब्राह्मणादि स्त्रीशीं संभोग करणें, शिक्षा—प्राणान्त दण्ड.

३९ अ—एका कन्येनें दुसरे कन्येस दूषित करणें,—२०० पण दंड, १० फटके.

४० ठेवीचा अपहार करणें व ठेव न ठेवितां ठेवीबद्दल मागणी करणें; शिक्षा-चोराप्रमाणें दंड करावा.

४१ निक्षेपाचा अपहार करणे, शिक्षा—निक्षेपाइतका दंड.

४२ यजमानानें ऋत्विजास सोडणे व ऋत्विजाने यजमानास सोडणें, शिक्षा-शंभर पण दण्ड.

४३ माता, भार्यादिकांचा त्याग करणे, शिक्षा—सहाशे पण दण्ड.

४४ ब्राह्मण शेजाऱ्यास भोजन न घालणें, शिक्षा,—एक माष-रुप्याचा दण्ड

४५ श्रोत्रियानें शेजाऱ्यास जेवावयास न बोलाविणें, शिक्षा-सुवर्णाचा मा दण्ड करावा.

४६ परिटानें एकाचें वस्त्र दुसऱ्यास देणें, शिक्षा—द्रव्यदण्ड.

४७ कोष्ट्यानें बरोबर वजनाचें वस्त्र न देणें, शिक्षा—बारा पण दण्ड.

४८ दुसऱ्याचे धन विकणे—धनाच्या स्वामीचा धन विकणारा संबंधी असेल तर सहाशें पण दण्ड-संबंधी नसेल तर चोराप्रमाणें दंड (अध्याय ८ श्लोक १९८)

४९ दोषवती कन्या दोष न सागतां वरास देणें, शिक्षा—शहाण्णव पण दण्ड

५० कन्या क्षतयोनी आहे असे सांगणें; शंभर पण दंड.

५१ कुंपण घातलेल्या शेतांतील पीक पशूंने खाल्ल्यास, शिक्षा—पशूंचे पालकास शंभर पण दंड.

५२ शेतकऱ्याचे दोषामुळें राजभागाची हानि होणें, शिक्षा—हानि झाली असेल त्याच्या दसपट दण्ड.

५३ शेतकऱ्याचे सेवकाचे दोषामुळे राजभागाची हानि होणे, शिक्षा—हानीच्या पांचपट दण्ड.

५४ सीमेचा खोटा निर्णय करणें, दोनशें पण दण्ड.

५५ सीमेच्या वादांत खोटें सांगणें, शिक्षा—मध्यम साहस दण्ड.

५६ गृह, तळें, उपवन, भय दाखवून हरण करणें, शिक्षा—पांचशें पण दण्ड.

५७ गृह, तळें, उपवन आपलें च आहे अशा भ्रांतीने हरण करणे,—दोनशे पण दण्ड.

५७ अ-व्याधि नसतांना सेवकानें केवळ अभिमानानें काम करण्याचें नाकारणें,—आठ गुंजा सुवर्ण इत्यादि दण्ड व वेतन देऊं नये (अ. ८ श्लो. २१५).

५८ ठरल्या मुदतीनंतर माल परत देणें अगर घेणें—सहाशें पण दंड

५९ राजाचा कर कमी करण्याकरितां व टाळण्याकरिता, मालाची अकालीं

विक्री करणे, अगर भलत्या मार्गाने माल नेणे अगर विकलेल्या मालाची संख्या कमी सांगणें; शिक्षा—जेवढा कर कमी करण्याचा प्रयत्न केला असेल त्याच्या आठपट दण्ड.

६० संस्कारसंपन्न ब्राह्मणाकडून पाय धुववणे इत्यादि कर्मे ब्राह्मणानें करवून घेणे, शिक्षा—६०० पण दड

६१ नळ्याचे उदक हरण करणे, शिक्षा—प्रथम साहम दण्ड.

६२ रोगादि आपत्ति नसता राजमार्गात पुरीषोत्सग करणे,—२०० पण दंड.

६३ शरिरातील शल्यादिकांची वैद्यानें बरोबर चिकित्सा न करणे, शिक्षा—प्रथम साहस दड.

६४ गाय, घोडे इत्यादिकाची दुश्चिकित्सा करणें, शिक्षा—प्रथम साहस दंड.

६५ मनुष्याची दुश्चिकित्सा करणे, शिक्षा—मध्यम साहस दड.

६६ पूळ, राजाच्या द्वारातील ध्वजाचिन्ह, पुष्करणी इत्यादिकांस तोडणें, शिक्षा-५०० पण दंड.

६७ शुद्ध द्रव्यामध्यें अशुद्ध द्रव्य मिसळून ते दूषित करणे; शिक्षा–प्रथम साहस दंड

६८ वेध करितां न येणाऱ्या माणिकाचा वेध करणे; वेध करतां येणाऱ्या मोत्याचा अयोग्य ठिकाणी वेध करणे, शिक्षा—प्रथम साहस दण्ड.

६९ योग्य किंमत देणारास वाईट प्रतीचा माल देणे, शिक्षा—प्रथम साहस दण्ड.

७० उगविण्यास असमर्थ असें बीज उगविण्यास योग्य आहे असें सांगून विकणें; शिक्षा—प्रथम साहस दण्ड.

७१ उत्कृष्ट बीजात वाईट बीज मिसळविणें व ते उत्कृष्ट आहे असें सांगून विकणें; शिक्षा—मध्यम साहस दण्ड.

७२ ग्रामाची अगर नगराची सीमा नाहीशी करणे, शिक्षा—नाक, हात, पाय इत्यादि नाहीसे करणे.

७३ सोनारानें आपल्या कसबाने अन्याय करणें, शिक्षा–वस्तऱ्यानें त्याचे देहाचे तुकडे करणें.

वर नमूद केलेल्या गुन्ह्यापैकीं वाक्पारुष्य, दण्डपारुष्य, स्तेय, साहस इत्यादि गुन्ह्याचे अनेक भेद मनुस्मृतीत दिलेले आहेत, परंतु त्या सर्वांचा येथें नामनिर्देश केलेला नाहीं.

दडाचे नानाविध प्रकार, दंडाचे प्रमाण इत्यादिकाबद्दल मनस्मृतीत जे वर्णन केलेले आहे, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

लिंग, उदर, जिव्हा, हात, पाय, नेत्र, नाक, कर्ण, धन, देह ही दंडाची स्थानें आहेत. यास्तव ज्या अंगानें अपराध केला असेल त्यास ताडनादि वेदना करावी. अल्प अपराध असल्यास धनाचा दंड करावा. महापातकादि पापे घडली असता देहदंड करावा.

देहदंड म्हणजे ठार मारणें. अपराधी पुन्हा पुन्हा इच्छापूर्वक अपराध करीत आहे की काय हें पाहून व ग्राम, अरण्य, इत्यादि अपराधाचें स्थान; रात्र, तिन्हीसांज इत्यादि काल; अपराध्याचे धन, शरीर इत्यादि सामर्थ्य व अल्प किंवा मोठा अपराध या सर्वांचा विचार करून दंडास जे पात्र असतील त्यांस दंड करावा.

लोकव्यवहारार्थ भूलोकी ताम्र, रौप्य, सुवर्ण इत्यादिकांच्या पणादि ज्या संज्ञा प्रसिद्ध आहेत त्या दंडादिकांच्या उपयोगार्थ खालील प्रमाणे वर्णिलेल्या आहेतः—

झरोक्यातून किंवा साणयातून घरामध्यें जो उन्हाचा कवडसा पडतो त्यांत बारीक कण तरंगत असलेले आपल्या नजरेस पडतात. या नजरेस पडणाऱ्या बारीक कणास भूसरेणू ही संज्ञा आहे. आठ भूसरेणू=" लिक्षा ", तीन लिक्षा= " राज-सर्षप," तीन राजसर्षप = " गौर सर्षप ", सहा गौर सर्षप="मध्ययव ", तीन मध्य यव = "एक कृष्णल ( गुंज )", पाच कृष्णल =" एक माष ", सोळा माष = " सुवर्ण ( तोळा ) ", चार सुवर्ण = " एक पल ", दहा पल = "एक धरण", दोन कृष्णल = १ रौप्य माष ", सोळा रौप्य माष = १ "धरण", म्हणजे च एक रुप्याचा पुराण". तांब्याच्या कार्षिकास कार्षापण म्हणतात.

१ कर्ष = शास्त्रीय पलाचा चौथा भाग
८०गुंजा ( एक पल = चार सुवर्ण; सोळामाष, = १ सुवर्ण
दहा रौप्य धरण = एक रुप्याचा शतमान
चार सुवर्ण = निष्क
अडीचशे पणाचा प्रथम साहस दंड
पाचशे पणाचा मध्यम साहस दंड
सहस्र पणाचा उत्तम साहस दंड

वर नमूद केलेली जी दहा दडस्थानें सांगितली आहेत त्यांशिवाय हि दुसऱ्या प्रकारचे दंड मनुस्मृतीत सांगितल्याचे आढळतात. फटके मारणे, मुंडण करून गाढवा-वरून धिंड काढणे, कुत्र्याकडुन खाववणे, लोखंडाच्या शय्येवर भाजणे, एका प्रकारच्या अग्नीत जाळणे, अशा प्रकारच्या शिक्षा मनुस्मृतीत आढळण्यात येतात. प्राणांतिक दंडाच्या स्थानी ब्राह्मणास मुंडण ही शिक्षा सांगितली आहे.

क्षात्रिय, वैश्य व शूद्र जातीतील जो कोणी दारिद्र्यामुळें दंड भरण्यास असम-र्थ असेल त्यानें आपल्या जातीस उचित कर्म करून दंड भरावा, असें मनुस्मृतीत सांगितले आहे.

स्त्रिया, बालक, उन्मत्त, वृद्ध इत्यादिकांस राजानें वेलीनें अगर वेळूच्या का-ठीनें ताडन करावें किंवा दोरीनें बांधून ठेवावें, ही शिक्षा सांगितली आहे.

वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय, साहस इत्यादि व्यवहारांचे बाबतीत मराठी रियासतीत कोणत्या पद्धतीचा अवलंब केला जात असे, याचे विवेचनाकडे आतां

वळतों. मराठ्यांच्या इतिहास-साधनांचे जे ग्रंथ अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्या ग्रंथांतील माहितीच्या आधारें मुख्यत्वेकरून हें विवेचन करण्याचें मी योजिलें आहे. विवेचनाचे सोईचे दृष्टीनें या विषयाचे खाली नमूद केल्याप्रमाणें चार भाग कल्पून प्रत्येक भागांत त्या विषयाची माहिती सादर केली आहे.

१ वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय, साहस इत्यादि व्यवहार-स्थानाच्या निर्णय-व्यवस्थेसंबंधी आढळून येणारी साधारण तत्त्वें.

२ वाक्पारुष्यादि व्यवहारांचा निर्णय करणाऱ्या संस्था.

३ गुन्ह्यांचे नानाविध प्रकार.

४ दंड व त्याचे प्रकार.

## वाक्पारुष्य, दंडपारुष्य इत्यादि व्यवहारांचे निर्णयासबंधीं आढळून येणारे साधारण नियम

एखादा गुन्हा घडल्याची बातमी लागली तर गुन्हा करणारे इसमास हुजूर पाठवून देण्याबद्दल गावचे मोकदमास हुकूम देण्यांत येत असे ( वाड भाग १ पान १८५ ). गुन्हा ज्या गांवात घडला असेल त्या गावचे मोकदमावर, गुन्ह्याचा तपास लावून देण्याची जबाबदारी असे व मोकदमास जातीनें हुजूर येण्याबद्दल हुकूम करण्यात येई.

चोरीचा गुन्हा झाला असता ज्या गावास माग जाईल तेथून पुढे माग काढून देण्याची जबाबदारी मोकदमावर असे. मोकदमांनी माग काढून न दिल्यास चोरीचा माल मालकास भरपाई करण्याची जबाबदारी गांवचे मोकदमावर असे. मौजे म्हसोली येथील एका इसमाचें घर फोडून त्याची आठ गुरें नेली. ह्या चोरीचा माग रेढरे गांवापावेतों लागला. तेव्हा मोकदमास असा हुकूम करण्यांत आला की; माग पुढे काढून देणें, माग काढून न दिल्यास चोरीस गेलेलीं आठ गुरें ज्याची त्यास देणे ( वाड भाग १ पान १९० ). जाब येथील एका इसमाच्या दोन म्हशी चोरीस गेल्या. चोरीचा माग कटगूण गांवी गेला. तेव्हा मोकदमांनी माग कबूल करून चोरीस गेलेल्या म्हशी-मालकास द्यावयाचा करार करून जाब गांवचे पाटलास कतबा लिहून दिला. चोरीस गेलेल्या म्हशी किंवा त्या सारख्या म्हशी न देता कटगुणचे मोकदमांनी एक वाझ व एक म्हानारी म्हैस देण्यास काढली. तेव्हा त्यास चोरीस गेलेल्या म्हशी-सारख्या म्हशी देण्याचा हुजूरचा हुकूम झाला. (वाड भाग १ पान १८९ इ.स. १७४६-४७ ). एखाद्या गांवाची रखवाली करण्याकरितां एकाद्यास ठेविला असतां त्या गावीं चोरी झाल्यास त्याची जबाबदारी रखवालदाराचे शिरावर असे. संताल राणा बरडे कसबा निंब यासी आज्ञा केली ऐसी जे राजेश्री खंडेराव बक्षी यांचें घर चोरांनीं फोडून वस्तभाव नेली. तेथील रखवाली तुझे स्वाधीन असतां चोरी व्हावया गरज काय. या उपरी देखत आज्ञापत्र चोरीचें ठिकाण लावून मशारनिल्हेचे पदरीं घालून

पावलियाचे कबज घेऊन हुजूर येणें (वाड भाग १ पा. १६५ इ.स. १७५२ । ५३). हुजूर-हुकूम बजावण्याकरितां ज्या लोकांकडे देण्यांत यत त्यांना मसाला म्हणून हुकुमांत नमूद केलेली रकम ज्या इसमास हुकूम जाईल त्यास द्यावी लागत असे. ही रकम रुपये १० पासून २० पर्यंत असे, हे वाड भाग १ पान १८९ । १९० इत्यादि उदाहरणांवरून दिसते. गांवचे मोकदम, गांवकरी व गांवचे रखवालीस ठेविलेला इसम यांवर चोरी, रस्तालूट वगैरे गुन्ह्याचे बाबतीत भारी प्रकारची जबाबदारी होती हे वरील विवेचनावरून लक्षांत येईल. ह्या बाबीचें मूळ स्मृतीचे वचनांत सांपडते व फार पुरातन काळापासून ह्या नियमाप्रमाणे तजवीज ह्या गुन्ह्यांचे बाबतीत आपले-कडे चालत आलेली आहे.

याज्ञवल्क्य स्मृतीचे व्यवहाराध्यायांतील श्लोक २७१, २७२ हे फार महत्वाचे आहेत. आतां सांगितलेल्या सर्व बाबींचा ह्या श्लोकांत समावेश केलेला आहे.

२७१-चोरी, खून, वगैरे गुन्हा एखाद्या खेड्यात झाल्यास त्या गुन्ह्याचा माग एखाद्या शेताचे मालकाकडे अगर रखवालदाराकडे ( जेव्हां गुन्हा सार्वजनिक रस्त्यावर अगर शेताखेरीज इतरत्र घडला असेल तेव्हां) लागे तोपर्यंत त्या गुन्ह्याबद्दल दोष गांवचे मोकदमावर आहे. २७२-एखादी चोरी एखाद्या खेड्यांत झाल्यास त्या चोरीची भरपाई ज्या गावांत चोरी झाली असेल तेथील गांवकऱ्यांनी अगर चोरीचा माग ज्या खेड्याकडे गेला असेल तेथील गावकऱ्यांनी करून द्यावी. खेड्यापासून एक कोसाचे बाहेर चोरी झाल्यास भोंवतालच्या पांच खेड्यांतील लोकांनी अगर दहा खेड्यांतील लोकांनी चोरी भरून द्यावी.

वर जी उदाहरणे दिलीं आहेत ती ह्या श्लोकांतील तत्वांस अनुसरून आहेत हें उघड आहे

वाक्पारुष्य, दंडपारुष्य, स्तेय इत्यादि व्यवहाराचे चौकशीचे बाबतीत दिव्याचा आश्रय करण्याची पद्धति होती असें खालील उदाहरणांवरून दिसून येतें.

सोयराजी थोरात किल्ले नारायणगड हा रखमाजी रेपाळा याची लेक मैनी हे शिवाजी परीट याजजवळ गेली म्हणून मुरवई जाहला होता त्यास मैनीनें खा काढला. खऱ्यास उतरली खरी जाहली. सोयराजी खोटा जाहला, सबब गुन्हेगारी रुपये ५० ( इ. स. १७४८ । ४९ वाड भाग २ पान ६३ ).

माणकोजी पाटील मौजे निंबोणे याने त्याचें ठेवणें मळियांत होते ते काढले. हे वर्तमान हुजूर कळल्यावर त्यास विचारलें. त्यास हा आपले ठेवणे साहाशे रुपये होते जास्ती काहीं नव्हते म्हणोन क्रिया करावयासी राजी झाला सबब त्यास रांजणगांवची क्रिया करण्याकरितां पाठविण्यांत आला व क्रियेस लागला तर हुजूर पाठविणें, क्रियेस न लागला खरा जाहला तर निरोप देणें ( इ. स. १७४६ । ४७ वाड २ पान ७० ).

खेत्रोजी बर्गे पाटील कसबे कोरेगांव प्रांत वांई याजवर आनंदराव बर्गे यांनी आरोप आणला की,महिपतराव कुळकर्णी यास जिवें मारला. खेत्रोजीस किल्ले धोडप येथें अटकेंत ठेविला. ऐशास खेत्रोजी मजकूर याच्या भाऊबंदास खुनाचे दिव्य नेमिलें आहे. ( वाड भाग ७पान २२३ ).

मोठमोठ्या गुन्ह्यांचे कामी दिव्याचा आश्रय करावा असे विषयीची स्मृतिवचने पूर्वीचे लेखांत साग्र दिली असल्याकारणाने ती च वचने फिरून या ठिकाणी देत नाही.

## वाक्पारुष्य, दण्डपारुष्य इत्यादि व्यवहारांचा निणय क या संस्था

मराठी रियासतात फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार कोण-कोणत्या न्याय करणाऱ्या संस्थास असे, अशाबद्दल साग्र व तपशीलवार माहिती नमूद करण्यास जशा प्रकारचे स्पष्ट उल्लेख तत्कालीन कागदपत्रांत आढळावयास पाहिजेत तशा प्रकारचे आढळत नाहीत. असे स्थितीत, न्यायाधीश म्हणून जे अधिकारी नेमण्यांत येत असत त्याचेकडे फौजदारी गुन्ह्याची चौकशी करून निकाल करण्याचें काम असावे, असा सामान्यपणे तर्क केल्यास चुकीचा होणार नाही. दिवाणी स्वरूपाचे व्यवहारांची अथपासून इतिपर्यंत ज्यांत साग्र हकीकत नमूद केली आहे अशा प्रकारचे—निवाडापत्रे, महजर, निर्णयपत्रें, जयपत्रें, यजितपत्रें—हजारों कागद उपलब्ध झाले आहेत. परतु, या च स्वरूपाचे फौजदारी गुन्ह्यांसबंधाचे कागद अद्याप पावेतों म्हणण्यासारखे उपलब्ध झाले नाहीत. यास्तव आजचे विषयाचा जो तिसरा भाग त्याबद्धल निश्चित असें कांही मत नमूद करणे कठीण आहे. तथापि उपलब्ध झालेल्या माहितीवरून या विषयासंबंधीं जें कांही थोडें बहुत सांगतां येण्यासारखें आहे तें येथें नमूद करितो. ऋणदानादि कोणता हि दिवाणी स्वरूपाचा व्यवहार एखाद्या गांवांत उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय 'गोता' सारख्या संस्था करीत असत ही गोष्ट आपणांस विदित आहे. एखाद्या गांवांत फौजदारी गुन्हा झाल्यास त्या गुन्ह्याचा निवाडा करण्याकरितां पंच नेमीत असत असें वाड भाग २ पान ४६ मधील उल्लेखावरून दिसून येतें; इ. स. १७५० । ५१. नारायणजी पाटील व बकाजी पाटील मौजे राजे–टांकळी प्रो बीड यांनी मौजे पाडळी प्रांत अंबड येथील विष्णाजी पाटील याजबरोबर कज्जिया करून त्याचा खून केला. या खुनाचे बाबतीत हुजूरकडे रवाना करण्यांत आलेल्या कागदांपैकीं २ कागद राजीनामे आहेत व त्या कागदांचा उल्लेख खाली नमूद केल्याप्रमाणें केलेला आहे. नारायणजी पाटील व बकाजी पाटील मौजे राजेटांकळी यांनीं राजीनामा लिहून दिला कीं,आपण पंचाईत नेमून द्यावें त्याप्रमाणें आमचा पाडळीकरांचा इनसाफ पंच करतील. त्याचप्रमाणें मुकद्दम मौजे पाडळी यांनीं राजीनामा लिहून दिला

या राजीनाम्यान्वये पचाने इनसाफ करून गुन्हेगारी रुपये २००१ सरकारास राजे-ांकळीचे पाटलानी यावी असा करार करून कद्बा लिहून दिला. फौजदारी स्वरूपाचे गुन्ह्याचा निर्णय गावातील पंचाईत मार्फाने होत असे, असे या उल्लेखावरून पष्ट होत आहे. अशा स्वरूपाचा उल्लेख दुसरे एके ठिकाणी आहे तो हि विचारात ेण्यासारखा आहे. वाड भाग ७ पान १९५. मौजे साखरे प्रां जळोद व मौजे कटारी ां एरंडोल येथील शीवेचा कज्जा झाला. साखरकरानी कटारीकर पाटलाचा खून केला. त्यानंतर नारो कृष्ण दरवे यास हरदूवाद्यास आणवून त्यांचा करीना ोवरगांव व जमीदार दोन्ही महालचे मिळवून कोणाची रूईरयात न करिता ाजवी मनास आणून विल्हेस लावणे व खून केला आहे याजकरिता गुन्हेगारी घेणें, अशा प्रकारचा हुकूम करण्यात आला. यावरून हि फौजदारी गुन्ह्यांचा निर्णय पंच-ार्फत होत असे असें दिसते. इ. स. १७६४–६५.

काही विशिष्ट प्रकारचे गुन्हे व व्यवहार यांचा निर्णय करण्याचे काम कांही वेशिष्ट जातीचे पंचांनी करावें असा प्रघात असल्यास त्या जातीचे पचांचे अधिकारांत ात न घालतां त्या गुन्ह्याचा अगर व्यवहारांचा निवाडा करण्याचा हक्क जातीचे ंचाकडे ठेवण्यात येई. चिंतामण जोशी सरवदा वस्ती पेण यानें आपले जातीस रठाण व कोणी बद अंमल केला या कांही कजिया झाला तरी आमचा आम्ही वारू, देवाणांतून तगादा न लावावा अशी चाल आहे. तरी त्या चालीप्रमाणें वहिवाट ाल ठेवण्याविषयी अभय पत्र मिळावे अशी विनती केल्यावरून त्यास अभयपत्र ण्यात आलें. ( वाड भाग २ पान ३७ इ. स. १७४७–४८. )

पुण्यासारख्या मोठमोठ्या शहरांतून कोतवाल या नावाच्या अधिकाऱ्याची ामणूक मराठीशाहीत करण्यात येत असे. शहरांत घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी रण्याचा अधिकार कोतवालास होता, असें वाड भाग ७ पोट भाग २ पान २३३ भाग ८ पान १२० मध्ये पुणे शहराचे कोतवालाचे नेमणुकीसंबंधी जे हुकूम ाहेत त्यावरून दिसून येतें

" शहराच्या पेठा, पुरे व कसबें येथील किरकोळ कजिया पेठेचा पेठेचे ामाविसदार यांनीं मनास आणावा; मातबर कजिया असल्यास कोतवालीकड ानास आणून हलकी गुन्हेगारी घेत जाणें. रस्त्याचा व गल्लीचा व घराचा कजिया ागेल त्याचा इनसाफ तुम्ही ( कोतवालानें ) करावा. " इ. स. १७६७– ६८ वाड ाग ८ पान १२६.

शहरांतील कजिया, भांडण, न्याय, मनसुबी असेल ती तुम्ही मनास आणून ाडशे करणे आणि हरकी गुन्हेगारी साधेल ती घेऊन हिशेबी जमा करणें. सबा सबैन ाया व अलफ.

वरील उल्लेखावरून मोठमोठ्या शहरांतून ज्या ठिकाणी कोतवालासारख्या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यांत येत असे त्या ठिकाणी गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार कोतवालाकडे असे, असे दिसून येते

परगण्याचे ठिकाणी फौजदार या नांवाचा अधिकारी नेमण्यांत येई. कांही गुन्ह्यांचा इनसाफ करण्याचा अधिकार फौजदारास असावा असें वाड भाग २ पान ५१ वरील उल्लेखावरून दिसतें " त्या आदावतीने त्यांणी आमच्या बापावर व आईवर लटके तुफान घेऊन कजबे वाण येथील ठाणियात फौजदाराजवळ जाऊन फिर्याद केली. फौजदारांनी इनसाफ न करिता सवाजी पाटील याचे ऐकून आपले बापास व आईस जीवें मारिले."

वाक्पारुष्य, दण्डपारुष्य इत्यादि व्यवहारांचा निर्णय करण्याचा अधिकार मराठी रियासतीत कोणत्या संस्थांकडे होता याविषयी वर नमूद केलेली माहिती दिली आहे. आतां आजच्या विषयाच्या चौथे भागाचे विवेचनाकडे वळतों.

## खून

प्रस्तुत खुनाचा गुन्हा करणारास फाशी अगर जन्मठेप, ( काळ्यापाण्याची शिक्षा ) इंडियन पीनल कोडनें सांगितली आहे. मराठी रियासतीत ठार मारण्याची शिक्षा खून करणारास क्वचित च देण्यात येत असे, असें उपलब्ध झालेल्या माहितीवरून अनुमान निघते. खून करणारास कैदेची शिक्षा करण्यांत येई. परंतु खून करणारानें ज्याचा खून केला असेल त्याचे आप्तास खुनाबद्दल द्रव्य व सरकार-दंड दिल्यास खून करणाऱ्या इसमाची सुटका करण्यात येई. खुनाबद्दल मयताचे नातेवाईकास द्यावयाचे रकमेचे प्रमाण ज्या इसमाचा खून झाला असेल त्या इसमाची जात, दर्जा इत्यादि गोष्टींवर अवलंबून असे. गुन्हा करणारा इसम वतनदार असल्यास त्याचें वतन जप्त करण्यांत येऊन वतनाचे उत्पन्न सरकार-जमा करण्यांत येई. आता ही जी विधानें मी केली ती, ज्या उदाहरणावरून स्पष्ट होतील अशी काही उदाहरणें येथें नमूद करितो.

लमाण जातीचे दोन इसमामध्यें जातीविषयी दावा होता. उभयता दावेकरी लोकात युद्ध सुरू झालें. लमाणाच्या तांड्यात सरकारचा सर कारकून मारला गेला. ज्या इसमाच्या हातून कारकून मारला गेला त्यास साताऱ्याच्या किल्ल्यावर अटकेत ठेवण्यांत आलें. पुढें लमाणानें गुन्हेगारीबद्दल रुपये १५००० देण्याचें कबूल केल्यावरून लमाणास मुक्त करण्यात आलें. इ. स. १७४०-४१ वाड भाग १ पान १८४.

गुन्हेगारीची एवढी मोठी रक्कम गुन्हा करणाऱ्या इसमाकडून घेतल्याचें क्वचित च आढळतें. ठार मारला गेलेला इसम सरकारी कारकुन असल्यानें गुन्हेगारीएवढी मोठी रक्कम वसूल करण्यांत आली असावी, असे दिसतें.

मोकदम मौजे परवारे प्रो गाडापूर यानें हरबाजी कोनेरे कुळकर्णी याचा चुलत भाऊ बचाजी शामराज व त्याचा पुत्र असे दोघांस दरोडा घालून जिवें मारिले व त्यांची मालमबेर्शी नेली. मनसुबीकरितां खून केल्याचे व मालमबेशी नेल्याचे शाबीत झाले. खुनाचे व मालमबेशीचे ऐवजी निम्मे पाटीलकी वडिलपण पाटील मजकुरांनी हरबाजी कोनेरे यास देऊन यजीतखत करून दिले. खून अगर दरोड्याबद्दल पाटलास कोणत्या हि प्रकारची शिक्षा देण्यांत आली नाही असे या उदाहरणावरून स्पष्ट दिसते इ.स १७४६–४७ वाड भाग २ पान ४१. खुनाचा गुन्हा करणारा इसम वतनदार असल्यास व त्यानें गुन्हा केल्याचें शाबीत झाल्यास ज्या इसमाचा खून झाला असेल त्याचे आप्तास वतनापैकी कांही भाग खुनाचा मोबदला म्हणून देऊन खून करणाराने आपली सुटका करून घेतल्याचीं अनेक उदाहरणें आढळण्यात येतात

ब्राह्मणाचा खून झाल्यास खून करणाऱ्या इसमास जबर शिक्षा करण्यांत येऊन ज्याचा खून झाला असेल त्याचे आप्तास इनाम वगैरे देण्यांत येत असे. ओंकारभट व रणसोडभट व्यास औदिच्य ब्राह्मण मौजे पचेड प्रो रतलाम यांचा भाऊ नारायण भट व्यास याची बेअब्रू करून लालसिंग रजपुतानें त्यास जिवे मारिले. ओंकारभट व रणसोडभट रजपुताचे पारिपत्य व्हावें म्हणून हुजूर कळविलें रजपुतास देशाबाहेर काढून टाकण्याचा आणि त्याचे मालकीचा बारा जहागिर गांव जप्त करण्यात येऊन ब्राह्मणास जमीन चावर एक आणि घरास जागा इनाम देण्याचा हुकूम करण्यांत आला इ. स. १७५३–५४ वाड भाग ५ पान ४८.

मोरशेट वाड वाडकावाणी वस्ती पेठ सोमवार यांनी आपले बायकोस ठार मारिलें, ही गोष्ट शाबीत झाली. तेव्हां त्यांनी अर्ज केला कीं, सरकारची गुन्हेगारी २५०० अडीच हजार घेऊन मला मुक्त करण्यात यावें. गुन्हेगारी घेऊन मोरशेटजीस मुक्त करण्यांत आलें इ.स. १७५४–५५ वाड भाग २ पान ५०.

भगवान कुणबी वस्ती अमदाबाद याचे शेजारी वेणीदास याचेकडून तक्षीर घडली. सबब पळून गेला, सबब भगवानास धरून घेऊन १००० रुपये गुन्हेगारी अंमलदारानें घेतली. भगवान कुणब्याचे आईनें रुपयाकरितां जीव दिला. त्यानंतर वेणीदास हजर झाला. तेव्हां त्याचेकडून गुन्हेगारी रुपये २७०० शिरस्ता गुजराथ प्रांतीचा आहे, त्याप्रमाणें देऊन निकाल करणें. त्यापैकी चौथाई सरकारची घेऊन हुजूर पाठवून देणें बाकी तीन तक्षीमा नफर मजकुरास देणें. याप्रमाणें हुकूम फर्माविण्यांत आला. खुनाचे गुन्ह्याबद्दल रुपये २७०० मयताचे आप्तास देण्याचा गुजराथ प्रांतांत शिरस्ता होता असें या उल्लेखावरून स्पष्ट होतें. हा उल्लेख फार महत्वाचा आहे. इ. स. १७५५–५६ वाड भाग २ पान ५०.

मल्हार गोपाळ व लक्ष्मण गोपाळ कुळकर्णी कसबे राहुरी यांनीं बापुजी बीन आवजी नाईक जपे यांचा पुत्र मुगरी निरपराधी जीवे मारिला सबब कसबे मजकूरचे दरोबस्त कुळकर्णी जप्त करण्यांत आले. पुढे या बाबतीत ज्यानें ब्रह्महत्या केली त्याचा अन्याय, सबब त्याची तक्षीम जप्त करणे, वरकड भावाचें वतन सुदामत चालू देणे असा हुकूम करण्यात आला. ज्याने गुन्हा केला असेल त्याचा च वतनांतील हिस्सा जप्तीस पात्र समजला जात असे ही बाब या उदाहरणावरून स्पष्ट होते इ. स १७६०-६१ वाड भाग २ पान ६३.

खुनाचे कामी कोण कोण लोक सामील होते हे माहीत असून त्याबद्दलची माहिती सरकारी अधिकाऱ्यास न दिल्यास त्या इसमाकडून गुन्हेगारी घेत असत. त्याचप्रमाणे खुनांत सामील असणाऱ्या इसमाकडून गुन्हेगारी घेण्यांत येई. वाड भाग ७ पोट भाग २ पान १९७

रंगभट ढेकणे राहणार पुणे त्याची सून ठमा नाहीशी झाली, शोध करितां सांपडत नाही त्याजवरून तिने प्राणत्याग केला असे दिसते त्यास तिची क्रिया होऊन पुढे आमचे घरी मागल्यादि कार्ये झाली पाहिजेत. एविषयीची आज्ञा करावी म्हणून रंगभट याने हुजूर विदीत केले. त्यावरून तिने आपला प्राणत्याग करून आत्मघात केला त्याचे शास्त्रतः प्रायश्चित्त तुम्हाकडून करवून ब्रह्मदंड हि घेऊन तुम्हास शुद्ध केले असे तरी पूर्ववत प्रमाणे ब्राह्मणाची कर्मे आचरून सुखरूप राहणे. तुम्हाकडे राजदंड रुपये १०० करार केले असे. वाड भाग ७ पोट भाग २ पान १९७

प्रवरा संगमनेरकर ब्राह्मणांनी ब्रह्महत्त्या केली असतां ज्यांनी ब्राह्मण मारला त्यांची नावनिशी न सागता सर्वांनी मारला म्हणून सांगत असत. त्यावरून सर्व ब्राह्मणांस वाळीत घातले. हल्ली ज्यानी ब्राह्मण मारला त्यांची नांवनिशी ब्राह्मण सांगतात. ज्यांनी ब्राह्मण मारला त्यांपैकी जे बंदीखान्यांत असतील त्यांस तसे च असो देणें. जे पळून गेले असतील त्यांचा शोध करून बंदीखानी ठेवणें. बाकी राहिलेल्या ब्राह्मणास ब्रह्महत्येचा गुंता नाही त्यांस प्रायश्चित्त देऊन मुक्त करणें. वाड भाग ७ पोटभाग २ पान २००.

ब्राह्मणानी सोनाराचा पोरगा जीवे मारला सबब त्यांचे पायांत बेड्या घालून त्यांस अटकेंत ठेवावयास पाठविले आहे. वाड भाग ७ पोट भाग २ पान २००

पेठ भातखळे येथील चुडामण व परशराम या नावांच्या दोघा परदेशी ब्राह्मणांनी अजबसिंग या नांवाच्या परदेशास जारकर्म करीत असता जीवे मारिलें म्हणून त्यास अटकेत ठेवण्यांत आलं आहे सदरहू ब्राह्मणापासून गुन्हेगारी घेऊन तेथील ब्राह्मण तीर्थ नेमून देतील त्या तीर्थास जाऊन यावे असा जामीन घेऊन

ब्राह्मणास सोडून देण्याचा हुकूम करण्यांत आला. ब्राह्मणानें खून केला असल्यास त्यास सोडण्यापूर्वी त्याचेकडून प्रायश्चित्तादिक करून मग त्यास सोडण्यांत येई, असे वाड भाग ७ पोट भाग २ पान २२७ वरून दिसून येते.

एखाद्यावर खून केल्याचा आरोप करून तो आरोप शाबीत होत नाही असें ठरल्यास फिर्याद करणाऱ्यापासून हरकी घेण्यात येत असे. वाड भाग २ पान ४८.

खुनाचा गुन्हा करणारास ठार मारण्याची शिक्षा क्वचित् प्रसंगी देण्यांत येत असे, असें दोन ठिकाणी आढळलेल्या उदाहरणांवरून दिसून येतें. वाड भाग ८ पान ८३ व ८७. भाग ८ पान ८३ वरील उल्लेखः—दोन असामी यांनी ज्या गावी खून केला त्या गांवी हारदूजणास नेऊन छाटून टाकिले. इ. स. १७७५–७६. भाग ८ पान ८७ वरील उल्लेखः—कृष्णाजी उतरेकर याने एका शिंप्याच्या दोन कुणबि-णीचा खून केला. या इसमास तोफेच्या तोंडी देण्याचा हुकूम देण्यांत आला.

तीसगांव येथील रामाजी येल्हो या ब्राह्मणाचा खून तेरा इसमांनी केला. या तेरा इसमांपैकी ८ असामी ब्राह्मण होते त्यास अटकेत ठेवण्याचा हुकूम झाला. पुढे ८ इसमांनी १०००१ रुपये गुन्हेगारी देण्याचे कबूल केले त्यावरून त्या इस-मांस सोडून देण्याचा हुकूम करण्यात आला. ह्या १०००१ रुपयांपैकी पंधराशें रुपये रामाजी येल्हो याचे मुलांस खुनाबद्दल देण्यात आले. रुपये ८५०१ सरकारचे खंडाबद्दल सरकारांत घेण्यांत आले. शिवाय या आठ इसमांकडून जामीन घेण्यांत येऊन त्यास त्यांचे कुटुंबासुद्धा जातीबाहेर ठेवण्याविषयी हुकूम करण्यांत आला.

मौजे पारगांव तर्फ चांभार–गोंदे परगणा कडेवळीत व घागरगांव परगणे कर्डे–रांजणगांव येथील दोन्ही गांवची मुलें रानांत गुरें चारीत असतां दोन फौजा करून घागरगांवकर मोंगल आणि पारगावकर मराठे ऐसे होऊन पांच रोज भांडत होते. त्या खेळांत पारगांवकर मुलांनी ३ घागरगावकर मुलांस पिटून काढले. तेव्हां पळतांना घागर-गांव येथील न्हाव्याच्या मुलाचे तोंडघशी पडून कपाळ फुटलें, व तो पुढे पधरा वीस दिवसांनी मयत झाला. हजामाचे पोराचे आईनें अहमदनगरास फिर्याद केली. काजी-शरायानें इनसाफ केला की, मुलांचा कज्या आहे त्यात खुनाचा दावा पोंचत नाही. खून माफ. काजीनें केलेल्या निकालावर शाहू छत्रपतीकडे न्हाविणीनें फिर्याद केली. काजीनें दिलेला निकाल कायम करण्यांत आला. हा निकाल इ. स. १७३५–३६ सालचा आहे. इंग्रजीत ज्यास Mensrea म्हणजे खून करण्याचा इरादा म्हणतात त्याचा अभाव असल्याकारणानें खुनाचा दावा लागूं होत नाही. असा काजीनें ठराव केला तो योग्य च होय.

ब्राह्मण गुन्हेगार असल्यास गुन्हेगारी घेऊन त्यास सोडतेवेळी त्याचेकडून जामीन घेणे, त्यास वाळीत ठेवणें अगर त्याचेकडून प्रायश्चित्त करविणे वगैरे गोष्टी सरकारचे हुकुमावरून करण्यांत येत असत, असें वरील उदाहरणावरून दिसतें.

खुनाचे गुन्ह्यासंबंधीं ज्या विशिष्ट बाबी दृष्टोत्पत्तीस आल्या त्या दर्शविणारी निरनिराळी उदाहरणें आपणास सांगितली. ब्रह्महत्या ही पंचमहापातकांपैकीं एक महापातक असून त्यास सर्वस्व हरण करणे, देशांतून घालवून देणें, अगर ठार मारणें हा दंड मनुस्मृतीत सांगितला आहे. मनुस्मृतीच्या वचनाचे दृष्टीनें विचार करता वरील उदाहरणात या गुन्ह्यास ज्या प्रकारचा दंड केलेला आढळतो त्यापेक्षां अधिक कडक दंड व्हावयास पाहिजे होता. परंतु, तसा प्रकार आपणास वरील उदाहरणांवरून आढळून येत नाही. स्मृतीतील तत्त्वास सोडून मराठी रियासतीत या गुन्ह्याचे बाबतीत जी व्यवस्था–पद्धति अस्तित्वात आली ती कोणत्या कारणामुळे आली हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. या गुन्ह्यांच्या बाबतीत महंमदी शास्त्राचें धोरण कोणत्या स्वरूपाचें होतें हें लक्षात घेतले असतां या प्रश्नाचा उलगडा सहज होतो.

खुनाचा गुन्हा झाला असल्यास ज्याचा खून झाला असेल त्याचे आप्तेष्टांस नुकसानीबद्दल द्रव्य देऊन खून करणाराची मुक्तता करून घेण्याचा मार्ग कुराणास संमत आहे. मुसलमानी रियासतीत ह्या तत्वास अनुसरून खुनाबद्दल द्रव्य घेण्याचा जो प्रघात सुरू झाला तो प्रघात पुढें मराठी रियासतीत हि कायम राहिला असावा असे दिसते.

सेलचे कोराण अध्याय २ पान १९ मध्ये खालील वाक्यें आहेत.

"O true behavers, the law of retaliation is ordained you for the slain. The free shall die for the free, and the servant for the servant and a woman for a woman; but he whom his brother shall forgive may be prosecuted and obliged to make satisfaction according to what is just and a fine shall be set on him with humanity. This is indulgence from your Lord, and mercy And he who shall transgress after this by killing the murderer shall suffer a grievous punishment"

ह्यावर त्या च पानात खालीलप्रमाणें टीप दिली आहे.

"This is the common practice in Mahomedan countries particularly in Persia where the relations of the deceased may take their choice either to have the murderer put in their hands to be put to death or to accept a pecuniary satisfaction.'

खून करणारास ठार मारण्याचे ऐवजी त्याचेकडून गुन्हेगारी घेऊन त्यास सोडून देण्याचा सर्वसाधारण प्रघात अस्तित्वांत असल्याचें जे वरील उदाहरणावरून दिसतें त्याची उपपत्ति वरील उताऱ्यावरून नीट लागते हें उघड आहे.

## दुखापत

मनुष्याचे शरिरास हरप्रकारच्या दुखापतीचे गुन्ह्याचे बाबतींत दुखापत करणारे इसमास कैदेंत ठेवण्यांत येई. दुखापत करणारा इसम वतनदार असल्यास त्याचें वतन जप्त करण्यांत येत असे. दुखापत करणाराकडून ज्यास दुखापत झाली असेल त्यास द्रव्याचा मोबदला देण्यांत येई. हे, वाड भा. २ पान ५६ मध्ये ज्या खटल्याची हकीगत दिली आहे त्यावरून दिसून येतें. शिमग्याचे खेळांत २ पाटील घराण्याचे माणसांत तंटा होऊन ४ माणसे जखमी झाली. दुखापत करणारे इसमास कैदेंत ठेवण्यांत आलें. पुढें दुखापत करणारे इसमांनीं अर्धा चाहूर जमीन दुखापत झालेल्या इसमास दिल्याकारणानें दुखापत करणारे इसमांची मोकळीक करण्यांत आली. इ. स. १७५४–५५.

## फंदफितुरी व राजद्रोह

मराठी रियासतीत फंदफितुरी व राजद्रोह करणाऱ्या लोकांचे बाबतीत कोणत्या प्रकारची व्यवस्था करण्यांत येत असे, याचे विचाराकडे आतां वळूं. फंदफितुरी व राजद्रोहाचे गुन्ह्याचे ४ निरनिराळे प्रकार आढळतात. त्याचे थोडक्यांत दिग्दर्शन करितों. प्र. १ ला—हैदर, निजाम, भोसले, इंग्रज वगैरेबरोबर मराठ्यांचें वितुष्ट येऊन लढाई सुरू होत असे. अशा प्रसंगी मराठ्यांचे राज्यांतील वतनदार लोक अगर नोकर लोक मराठ्यांचे शत्रूकडे नोकर राहिल्यास या लोकांना गुन्हेगार समजले जात असे; व या लोकांची वतनें, सरंजाम, इनाम जमिनी, घरदार वगैरे जप्त करण्यांत येऊन त्याचे उत्पन्न सरकारजमा करण्यांत येई. या स्वरूपाचीं राजद्रोहाच्या गुन्ह्याची उदाहरणें बरी च आढळतात.

प्रकार २ रा–मराठ्यांचे नोकरानी मराठ्यांचे ताब्यांतील किल्ले, ठाणी, शत्रूचे स्वाधीन करण्याचा करार शत्रूबरोबर करणें हा राजद्रोहाचे गुन्ह्याचा २ रा प्रकार आढळतो.

प्रकार ३ रा–मराठी साम्राज्याचे निरनिराळे घटक म्हणजे सातारकर छत्रपती, पेशवे, शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, आंग्रे इत्यादि असत. या घटकांपैकी सातारकर छत्रपती खेरीजकरून दुसऱ्या कोणी हि पेशव्यांविरुद्ध अगर पेशव्यांच्या धोरणाविरुद्ध कारस्थान उभें केल्यास तो हि राजद्रोह समजला जात असे.

प्रकार ४ था–नारायणराव पेशव्यांचे वधानंतर पेशवाईपदाबद्दल तंटा उपस्थित झाला तेव्हां पेशवाईपदावर स्थानापन्न असलेल्या पुरुषाविरुद्ध कारस्थान करणें हा राजद्रोहाचे गुन्ह्याचा एक प्रकार समजत.

आतां, राजद्रोहाच्या गुन्ह्याचे कामीं गुन्हा करणारास कोणत्या प्रकारे दंड करण्यांत येत असे याची कल्पना येण्याकरितां कांहीं उदाहरणे येथें नमूद करितों.

किल्ले पावागड हा दुसऱ्यास देण्याचे बचाजी रघुनाथ यानें राजकारण केलें होतें. त्या कामांत त्यास बरे च लोक सामील होते. बच्याजीस पकडण्याकरितां लोक पाठविण्यांत आले; परंतु तो पळून गेला. तेव्हां बच्याजी यास सामील असलेल्या लोकांची मुलें–माणसे कैद करण्यात आली. या कामी कैद केलेल्या लोकांकडून हजर होण्याविषयी लायक जामीन घेण्यांत येऊन कैद केलेल्या माणसास सोडून देण्यांत आले. मराठ्यांच्या शत्रूस जे सामील होत त्यांच्या मिळकती जप्त करण्यांत येत असत. असे बद्दल वर उल्लेख केला आहे. असल्या प्रकारची बरी च उदाहरणे वाड भाग ७ पोट भाग २ पान १८५ ते १९० मध्ये दिलेली आहेत.

इ. स. १७६४–६५ च्या सुमारास कांही लोकांनी हबशी यांचेकडे राजकारण करून तुळाजी आंग्रे यास जंजिऱ्यास नेण्याचा कट केला. हा कट उघडकीस आला. तेव्हां कटांत सामील असलेल्या लोकांची घरेदारे जप्त करण्यात येऊन मुलेंबाळें अटकेंत ठेवण्यात आली.

दौलताबाद किल्ल्यावरील हवलदार बाळोजी कराले यानें किल्ल्याचा फितूर केला. सबब बाळोजीस तोफेच्या तोंडी देऊन उडविण्याची शिक्षा देण्यात आली संभाजी कराले व जावजी नाईक फितुरांत सामील असलेले लोक यांचा एक एक हात व एक एक पाय तोडून टाकण्याचा हुकूम करण्यांत आला. याखेरीज या गुन्ह्यात ब्राह्मण, शेणवी सामील होते. त्यास बेडी घालून अटकेत ठेवण्याविषयी हुकूम करण्यांत आला. वाड भाग ८ पान ७१.

अवचीतगड तालुक्यापैकी सुरगड किल्ला फितूर करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. तेव्हां हवलदार याचें डोकें मारण्याचा व एलजी पवार व बहिरजी भोपतराव यांचे हातपाय तोडण्याचा हुकूम करण्यांत आला.

सखाराम हरी, बाबूराव हरी, दौलत बाबूराव व महिपत बाबूराव, भास्कर नारायण व मिरजा फागलबेग यांस फितूर करण्याबद्दल अनुक्रमे नगर, सिंहगड, चाकण, त्रिंबक, धोडप आणि नारायणगड या किल्ल्यात प यांत बेड्या घालून कैदेंत ठेवण्यांत आलें. सखाराम हरी हा खेळ्या राजकारणी आहे. कोणचे हि गोष्टीत चुकणार नाहीं याजकरितां एक कोठडी करून त्यांत घालून कुलूप लावीत जाणे असा हुकूम करण्यात आला होता.

वाड भाग ७ पोट भाग २ पान २२२

रामाजी मालिंगा व धर्माजी मालिंगा रतनगड कुरंगच्या फितुरांत होते सबब त्यांजकडे दंड दोन हजार रुपये करार करून फिरून बदफैली करू नये ऐसा जामीन घेऊन सोडण्यांत आले

## चोऱ्या व दरोडे

मराठी रियासतींत चोरी आणि दरवडा ह्या दोन गुन्ह्यांस शिक्षा फार कडक देण्यांत येत असे. दोन्ही प्रकारचे गुन्ह्याचे कामीं गुन्हेगारास अटकेंत ठेवण्याची, ठार मारण्याची, हात, पाय, कान, कापण्याची शिक्षा करण्यांत येत असे. शिवाय चोरीस गेलेला माल गुन्हेगाराकडून मालकास परत देवविण्यांत येत असे. ह्याखेरीज सरकारची गुन्हेगारी हि अपराध करणाराकडून वसूल करण्यांत येत असे. चोरी करणारांस अगर दरवडा घालणारास अटक करण्यात येत असे; एवढे च नाही परंतु, त्याचेपाशी राहणारे त्याचे आप्तास हि अटक करण्यात येत असे. रस्तालुटीचे कामांत गुन्ह्याचा माग अमुक एक गांवापावेतो जाऊन पुढे त्या गावांतील लोकांनी माग काढून न दिल्यास लुटीस गेलेला माल भरपाई करून देण्याची जबाबदारी, ज्या गांवापावेतो माग गेला असेल त्या गांवांतील लोकावर असे. चोरी आणि दरवडा ह्या दोन गुन्ह्यांचे कामी कोणत्या प्रकारची व्यवस्था करण्यांत येत असे याची कल्पना येण्याकरितां ह्या गुन्ह्याची कांही नमुनेदार उदाहरणे येथें नमूद करितों.

शामराव विश्वनाथ सालगुदस्त मोंगलाचे दंग्यासमयी लष्करांत येत होते ते वाटेंत लुटले गेले. त्याचें ठिकाण पाथरेकराकडे लागलें. सबब मशारनिल्हेची वस्तभाव लुटून घेतली होती ती मशारनिल्हेस माघारी देऊन मौजे मजकूराकडे गुन्हेगारी करार केली रुपये ७५०. इ. स. १७५२–५३. वाड भाग २ पान ५८.

मौजे डामरूल प्रगणे अडावद येथील गांवकरी यांनीं अमिर बेग या इसमाची चाळीस घोडी लुटली. सदरहू घोड्यांपैकीं पाच चांगलीं घोडीं सरकारपागेंत जमा करून बाकीची घोडी इसम मजकूर यास परत देणे. इ. स. १७५२-५३, वाड भाग २ पान ५८.

लालनाईक वंजारी बैलाचा तांडा घेऊन येत असता डोंगर वसवा व बावल्या वसवा भूमी याणी जोरावरीनें रुपये ४००० वजाऱ्याकडून घेतले. सदरहू रकमेपैकी चौथाई सरकारांत घेऊन बाकी रकम इसम मजकुरास देण्याचा हुकूम करण्यांत आला. इ. स. १७५३–५४, वाड भाग २ पान ५९.

बाजी सोनार यानें चोरी केली सबब कैद करून बायकोसुद्धां तुम्हाकडे किल्ल्यास अटकेंत पाठविला आहे. तरी किल्ले मजकुरी अटकेस ठेवून पोटास शेर दररोज देत जाणे. इ. स. १७६६–६७, वाड भाग ७ पोट भाग २ पान २०४.

जिवाजी दामोदर कुळकर्णी मौजे देवळाली याचे घरावर दरवडा पडला त्याचा माग कसबे तीसगांव पावेतो गेला. पुढें माग रात्र जाहली म्हणोन चालला नाहीं. जिवाजी दामोदर याची वस्तभाव, चिरगुटपाघरूण, भांडे याची किंमत

शपथपुरस्कर लेहून घेतली. रु. ८५७२ तीसगांवकरापासून जिवाजी दामोदर यास देण्याचा ठराव केला. इ. स १७६७-६८, वाड भाग ७ पोट भाग २ पान २०५.

पुला वल्लद तुळा राऊत माग वस्ती मौजे रावणगांव हा मुलामाणसांसुद्धां येऊन मौजे आरुणगाव येथे लष्करानजीक राहून चोऱ्या करीत होता. तो सांपडला. त्याचे घरचे आसामी आठ कैद करून आणले. त्यास किल्ले अहमदनगर येथे अटकेस ठेवणे. इ. स. १७७१-७२, वाड भाग ७ पोट भाग २ पान २०६

गावज्या भिल वस्ती मौजे कसाबखेड याने डोंगर इटाचे भिलासी मिळोन परगणे मजकुरी गावगन्ना दंगा करून लुटलें. सबब गावज्यास ठार मारून टाकण्याचा हुकूम करण्यात आला. सीत सब मया व अलफ ( वाड भाग ८ पान ९१ ).

गळी गुजर वस्ती बारामती याचे घरचे चाकरानी भाईचद गुजर याचे घरीं चोरी केली. तीन असामी वरतवानी सुद्धां सापडले. तरी सदरहू तीन असामीचा एक एक हात तोडुन सोडुन देणे. इहिदे समानीन मया व अलफ. ( वाड भाग ८ पान ९५ ).

सित समीनान मया व अलफ ह्या सालांत कोकणप्रांती चोरट्यानीं चोऱ्या करण्याचा फार मुळमुळाट चालविला. तेव्हा ५८ चोरास धरून आणून त्यांची चौकशी करून त्याचे अपराध हुजूर लिहून पाठविण्यात आले. ह्या एकंदर ५८ चोरांपैकी २० चोरांची डोकी मारावयाचा, तेरा असामीचा उजवा हात व डावा पाय, अठरा असामीचा उजवा हात, चार असामीचा उजवा हात व एक कान; एक असामीचा उजवा हात व पाय व एकाचा कान कापण्याचा हुकूम करण्यांत आला. ह्या अठ्ठावन्न चोराचे पुढाऱ्यास विशोभित करून फिरवून मेक देऊन मरावा असा हुकूम सोडण्यांत आला. सीत समानीन मया व अलफ, वाड भाग ८ पान ९६.

चोरी आणि दरवड्याचे गुन्हे करणारे लोकांचा तपास लागावा म्हणून हे गुन्हे करणारे लोकांबद्धल माहिती देणारास सरकारकडून बक्षीस देण्यांत येत असे. ही गोष्ट वाड भाग ८ पान ९५ वरील उल्लेखावरून दिसून येते.

लोकांत दरारा बसून चोरी व दरवड्यासारखे गुन्हे करण्यास लोकांनीं प्रवृत्त होऊं नये ह्या हेतूनें ठार मारणें, हातपाय तोडणे वगैरे कडक शिक्षा त्या काळी देण्यांत येत असाव्यात असे दिसतें. चोरी अगर दरोडा हे गुन्हे करणाराचे आप्तांस अटकेंत ठेवण्याची पद्धति जरा चमत्कारिक दिसते. ज्या जातीचे लोक असल्या प्रकारचे गुन्हे करीत त्यांचा धंदा चोरी करून कुटुंबांतील सर्वत्रांची उपजीविका करण्याचा असल्या कारणानें व चोरीत ते सामील असल्याकारणानें मुख्य गुन्हा करणाराप्रमाणें च त्याचे कुटुंबांतील आप्तांस हि गुन्ह्याबद्धल जबाबदार धरण्यांत येत

असावे असं दिसतें. मनुस्मृतीमध्ये चोरीचा गुन्हा करणारास ठार मारणें, हात अगर पाय तोडणे असल्या प्रकारच्या च कडक शिक्षा सांगितल्या आहेत. ह्या गुन्ह्याचे बाबतींत स्मृतिकारांचे धोरणास अनुसरून च मराठी रियासतींत व्यवस्था होत असे असें दिसतें.

## चोरीचा माल घेणें

चोरीचा माल घेणाराची मिळकत जप्त करण्याचा अगर त्याचेकडून गुन्हेगारी घेण्याचा प्रघात होता. हा गुन्हा करणारास अटक करण्यांत आल्याचे आढळून येत नाही.

अबदुल रहमान जमादार यानें चोरीचे दागिने विकत घेतले असा त्यावर आरोप आला. सबब त्याचे घर व त्यांतील माल कसबे जुन्नर येथील जप्त करण्यात आले. पुढे जमादारानें हुजूर अर्ज केला, त्याजवरून हुजूरकडून चौकशी होऊन जमादार मजकूर याने एकशे वीस रुपयाचे दागिने चोरास दाखवून घेतले, चोरीचे असे नाही, सबब जप्ती केली ती मोकळी करणे, असा हुजूरने हुकूम केला. वस्तभाव, घर व कागदपत्र जप्त केलेले अबदुल रहमान याचे हवाली करण्यांत आले. त्याचप्रमाणे अबदुल रहमान याचेकडून जामीन घेतला तो जामीनकतबा त्यास माघारा देण्यांत आला. इसन्ने समानीन मया व अलफ वाड भाग ८ पान १०१ चोरीचा माल घेण्याचा गुन्हा केल्याचा ज्याचेवर आरोप असेल त्याचेकडून जामीन घेण्यांत येत असे, ही गोष्ट ह्या उदाहरणावरून दिसून येते.

वाड भाग २ पान ६० मध्ये चोरीचा माल घेण्याबद्दलच्या गुन्ह्याचें एक उदाहरण आहे.

बऱ्हाणपूरच्या चतुर्भुज या नांवाचे सावकारानें कृष्णराव महादेव याच्या बटकी ३ व पोरगा १ एकूण चार पळून गेलेल्या असामीस आपले घरी लपवून ठेविले, पुढे सावकाराचे अंगी मुद्दा लागला, तेव्हां सावकारानें चार असामीस कृष्णराव महादेव याचे हवाली केलें व सरकारांत गुन्हेगारी रुपये ९६० घेण्यांत आली.

## खोटी साक्ष

ह्या गुन्ह्यांची उदाहरणे फार च थोडी आढळण्यांत येतात. जें एक उदाहरण आढळण्यात आले त्यांत खोटे बोलणारे इसमाकडून गुन्हेगारी रुपये १००० एक हजार घेतल्याचा उल्लेख आहे.

## खोटी फिर्याद

ह्या गुन्ह्याचे कामी गुन्हा करणारे इसमाकडून गुन्हेगारी घेण्याचा प्रघात होता.

विठोजी जिनगर कसबें सासवड याने गोविंदजी जगन्नाथ देशमूख याचेवर चोरीचें तुफान घेतलें. विठोजी खोटा ठरला सबब त्याचेकडून गुन्हेगारी रुपये ७५ घेण्यांत आले. इ. स १७२१-२२ वाड भाग २ पान ६१. ह्या गुन्ह्याची जी दुसरी उदाहरणें सांपडतात त्यात हि गुन्हेगारी घेतल्याचा उल्लेख आहे; अटक अगर दुसरी शिक्षा केल्याचा उल्लेख नाही.

## बनावट दस्तऐवज

ह्या गुन्ह्याची उदाहरणें अगदी थोडी आढळण्यांत आली, वाड भाग २ पान ६३, ६४. कुळकर्ण व मीठबंदरचे पथकीपणाबद्दल बाळाजी खंडो व केशव वर्तक यांचेमधें वाद सुरू जाहला केशव वर्तक याने त्याच्या वतनावर हक्क स्थापित करण्याकरितां बनावट कागद तयार केले. वर्तकाने खोटे कागद केल्याचे शाबीत झालें तेव्हां वर्तकानें बाळाजी खंडोस यजितपत्र लिहून दिलें. हें यजितपत्र व दुसरे कागद बाळाजी खंडोने सरकारात हजर केले, परतु गमावले. वर्तकास यजितपत्रा-विषयी तगादा केला. त्याने धटाई करून यजितखत लिहून देण्याचे नाकारलें; सबब त्यास गंगापार करण्याचा हुकूम करण्यांत येऊन बाळाजी खडोचें कुळकर्ण व मीठबंदरचें पथकीपण ठरविण्यांत आले.

पाटील वतनाबद्दल कजिया होता त्या कामी कुळकर्ण्याने पाटलास जसे कागद पाहिजे होते तसे करून दिले सबब कुळकर्ण्याचें वतन जप्त करण्यात आलें. पुढे कुळकर्ण्यांनें बदराहा वर्तन करणार नाही असा करार करून जामीन देण्याचे कबूल केलें, त्यावरून त्याचे वतनावरील जप्ती दूर करण्यात आली.

वाड भाग ८ पान १०२ वर आणखी दोन उदाहरणे दिली आहेत. कृष्णाजी सदाशिव या नावाचे इसमाने भगवंत बहिरव थत्ते याचे नावचे खोटी हुंडी लिहिली. पुढें थत्ते यांनी हुंडी खोटी, त्याचे दुकानची नाही, असे सांगितलें. तेव्हां शोध करता कृष्णाजी सदाशिव याने खोटी हुडी लिहिल्याचे शाबीत झाले. कृष्णाजी सदाशिव याचेपासून गुन्हेगारी घेण्याचा हुकूम करण्यांत आला.

चितो हरी यानें साधकाची खोटी पत्रे लोकास करून दिली सबब त्यास किल्ले सिंहगड येथें अटकेत ठेवण्यांत आले

बनावट दस्तऐवज करणारास म्हणण्यासारखी कडक शिक्षा देण्यांत येत नसे असें वरील उदाहरणावरून दिसून येतें.

## खोटें नाणें

खोटा नाणी पाडण्याच्या गुन्ह्याची उदाहरणें फार थोडी असून ती वाड भाग २ पान ६५-६६ मध्यें नमूद केलीं आहेत. हा गुन्हा करणारास देहदंड केल्याचें आढळत नाही. हा गुन्हा करणारे एका इसमापासून गुन्हेगारी रुपये २०० घेण्यांत आली; दुसऱ्या इसमाचे घर सरकारजमा करण्यांत आलें.

## गुलामास फूस लावून नेणें

गुलामास फुसलावून नेणे ह्या गुन्ह्याची उदाहरणें फार थोडीं असून ती वाड भाग १ पान ६० व भाग ७ पोट भाग २ पान २१३ वर आहेत. एका उदाहरणांत कृणबिणीचे किंमतीएवढी गुन्हेगारीची रकम घेण्याचा हुकूम करण्यात आला दुसऱ्या उदाहरणांत हा गुन्हा करणारास अटकेत ठेवण्यात आल्याचे व त्यानंतर त्याचेकडून गुन्हेगारी व जामीन घेऊन सोडून दिल्याचे दिसते.

## एक नवरा जिवंत असतां दुसरा करणें

भिऊबाई या नांवाचे बाईने आपले मुलीचे दोन वेळा लग्न केले. सबब, तिजला; ज्या मुलीचे दोन वेळा लग्न करण्यात आले तिजला व मुलाला अटकेंत ठेवण्यात आले. वाड भाग २ पान ६९ निंबाजी झगडा याने धोंडजी माळी याचे बायकोशी पाट लावला. धोंडजी विदेशास गेला म्हणून बापुजीने आपले रजाबंदीने निंबाजीस लेक दिली. निंबाजीनें धोंडजी मजकूर जिवंत आहे की नाही याचा तपास न करिता पाट लावला. धोंडजी पुढें हजर झाला, सबब निंबाजी माळी याचेपासून गुन्हेगारी रुपये ८० घेण्यात आली.

## जबरीनें लग्न लावणें

ह्या गुन्ह्याची बरी च उदाहरणे वाड भाग ७ पोट भाग २ व भाग ८ मध्ये अनुक्रमें पान १०३ व २०७ वर दिली आहेत. ह्या प्रकारचे गुन्हे करणाराचे घर, दार, इनाम जमिन व वतन असल्यास वतन जप्त करण्यात येत असे. त्याचप्रमाणे हा गुन्हा करणारावर बहिष्कार हि घालण्यात येत असे. जबरीने लग्न करण्यांत जे लोक सामील असतील त्यास हि बहिष्कार घालण्यात येत असे. याशिवाय जबरदस्तीने लग्न लावणाराकडून जबरदस्त गुन्हेगारी हि वसूल करण्यात येई लग्न जबरदस्तीने करून अविधि झालयास त्या मुलीचे फिरून लग्न करून देण्यात येई.

ह्या गुन्ह्याची जी उदाहरणे आढळतात त्यांपैकी काही मनोरंजक आहेत लग्नाचे कामीं कोणत्या कुप्त्या व लबाड्या व प्रसंग पडल्यास मारहाण करीत हें ह्यावरून दिसून येतें. ह्या उदाहरणापैकी बरी च उदाहरणे ब्राह्मणज्ञातींपैकी आहेत.

## बदकर्म

हा गुन्हा करणारास क्वचित् प्रसंगीं फार कडक शासन केल्याचें आढळण्यांत येतें. गुन्हा करणारास अटक, गुन्हेगारी ह्या शिक्षा सामान्यपणे करण्यात येत असत गुन्हा करणाराचे जातीवर हि शिक्षेचा कमी अधिकपणा अवलंबून असे. बदकर्म केल्याचे आरोपावरून अटकेंत असलेल्या बायकास बटिक म्हणून विकण्याचा प्रघात असावा, असें वाड भाग २ पान ६७ वरील उल्लेखावरून दिसते. देवजी पराता कोळी रांडकी इजवर तुफान बदअमलाचें ठेऊन किल्ले मजकुरी आणली आहे, म्हणून ति

गोताने हुजूर येऊन अर्ज केला कीं, **गोताचें लेंकरूं बटिकपणांत न घालावें.** त्यावरून गरत बायकोवर नजर देऊन तिजकडे गुन्हेगारी रुपये ५० करार केले असे. ह्या गुन्ह्याचा काही महत्वाची उदाहरणे येथ नमूद करितो.

वाड भाग २ पान ६८, इ. स. १७५९–६०—अंदाई पाटलीण मौजे वडगांव इने झगडपुरी गोसावी याचे पाशीं बदकर्म केले. उभयतांपासून गुन्हेगारी रुपये ७००० सात हजार यमाजी शिवदेव याचे मार्फतीने घेण्याचा करार करून उभयतांस अभय-पत्र देण्यात आले

वाड भाग २ पान २१०, इ. स. १७७१–७२. मई देशमुखीण चिकोडीकर हिनें मद्यपान करून बाळाजी हरी जोगळेकर याशी बदकर्म केले. सबब उभयतांस अटकेंत ठेवण्यांत आले

रुकमी जातीमात्र ब्राह्मण स्त्री, हिला शूद्र व ब्राह्मण याशीं व्यभिचार घडोन भोजनादि शूद्राशी व्यवहार घडला. सबब अटकेंत ठेवण्याचा हुकूम झाला.

ब्राह्मण स्त्रीचा नवरा मृत्यु पावल्यानंतर तिचे क्षौर करण्यांत आले. पुढें तिनें केश राखून हातांत बांगडया घालून एका गोळकापाशी बायको म्हणून राहिली. पुढें तीस पुत्र जाहला तो सात आठ वर्षांचा तिजसमागमें आहे. "त्यास त्याप्रमाणें अप-राधी आहे सबब पोरगा समेत दोघा जणास किल्ले पुरंदरी अटकेंत ठेवावयास पाठविली आहेत.

वाड भाग ८ पान १००

तान्या देवळ्या कुणबी राहणार मौजे अडूर याने फिरस्ती महाराणी बरोबर बदकर्म केलें सबब त्यास अटकेंत ठेवण्यात येऊन त्याचे घरदार व वस्तवानी जप्त करण्यांत आली.

वाड भाग १ पान १९२ वर बदकर्माचा गुन्हा केल्याचें जे उदाहरण आहे ते लक्षांत ठेवण्यासारखे आहे

महिमानगड किल्ल्याचा गडकरी मल्हारजी कुसाप्पा याने बदकर्म केलें सबब त्यास भांड्याचे तोंडी देऊन उडविण्याचा अगर कडेलोट करण्याचा हुकूम देण्यांत आला. इ. स १७४४।४५.

वाड भाग ८ पान १०८ मध्यें बदकर्म करणाऱ्या बायकोचें नाक कापून तिला सोडून देण्याचा हुकूम केल्याचें उदाहरण आहे.

बदकर्म फिरून करणार नाही अशा प्रकारचा जामीन, गुन्हा जिचेकडून घडला असेल तिचेकडून घेत, असे या च पानावरील दुसऱ्या उदाहरणांवरून दिसून येतें.

## भूमिगत द्रव्य

भूमीत पुरलेले द्रव्य काढणे हा गुन्हा करणारास गुन्हेगारीची शिक्षा करण्यांत येत असे. भूमिगत द्रव्य अमुक एका ठिकाणी आहे असे एखाद्यास माहीत असल्यास तें द्रव्य काढून आणण्याची प्रथम सरकारकडून परवानगी घ्यावी लागत असे. हे ठेवणे त्यास सापडले नाही, परंतु सरकारचे आज्ञेशिवाय हें ठेवणे आणावयास गेलें, सबब गुन्हेगारी रुपये ६०० साहाशे याजकडे करार केली अशा प्रकारचा दंड केल्याचें वाड भाग ८ पान ११० वरील उल्लेखावरून दिसते. या च पानावर, मुल्हेर किल्ल्यांतील एका हवेलीत पुरलेले द्रव्य दाखवून देऊन जें सापडेल त्यांपैकी निम्मे त्यांस मिळावें असेविषयी एका इसमानें सरकारकडे अर्ज केल्याचा व त्याचा अर्ज मंजूर केल्याचा उल्लेख आहे त्यावरून हि पुरलेले द्रव्य बाहेर काढण्याकरिता सरकारची परवानगी लागत असे व सरकार ती परवानगी देई असे दिसून येतें.

## खोटा वेष घेऊन फसविणें

ह्या गुन्ह्याचें एक च उदाहरण वाड भाग ७ मध्यें पान २०७ वर दिले आहे. रघोजी थोरात हा आपलें नाव जनकोजी शिंदे म्हणोन सागत असे त्यास दुसरा एक इसम सामील होता. ह्या उभयतांस कैदेत टाकण्यांत आले. पुढें ह्या दोघां इसमांनी गुन्हेगारी रुपये तीन हजार दिल्यामुळे त्यांस कैदेतुन मुक्त करण्यात आलें.

## गोवध

मराठी रियासतींत गोवध हा गुन्हा समजला जात होता व हें उचित च होतें. कसबांनीं गोवध केला सबब त्यांस अटकेंत ठेवण्याचा हुकूम करण्यांत आला. ( वाड भाग ७ पेंट भाग २ पान २१३ ).

कसबे खेड येथील महारांनी गोवध केला व गुरें मारली. सबब महाराचे हाडोळ्याची जमीन जप्त करून उत्पन्न सरकारहिशेबी जमा करण्याविषयी हुकूम करण्यांत आला. वाड भाग ८ पान ११६.

मांगांनी गाय चोरून नेऊन मारली. त्याचे घरांत मुद्दा सांपडला. मांगांनी गुन्हा केल्याचें कबूल केले. सबब घर जप्त करण्यांत आलें. मांगांचा अपराध थोर आहे सबब तीन असामीचे उजवे हात तोडून त्यांस सोडून देण्याविषयी हुकूम करण्यांत आला. ( वाड भाग ८ पान ११७ )

वाड भाग ८ पान १२१ वर महारांनीं बैल मारल्याबद्दल त्यांचा एक हात व एक पाय तोडण्याचा हुकूम केल्याचें उदाहरण आहे.

## भुतें व जादुगिरी

मराठ्यांच्या इतिहासाचे शिवकालीन साधनखंड प्रसिद्ध जाले आहेत. त्यांतील कित्येक ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून भुतें व जादुगिरी यांचेवर महाराष्ट्रांतील

लोकांचा विश्वास होता असें दिसून येतें. भूत घालणे हा एक गुन्हा समजला जात होता व ह्या गुन्हा करणारास गुन्हेगारी, प्रांताचे बाहेर हाकून देणें, घरदार जाळून टाकणे इत्यादि शिक्षा करण्यांत येत. एका काळी कोकणांतात भुते घालणे ह्या गुन्ह्याचा इतका सुळसुळाट जाहला की, ह्या गुन्ह्याचे बंदोबस्ताकरिता एक अधिकारी मुद्दाम नेमण्यांत येऊन त्याचे हाताखाली एक स्वतंत्र खातें निर्माण करण्यात आलें हल्लीच्या कायद्याप्रमाणें हा गुन्हा समजला जात नाही व ह्या गुन्ह्याचे योगाने कोणास त्रास जहाल्याचा हि बोभाटा कानावर येत नाही. ह्या गुन्ह्यासंबंधी थोडी कल्पना यावी ह्या हेतूने ह्या गुन्ह्याची कांही नमुनेदार उदाहरणे येथे नमूद करितो

बाळ माहाजनी खोत मौजे गावखेड यानें विठ्ठल गणेश गोखले याजवर भुतें घालून पांच सात जागा पड झाली. बाळ महाजनी यानें आपले मखे कांही भुतें व मानणुका केल्यांचे कबूल करून कबुल-। तमा लिहून दिला त्यावरून पेशजी भुताळ्याचे पारपत्याविषयी सान्या तालुक्यास कागद सादर केले आहेत. त्याप्रमाणे बाळा माहाजनी याचे खोतीचें वतन अनामत करून वर घाटीं घालावयाचा व त्याचें घर मोडून टाकण्याविषयी हुकूम करण्यात आला इ॰ स. १७५९–६० वाड भाग २ पान ७०

बाळाजी महादेव, सरकारी दप्तराकडील कारकून, याचे बायकोस कोकणातील भुतें लागून बाधा जाहाली. त्याजकरिता ेवस्ख येथे जाऊन देवापाशी गुण मागितला. बायकोस गुण लागला; परंतु उपद्रव कोणापासून होतो याचा तपास लागत नाही. सबब त्याने हुजूरकडे अर्ज केला. त्यावरून महिपतराव कृष्ण यास हुकूम करण्यांत आला की, चौगांवच्या देवाच्या दाखल्याने ज्याचें भूत निवडेल त्याचे पदरी घालोन उपद्रव न होय तें करणें आणि भुताळ्यापासून गुन्हेगारी घेणें.

तालुके अंजणवेल, सुवर्णदुर्ग रनागिरी, विजयदुर्ग, देवगड, सौदळ ह्या प्रत्येक ठिकाणी भुताळ्यांचे बंदोबस्ताकरिता मुद्दाम काही अधिकाऱ्यांची नेमणूक इ. स. १७७४।७५ सालात करण्यांत आली ह्या अधिकाऱ्यानी गावगन्ना फिरून भुताची चौकशी करावी असा त्यास हुकूम देण्यांत आला होता. ह्या कामी करावयाच्या चौकशीसंबंधी व गुन्हेगारीसंबधी खालील उल्लेख आढळण्यांत येतात.

" चौकशीचें वगैरे कलमाचा जाबता सर सुभाहून विसाजी केशव यांनी करून दिला आहे त्याप्रमाणें करावी; गुन्हेगारी पंचवीस रुपयांपासून पन्नास रुपये पावेतो घ्यावी म्हणून चौकशीचे कलमाचा जाबता सरसुभा यानें करून दिला आहे त्यांत लिहिले आहे, परंतु कोकणची रयत गरीब; मसाला गुन्हेगारीवर द्यावि न देणे. जीवन पाहून गुन्हेगारी घेत जाणे.

ह्यावरून भुताळ्यांचा उपद्रव कोकणप्रांती रयतेस फार होत असला पाहिजे असें दिसतें.

मोरोजी तीकोना भोई याने भाऊ काळोजी भोई यास भुते घालून जिवे मारिलें. गोताचे सभेंत मोरोजीचे आंगी मुद्दा शाबीत झाला. तेव्हां गोतसभेनें जादु-गिरीची विद्या निर्फल व्हावी म्हणून मोरोजीचे पुढील दोन दात पाडून चांभाराचे कुडांतील पाणी पाजण्याचा व जातीबाहेर टाकण्याचा ठराव केला. तेव्हा मोरोजी गोतास म्हणाला, जातीबाहेर टाकाल तर बेरडा मागास मिळून मारे करीन. तेव्हा मोरोजीस अटकेंत ठेवण्याचा हुकूम करण्यांत आला. मोरोजीचे पुढचे दोन दांत पाडून चांभाराचे कुडांतील पाणी पाजण्याचा हि हुकूम देण्यात आला.

बाळाजी धोंडदेव वा। भोजे जिवली यास भुताचा उपद्रव होऊन नानाप्रकारे नाश झाला. एका वर्षामध्ये अकस्मात घरास आग लागोन घर दोन वेळा भुतांनी जाळले सबब तपास व्हावा असा त्याने सरकाराकडे अर्ज केला त्याजवरून चौकशी करून ज्याची भुते मशारनिल्हेचे घरी उपद्रव करीत असतील त्याजकडून भुतें वारऊन फिरोन त्याचे घरी उपद्रव न होये ऐसा जामीन घेणें व गुन्हेगारी घेऊन तालुके मजकुरी जमा करणे. वाड भाग ८ पान १४७ वर जग्या मारवाडी नागरगावकर भुताला सबब अटकेंत आहे. तरी त्याचे एक बोट कापून त्यास सोडून देणें असा उल्लेख आहे.

भुताळ्याचे गुन्ह्याचे बाबतीत कोणत्या प्रकारची शिक्षा व व्यवस्था करण्यांत येत होती हे वरील विवेचनावरून स्पष्ट जाहाले आहे. पाश्चात्य राष्ट्रांत witch craft हा एक भयंकर गुन्हा समजला जात असे.

रोमन कायद्याचा उगम म्हणून समजली जाणारी जी ( Twelve tables ) ट्वेल्ह टेबल्स्, त्यामध्यें कोणत्या हि माणसाने त्याचे शेजाऱ्याचे शेतांतील पीक जादुमंत्राचे योगानें नेऊं नये अगर स्वतःचे शेतांतील पीक नाहीसे करूं नये असे सांगितले आहे. शेजाऱ्यास दुखापत करण्याचे इराद्यानें बळी देणे वगैरे प्रकार करू नयेत, असे विषयी रोमन राज्यात कायदा करण्यात आला होता. जादुटोणे आणि मंत्रतंत्र करणारास जिवंत जाळण्याची व अशा लोकांचा सल्लामसलत घेणारास क्रॉसवर छिणून ठार मारण्याची शिक्षा देण्यांत येत असे कानस्टन्टाईन बादशहाचे कारकीर्दीत जादुटोणे करणारास देशाचे बाहेर हाकून देण्याची अथवा जाळून ठार मारण्याची शिक्षा करण्यात येत असे. इंग्लंड व युरोपखंडातील दुसरे राष्ट्रात जादुटोणे करणें हा परमेश्वराविरुद्ध गुन्हा ( Crime against God ) समजत व धार्मिक गुन्ह्याची चौकशी करण्याचा अधिकार ज्या न्यायनिर्णय करणाऱ्या संस्थांकडे असे त्या संस्था ह्या गुन्ह्याची चौकशी करीत. इग्लड देशाचे पहिले जेम्स राजाचे कारकीर्दीत जादुटोणे, मंत्रतंत्र करणाऱ्यांना व भुताचें साहाय्य संपादन करणाऱ्यांना ठार मारण्यांत येईल अशा प्रकारचा कायदा करण्यांत आला होता. हा कायदा दुसरे जार्ज राजाचे कारकीर्दीपावेतो अमलांत होता. भूत, चेटूक व जादुटोणे करणाऱ्या इसमावर इंग्लंड देशामध्यें शेवटचा खटला १७१२ व जर्मनीमध्यें १७९३ मध्यें जाहला. एको-

णिसावे शतकाचे पूर्वार्ध संपेपावेतो भुताळ्यासंबधी कायदा फ्रान्स देशात अस्तित्वात होता व ह्या गुन्ह्यास जाळून ठार मारण्याची शिक्षा करण्यांत येत असे. जादुटोणे करण्याचे सोग करणारास हल्लीचे फ्रेंच पीनल कोडान्वयें शिक्षा सांगितली आहे. वर नमूद केलेले कायद्यास अनुसरून युरोपखंडात अनेक लोकाना जाळून ठार मारण्याची उदाहरणें आढळतात. महाराष्ट्रात भुताळ्याना कायद्याचे दृष्टीने कसे वागविले जात असे हें वर नमूद केलें आहे व. महाराष्ट्रात भुताळ्याना फारच सौम्य शिक्षा देत असत असे वरील विवेचनावरून स्पष्ट होत आहे.

## दारू पिणं

दारू पिणं हा मराठी रियासतीत गुन्हा समजला जात होता विठोजी बिन सुलतानजी सातघर हा एकदा दारू प्याला ते समयी त्याजपासून दहा हजार रुपये गुन्हेगारी घ्यावी. परत बाळाजीपत लाडे याणी रदबदली केली की, हा अन्याय; यास माफ करावा या उपरा दारू पिणार नाही. पुढे अतर पडेल तर गुन्हेगारी दहा हजार रुपये देण्याचे कबूल केले. पुढे विठोजी दारू प्यालेला पुण्यात कोतवालीकडे सांपडला पुढे गुन्हेगारी वसूल करावयास साधन नाही, सबब विठोजीचे पाटिलकी वतन जप्त करण्यात येऊन उत्पन्न सरकारजमा करण्याचा हुकूम देण्यात आला.

कसबे नाशिक येथील ब्राह्मण दारू पितात सबब त्याविषयी चौकशी करण्याचा हुकूम करण्यांत आला. नाशीक येथील धर्माधिकारी ब्राह्मणास सामील असल्याचें कळून आल्यावरून त्याचे धर्माधिकारीपण जप्त करण्याचा व उत्पन्न सरकार जमा करण्याचा हुकूम करण्यात आला. मद्यपानाचे बाबतीत मराठी रियासतीत किती कडक शिस्त होती हे ह्यावरून दिसून येत.

## खोटी बातमी

इंग्रजाचे लोक घाट उतरून चिपोळणास गेले म्हणोन खोटी बातमी परसू बिन जावजी याने सांगितली सबब त्यास अटकेंत ठेवण्यात आले ( वाड भाग ८ पान १२१ ) इ. स. १७९१ ।९२.

## दंड व त्याचें स्वरूप

मराठी रियासतीतील निरनिराळ्या प्रकारच्या गुन्ह्यांची उदाहरणें वर जी नमूद केली त्यामध्ये त्या गुन्ह्यास कोणकोणत्या शिक्षा देण्यांत आल्या ह्याचा हि उल्लेख आलेला च आहे. शिरच्छेद, डोके मारणें, कडेलोट करणे, व तोफेच्या तोंडी देणें, अशी देहांत–शिक्षेची निरनिराळी रूपें ते वेळी प्रचारात होती. हातपाय तोडणें, कान व नाक कापणें शरिराचे अवयव कापण्याच्या शिक्षेची ही निरनिराळीं रूपे होती. द्रव्यदंडात गुन्हेगारी घेणें. स्थावर मिळकत म्हणजे घरदार, इनाम, वतन, मोकासा इत्यादि जप्त करणे व त्याचे उत्पन्न सरकारांत जमा करणें इत्यादिकांचा समावेश होत असे. देशातून हद्दपार करणें ही शिक्षा हि त्या काळीं अस्तित्वांत होती.

आतां दुसऱ्या कांही अलीकडे न आढळण्यांत येणाऱ्या गुन्ह्याची उदाहरणें नमूद करितों.

गंगा जमना कळवंतिणी कसबे पुणे येथील नागेश्वराचे देवालयात शिवरात्रीचे दिवशी गेल्या; सबब त्याचेकडून गुन्हेगारी घेण्यात आली इ. स. १७६४ । ६५ ( वाड भाग ८ पान ३२६ ). शिदोजी कारंजकर याने मुलाचे लग्न साताऱ्यास केले. लग्नांत नवऱ्यामुलावर अफतगीर धरली सबब त्याचेकडून गुन्हेगारी रुपये १३६ घेण्यात आली पुढे गुन्हेगारीची रकम फार आहे असे वाटल्यावरून रुपये १०० शिदोजीस परत देण्यात आले. लखा ठाकूर नाशीककर हा त्रिंबकेश्वराचे देवळात पूजेस जाऊन अभिषेक करूं लागला सबब त्यास अटकेत ठेवण्यात आले. पुढे त्याचेकडून गुन्हेगारी रुपये १००० एक हजार घेण्यात येऊन त्यास मुक्त करण्याचा हुकूम करण्यात आला शामाचार्य प्रभृति ब्राह्मण पैठणकर यानी नरहरी रत्नाकर या नावांचे ब्राह्मणास त्यास प्रायश्चित्ताचा अधिकार नसता प्रायश्चित्त देऊन पंक्तीस घेतला व शुद्ध पक्षाचे ब्राह्मणावर बलात्कार करून त्यांशी आपली पंक्ति केली, सबब शामाचार्य याची वर्षासने वगैरे सरकारांत जप्त करण्यात आली ( वाड भाग ८ पान २६४ ). निंबाजी कुळकर्णी मौजे शहर टाकळी याने पैठणचे तटातील ब्राह्मणाशी शरीरसंबध करूं नये असे असतां केला, संसर्ग दोषाचे प्रायश्चित्त घेत नाही. तरी कुळकर्णी मजकूर यास पैठणास पाठवून प्रायश्चित्त देवविणें. प्रायश्चित्त घेऊन शुद्ध न होय तरी त्याचे वतनाची जप्ती करून वतनसबधी उत्पन्न सरकारहिशेबी जमा करणे ( वाड भाग ८ पान २८१ ) सुभाचे आज्ञेने ब्राह्मण ज्ञातीतील कोणावर बहिष्कार घातला गेला असल्यास त्याचे आज्ञेवाचून बहिष्कृत इसमाबरोबर अन्नव्यवहार केला तरी अन्नव्यवहार करणारा इसम गुन्हेगारी देण्यास पात्र होत असे. ह्या स्वरूपाचे त्या वेळेचे विशिष्ट परिस्थितीमुळें उपस्थित होणारे गुन्हे आढळण्यांत आलेले नमूद केले आहेत

## तुरुंग

मराठी रियासतीत कैदी लोकांना महाराष्ट्रांतील किल्ल्यांत बंदीत ठेवण्याचा प्रघात होता. कैदी ज्या किल्ल्यात ठेवण्यांत येत त्याची कांही नावे येथे नमूद करितों.

अहमदनगर, कोहज, दौलताबाद मुल्हेर, जिवधन, गजमाची, वसई, शिवनेर, विजयदुर्ग, रांगणा, रत्नागिरी, असेर, लोहगड, विसापूर, पितिगा, पट्टा, सिंहगड, पुरंदर, पाडवगड, कोरीगड, चाकण, पाल उर्फ सरसगड, माणिकगड, माहुली, चंदन, धोडप, रायगड, धनगड, सरसगड, रामगड तालुके विजयदुर्ग, लोहगड, कानवई, चांदवड, पाली, मंगळवेढे.

कोणत्या हि किल्ल्यावर अटकेत ठेवण्याकरितां कैदी पाठविते वेळी त्याचप्रमाणें अटकेत ठेवल्यानंतर कैद्याचे व्यवस्थेचे बाबतीत वेळोवेळी किल्ल्याचे अधिकाऱ्याकडे हुकूम येत; त्याप्रमाणे हुकुमाची बजावणी किल्ल्याच्या अधिकाऱ्यांनी करावयाची

असा शिरस्ता असे. बंदीत ठेवलेल्या कैद्यास सजा करण्याचे हुकूम किल्ल्याचे अधिकाऱ्याकडे येत त्याअन्वये किल्ल्याचे अधिकारी शिक्षा अमलांत आणीत.

बंदीत ठेवलेल्या कैद्यास कोणत्या रीतीने वागवावयाचे, त्याचेकडून काम कोणतें घ्यावयाचें इत्यादि गोष्टी कैद्याची जात व दर्जा ही लक्षांत घेऊन ठरविण्यांत येई. कोळी, रामोशी, बेरड इत्यादि जातीचे कैद्याकडून किल्ल्यावरील इमारतीचे काम करून घेण्यात येई. त्याचप्रमाणे मोठ्या माणसास पोटास एक शेर व लहानास अच्छेर देण्यात येत असे.

वाड भाग ७ पोट भाग २ पान २०४ मध्यें खालील उल्लेख आहे:—"एकूण तेवीस असामी पाठविले आहेत, इमारतीकडे वगैरे कामाकडे काम घेऊन पोटास दर असामीस थोरास एक शेर व पोरास अच्छेर येणेप्रमाणे किल्ले मजकुरपैकी देणें". कैदी लोकास खाण्याकरितां नागली हे धान्य देण्यांत येत असे. कैद्याचे पायांत बहुधा बेड्या घालण्यात येत असत कैदी मोठ्या दर्जाचा माणूस असल्यास "गैर अब्रू फराशी न करणें" अशा प्रकारचा हुकूम किल्लेदारास देण्यात येत असे (वाड भाग २ पान ७५).

"रुस्तुमराव किल्ले मजकुरी अटकेंत ठेवावयाशी पाठविला आहे, त्यास किल्ल्यावर मोकळे ठेवून रखवाली करणे, कड्यावरून उडी टाकील अथवा वीष खाईल. ब्राह्मणाचा विचार आतताईपणा करू लागेल तर करू न देणें" अशा प्रकारचा उल्लेख वाड भाग २ पान ७६ वर आहे. ब्राह्मण कैद्यास नागली न देतां खाली लिहिल्याप्रमाणे शिधा देण्यांत येत असे.

॰॰।।। ९ तांदूळ सडिक.<br>
॰॰॰ ९ दाळ.<br>
॰॰॰२ तूप.<br>
॰॰॰ १ मीठ.

वाड भाग ७ पोट भाग २ पान २३९ वर शिध्याचे बाबतीत दुसऱ्या प्रकारचा उल्लेख आहे. पोटास दररोज पीठ ज्वारीचे वजन पक्के ॰॰१ शेर व डाळ वजन पक्के ॰॰। पाव शेर व मीठ पैसाभार देत जाणें त्याप्रमाणें शिधा देण्याचा ज्या कैद्यांस हुकूम देण्यांत आला होता ते कैदी तुळाजी अंग्रे याचे फितुरांत सामील असलेले ब्राह्मण लोक होते.

सखाराम हरी, बाबूराव हरी इत्यादि प्रसिद्ध पुरुषाना कैदेंत ठेवण्यांत आलें. त्यांचे व्यवस्थेचे बाबतीत खालील प्रकारचे उल्लेख आढळतात. अटकेत ठेऊन भोजन घालीत जाणे, परभू कारकून त्याजजवळ जाऊं न देणें, चौकीस माणसें ठेवाल ती वरचेवर बदलीत जाणे, धोत्रे अगर शेलापागोटें लागल्यास देणें,

जेवणाची व वस्त्रपात्राची आबाळ न करणें, बेडी नेहमीं असो देणे ( वाड भाग ८ पान ७४—सब सबैन मया व अलफ ).

प्रसिद्ध पुरुषांस अटकेत होता होईल तो विनाकारण त्रास न व्हावा अशा प्रकारची व्यवस्था ठेवण्याचे धोरण वरील उल्लेखावरून जरी दिसते, तथापि दिलेल्या सवलतीचा दुरुपयोग होतो असे दिसल्यास त्या धोरणात लगे च बदल करण्यांत येई. तिसा सबैन मया व अलफमध्ये सखाराम हरी याचे अटकेसंबंधी जो दुसरा उल्लेख वाड भाग ८ पान १४९ वर आहे त्यावरून हे दिसून येते कि्ले मजकुरी सखाराम हरी अटकेत आहे त्यास पोटास शिधा मागत आहे तो मना करून जुन्या नागलीचें पीठ दररोज वजन पक्के १ एकशेर प्रमाणें देत जाणे. पिठाशिवाय आणीक काही न देणे. उपास करू लागल्यास करूं देणे, मनास न आणणे. नवी बेडी येथून पाठविली आहे ती सखाराम हरी याचे पायात घालून पक्के बदोबस्ताने ठेवणें म्हणून अर्जोजीराव ठमाले हवलदार व कारकून किल्ले धनगड यास हुकूम करण्यात आला. एखाद्या गृहस्थास त्याचे कुटुंबासुद्धां अटकेत ठेवण्यांत आले असल्यास विशिष्ट परिस्थिती लक्षात घेऊन सर्वत्रांस मोकळे करण्यांत येत असे. वाड भाग २ पान ७६ वर खालील उल्लेख आढळतो. मुजफरखानाकडील गोविंदराव आपाजी किल्ले चादवड येथे कैदेत आहे. त्याच्या दोघी कन्या उपवर आहेत एक दहा वर्षांची व एक अकरा वर्षांची, यंदा लग्न जरूर झालें पाहिजे. मशारनिल्हेची आई व बहीण दहा महिने अन्न घेत नाही. सोळा माणसे आहेत, तितक्यास अन्न पुरत नाही. येविशी आज्ञा करावी म्हणून मशारनिल्हेचे बंधु यांनी अर्ज केला ...... " तरी गोविंदराव अप्पाजी याच्या दोघी मुली व बायकामाणसें भाऊबंद सदरहू सोळा असामी कैदेत आहेत ती सोडून देणें; त्याच्या घरच्या ऐवजापैकी एक हजार रुपयाचा वस्तवानी दोघी मुलीच्या लग्नाबद्दल देणे."

अटकेंत ठेवलेल्या माणसाचे नात्यापैकी कोणाचे लग्न, मुंज, वर्षश्राद्ध इत्यादि कार्यें करणें प्राप्त झाल्यास ही कार्यें करण्यास बऱ्या च सवलती देण्यांत येत असत.

वाड भाग ८ पान १४३।१४२।१४३ वर खालील उल्लेख आहेत. बाजीराव गोविंद बर्वे हैदरअल्ली याजकडे गेले सबब त्याच्या स्त्रिया दोन, किल्ले मंगळवेढे येथें अटकेंत ठेविल्या आहेत, त्यास मशारनिल्हेची कन्या उपवर जाली, लग्न कर्तव्य म्हणोन गोविंद गोपाळ मशारनिल्हेचे तीर्थरूप याणी हुजूर विनती केली, त्याजवरून मशारनिल्हे यास सरकारात जामीन घेऊन दोघी स्त्रिया कन्येसहवर्तमान पुण्यास पावते करणें.

त्रिंबक गणेश भट याची बायको व लेक अटकेत आहे. त्यांस त्यांचे सोईरे आप्त कोणी जामीन घेऊन मुंज करतील तरी बायको व मुलास पक्का जामीन घेऊन त्याचे हवाला करणें. मुंज झाल्यावर पुर्ववत् प्रमाणे अटकेंत ठेवणें.

धोंडो गोपाळ केळकर तोतयाचे फितुरातील किल्ले धनगड येथें अटकेस होता, तो मृत्यु पावला, त्याची क्रिया जाली पाहिजे, त्याजकरिता त्याची बायको रत्नागिरींत अटकेंत आहे तीस जामीन घेऊन क्रिया करण्याबद्दल मोकळीक करणें; क्रिया जहालीयावर पोटी संतान असल्यास अटकेत ठेवणें, संतान नसेल तर जामीन पक्का घेऊन मोकळी असो देणें.

नरसिंगराव गोविंद किल्ले पाली येथे अटकेस होता, त्याची मातोश्री पुण्यांत होती ते मृत्यु पावली, तिची क्रिया करण्याबद्दल ब्राह्मण तेथें अस्थी घेऊन येईल; अस्थी आल्यावर नरसिंगराव याचे पायांतील बेडी काढून चौकी चांगली बंदोबस्तानें ठेऊन क्रियेस ब्राह्मण मेळवून वसि रुपयेपर्यंत क्रिया करण्यासी देऊन क्रिया करविणें. क्रिया जाहलियावर पूर्ववत् प्रमाणें बेडी घालून ठेवणें समान सबैन मया व अलफ (वाड भाग ८ पान १४३). त्याच प्रकारची सवलत बाबूराव हरी व सखाराम हरी याचे मातोश्रीचे वर्षश्राद्धाचे वेळी दिल्याचा उल्लेख वाड भाग ८ पान१४४ वर आहे

एखाद्या कैद्याची प्रकृति बरी नसल्यास त्याचे व्यवस्थेकरितां त्याचे आप्तास त्याचे बरोबर राहण्याची परवानगी देण्यांत येत असे महादजी गणेश फडके हा चंदनगड येथे अटकेंत असतां त्यास बरें वाटेनासें आले, यास्तव त्याची स्त्री व व कुणबीण यास त्याचेपाशी किल्ल्यावर राहाण्याकरिता परवानगी देण्यांत आली. स्त्रीस शिधा मध्यम प्रतीचा व कुणबिणीस अडशेरी देण्याचा हुकूम करण्यांत आला.

बदअमल केल्याचे कारणाने अटकेत असलेल्या बायकोस पैसे घेऊन बटीक म्हणून विकण्याचा प्रघात होता, असे वाड भाग २ पान ६६ व ६८ वरील उल्लेखांवरून दिसते·

खंडेराव काकडे हवलदार किल्ले कोरीगड यास सनद की, किल्ले मजकुरी तर्फ ओसर पैकी, पवाराचे पोरीनें बदअमल केला, ती तेथे अटकेंत आहे. ऐशास हल्ली सदरील पोरीचे खड रुपये ३० करार करून वेदमूर्ति राजश्री गंगाधरभट कर्वे यास कुणबीण देवविली असे तरी सदरील रुपये तीस वेदमूर्तीपासून घेऊन कुणबीण त्याचे हवाली करणें.

देवजी पराता कोळी याची बायको रांडकी इजवर तुफान बदअमलाचें ठेऊन किल्लेमजकुरी आणली आहे, म्हणून तिचे गोताने हुजूर येऊन अर्ज केला की, गोताचें लेकरूं बटिकपणात न घालावे. त्याजवरून गरत बायकोवर नजर देऊन तिजकडे गुन्हेगारी रुपये ५० करार केले असेत तरी पन्नास रुपये घेऊन देवजी पराता याची बायको सोडून गोताचे स्वाधीन करणें.

कोणत्या हि आनंददायक अगर मंगलप्रसंगी कैदी सोडून देण्याचा हल्लीं जसा प्रघात आहे तसा त्या काळी हि होता. इ. स. १७४६-४७ सालांत पुत्रोत्साह-निमित्त बंदिवान सोडून दिल्याचा वाड भाग २ पान ७३ वर उल्लेख आहे. त्याच-प्रमाणें इ. स. १७७४-७५ सालांत श्रीमत माधवरावाचे लग्न-समयीं बंदिवान सोडल्याचा पान ७५ वर उल्लेख आहे.

मराठी रियासतीत तुरुग व कैदी लोकांची व्यवस्था कोणत्या प्रकारची होती याची थोडी बहुत कल्पना आतां सांगितलेल्या माहितीवरून आपणांस झाली आहे. महाराष्ट्रांतील लोकांच्या चालीरितीस व धर्मसमजुतीस अनुसरून जेवढ्या सवलती देणें शक्य होते तेवढ्या सर्व सवलती बंदिवानास त्या काळी देण्यात येत असत. वाड यांनी प्रसिद्ध केलेल्या भागांत तुरुंगासंबंधी जेवढी माहिती प्रसिद्ध करण्यांत आली आहे त्या माहितीमध्यें वर्षोनवर्षे कैद्याची उपासमार होऊन कैदी तुरुंगांत खिचपत पडल्याचा कोठें उल्लेख नाही, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

फौजदारी गुन्ह्यांचा ( अगर इंग्रजीत Criminal Law म्हणतात ) निर्णय करण्याची पद्धति मराठी रियासतीत कोणत्या स्वरूपाची होती ह्याबद्दल जें मला यथामती सांगण्यासारखें होते तें आपणांस निवेदन केलें आहे. ह्या बाबतीसंबंधी अधीक कागदपत्र उपलब्ध झाल्यास ह्या विवेचनांत पुष्कळ भर घालता येईल; परंतु तसा प्रसंग येईनोंपर्यंत थांबून न बसता, आहे त्या सामुग्रीचा उपयोग करून महाराष्ट्राच्या इतिहासरूपी मंदिराचे निरनिराळे भाग बांधण्यास इतिहास-भक्तांनीं सुरवात करावी अशा प्रार्थना करून हा निबंध पुरा करितों.

## व्यवहार-निर्णय-पद्धति

### ऋणदानादि व्यवहार-स्थानें

१ मंडळाचे द्वितीय संमेलनप्रसंगी व्यवहारनिर्णयपद्धतीवर मीं प्रथम निबंध वाचला त्यानंतर ऋणदानादि व्यवहारस्थानांसंबंधी बरी च नवीन माहिती मला आढळली. ह्या माहितीचे आधारें पूर्वी नमूद न केलेल्या अशा बऱ्या च नवीन मुद्यांची चर्चा आजचे निबंधात करण्याचें मी योजिले आहे. पूर्वी मंडळास सादर केलेल्या निबंधांत विषय-विवेचनाचे सोईकरितां मी विषयाचे मुख्य चार भाग असे केले होते—

१ व्यवहार-निर्णय करणाऱ्या संस्था.

२ व्यवहार-निर्णय ज्या नियमांस अनुसरून केला जात असे ते नियम व त्या नियमांचा ज्यांत संग्रह केला आहे असे प्रमाणभूत मानले जाणारे ग्रंथ.

३ व्यवहार-निर्णयासंबंधीं विधिविषयक नियम.

४ व्यवहार-निश्चयाचे कार्य सुकर होण्याकरितां अस्तित्वांत असलेल्या तरतुदी.

हे चारी भाग कायम ठेऊन नवीन उपलब्ध झालेल्या माहितीचे योगानें जी एक नवीन बाब ज्ञात झाली आहे, त्या बाबीसंबंधी माहितीचा समावेश करण्याकरितां उपजीविका-साधनें, मानापमान इत्यादि संबधी निरनिराळ्या जातींत अगर एका जातींतील निरनिराळ्या व्यक्तींत उत्पन्न होणारे व्यवहार; हा एक नवीन भाग करून त्यासंबंधी उपलब्ध झालेली नवीन माहिती मी नमूद करितो

आतां, व्यवहार-निर्णय करणाऱ्या संस्था हा जो प्रथम भाग यांत समाविष्ट होणारी कांही नवीन माहिती आपणास निवेदन करितो व्यवहार निर्णय करण्याकरितां राजानें नेमलेले न्यायाधीश ह्या नावाचे अधिकारी असत, ही गोष्ट व असल्या प्रकारच्या कांही अधिकाऱ्याची नावें मंडळास पूर्वी सादर केलेल्या निबंधांत मी नमूद केली आहेत. प्रत्येक तालुक्याचे ठिकाणी न्यायाधीश या नांवाचा अधिकारी मराठी रियासतीत नेमला जात असावा असा, *सातारकर महाराज व पेशवे यांची रोजनिशी भाग ८ पान १२७ व १२८ मधील उल्लेखावरून तर्क होतो. न्यायाधिशास वेतन किती मिळत असे व त्याचेकडे कोणकोणतीं कामें असत याची यथार्थ कल्पना व्हावी ह्या हेतूनें सदरहू पानांतील मजकुरापैकी महत्वाचा भाग येथें देतो.

"बाजी बल्लाळ यास तालुके अजनवेल येथील न्यायाधीशी सालमजकूर अनल सालापासून सांगोन तैनात सालीना खेरीज शिरस्ता रुपये १०० शंभर करार केले. तरी मशारनिल्हेपासून तालुके मजकूर येथील न्यायाधिशीचे कामकाज घेऊन सदरीलप्रमाणें तैनात पाववीत जाणे. त्यांचें हाताखालीं मनसुबीचें कामकाजास प्यादे आसामी दोन देवविले असत."

न्यायाधिशानें कामें कोणती करावयाचीं याचा खुलासा खालीं लिहिल्याप्रमाणें केला आहेः—

"मुलकी कजिये वतनाचे वगैरे येतील त्याचे वर्तमान तुम्ही ( त्रिंबक कृष्ण ह्या नांवाचा तालुक्याचा अधिकारी ) आईकोन मनास आणावयास न्यायाधिशाकडे सांगावे. त्यांनी हरदुजणाचे कतबे, करीने, पुरसीसा व जामीन व सड्या घेऊन पांच गृहस्थ मेळवून वाजवी मनास आणून तुम्हांस समजावून फडशा करावा. कोणी धटाईस आला तरी तुम्ही निक्षून ताकीद करणें. कोणाचा कोणी पक्ष करूं नये. सरकारकामाविशी प्यादे व पंचाइतीस चार जमिदार परनिष्ट न्यायप्रकरणीं उपयोगी असतील ते नेमून देत जाणे."

"न्यायसंबंधी कागदपत्र होतील ते मशारनिल्हेनी आपले निसबतीस ठेवून

* ह्यापुढें ह्या पुस्तकांचा जेथें जेथे उल्लेख येईल तेथें तेथें वाड भाग व पान एवढा च उल्लेख केला आहे.

कजिया विल्हेस लागल्यावर कागदाचे फेरिस्त घालून सरकारचे दप्तरांत ठेवीत जावे. त्याची खबरदारी वरचेवर मशारनिल्हेनी करीत जावी".

"कजियासंबंधानें वादी यास आणणें व निरोप देणें व नेमोतर घेणें ते न्यायाधिशाकडे घेववून निरोप देत जाणे."

"वतन कोणाचें जप्त करणे व मोकळीक करणें यांचे विद्यमाने वर्तमान मनास आणून वाजवी असल्यास करीत जाणें".

हा लेख सवाई माधवराव पेशवे याचे कारकीर्दीतील सन १७८२–१७८३ सालचा आहे. मराठी रियासतींत न्यायाधिशांच्या नेमणुका कशा रीतीनें होत असत व त्यांचेकडे कोणकोणती कामे असत याची कल्पना ह्या कागदावरून आपणांस पूर्णपणे होत आहे

"पांच गृहस्थ मेळवून वाजवी मनास आणून तुम्हांस समजाऊन फडशा करावा" त्याचप्रमाणे "पचाईतास चार जमीदार परिनिष्ट न्याय–प्रकरणी उपयोगी असतील ते नेमून देत जाणे" ही वाक्ये आतां वाचून दाखविलेल्या उतान्यांतील अत्यंत महत्वाची आहेत. जूरीची पद्धत युरोपांतील थंड प्रदेशातून आणून हिंदुस्थानांत सुरू करण्यात आली आहे किंवा ही पद्धत ह्या देशातील च आहे ह्या प्रश्नाचा निकाल करण्यास ह्या वाक्याचा बरा च उपयोग होणार आहे.

कोणत्या हि व्यवहाराचा बारकाईने शोध झाला पाहिजे असें उभयता वाद्यांचे मागणें असेल तर वादाचा इनसाफ करण्याचे काम राजश्री रामशास्त्री यांचेकडे सोपवीत असत, असें वाड भाग ७ पोट भाग २ पान १४२ मधील उल्लेखावरून दिसून येतें. " त्यावरून फाटक हुजूर येऊन पत्र घेऊन गेला की, हरदू जणाचा इनसाफ करुन विल्हे करणे; त्यास आमचा इनसाफ बारकाईने शोध झाला पाहिजे म्हणोन; त्याजवरून हरदूजणांचा इनसाफ राजश्री रामशास्त्री यांचेकडे नेमून देऊन" अशा प्रकारचा उल्लेख आहे. ह्या च भागाचे पान १४८ मध्ये दुसरा अशा च प्रकारचा उल्लेख आहे. "तरी येविषयीची मनसबी तुम्ही हरदु वाद्यास व भोवरगांवचे खोत, कुळकर्णी व मोकदम सुभा नेऊन कोणाची रुइयात न धरिता वाजवी करणे. तेथे इनसाफ न होय तरी पुण्यास रामशास्त्री याजकडे हरदुवाद्यास पाठविणे." न्यायनिर्णय करण्याचे बाबतीत रामशास्त्री यांची किती श्रेष्ठ प्रकारची योग्यता होती, हें ह्या उल्लेखावरून उघड होत आहे. स्थानिक न्यायनिर्णय करणाऱ्या संस्थेकडून व्यवहारनिर्णय समाधानकारक न झाल्यास त्या व्यवहाराचा निर्णय मराठी राज्यांतील श्रेष्ठ न्यायाधीशांकडून करवून घेण्याची सवलत वादी प्रतिवादीस असे, हे ह्या उल्लेखावरून उघड होत आहे. एकाद्या विशिष्ट जातीचे लोकांत उत्पन्न होणाऱ्या तंट्याचा निकाल करण्याचा अधिकार त्या जातीतील एकाद्या व्यक्तीचे हातांत सोपविण्यात आल्याचें एक उदाहरण येथें नमूद करितों. प्रजेमध्ये उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय

करण्याचा हक्क हा खुद्द राजाचा आहे. हा हक्क बजावण्यास राजा असमर्थ असल्यामुळें न्यायाधिशाकडे सोपवावा व त्यानें व्यवहाराचा निर्णय करावा अशी स्मृतिकाराची आज्ञा आहे. हा हक्क न्यायाधिशाकडे न सोपविता एखाद्या विशिष्ट जातीतील एका विशिष्ट व्यक्तीकडे सोपविल्याचे उदाहरण सहसा न आढळणारे आहे. वाड भाग १ पान १९९ मध्ये खालील उल्लेख आहे. स्वामींच्या राज्यांतलि कोहारांचे कजिये होतात ते आपल्या च जागा मनसुभ्या करितात; त्या कजियाच्या मनसुभ्या आपले विद्यमाने करून निवाडा करावा असा घासी बिन धनराज नाईक याने छत्रपतीकडे १७४०।४१ मध्ये अर्ज केला. त्यावरून छत्रपतींनी कृपाळ होऊन, कोहार कजिये करून आपआपले घरी मनसुभ्या करितात त्याचा निवाडा तुझे विद्यमानें व्हावा अशी घाशीस छत्रपतींनी सनद दिली.

कांही विशिष्ट प्रकारच्या गुन्ह्याचा व व्यवहारांचा निर्णय करण्याचे काम त्या जातीचे पंचांनी करावें असा प्रघात असल्यास त्या जातीचे पचाचे अधिकारांत हात न घालता त्या गुन्ह्यांचा अगर व्यवहाराचा निवाडा करण्याचा हक्क त्या जातीचे पंचाकडे ठेवण्यात येत असे चितामण जोशी सरवदा वस्ती पेण याने "आपले जातीस घरठाण व कोणी बद अमल केला या कांही कजिया झाला तरी आमचा आम्ही वारू दिवाणांत तगादा न लावावा अशी चाल आहे" असा अर्ज केला तरी त्या चालीप्रमाणें वहिवाट चालू ठेवण्याविषयीं त्यास अभय-पत्र देण्यांत आले. वाड भाग २ पान ३७ इ. स. १७४७-४८, वाड भाग ७ पोट भाग २ पान १४५ मध्ये ह्याच बाबीसंबंधी दुसऱ्या एका महत्वाचे मुद्याचा उल्लेख केला आहे. तो येथें नमूद करणें जरूर आहे.

पिलाजी बिन आत्माजी अंबरे व संभाजी बिन कृष्णाजी अबरे खोत मौजे चिरणी तर्फ खेड तालुके सुवर्णदुर्ग याचे मध्यें कजिया होता. श्रीभार्गवराम संस्थानचे कारकून राघो विश्वनाथ गणपले यानी पचाईत वगैरे मिळोन सदरहू इसमांमधील कजियाची मनसबी श्रीसंनिध केली आणि श्रीचे नावचे शिक्के करून दोन्ही खोतास कागद दिले. ही हकीकत सुभ्याचे कानावर जाता राघो विश्वनाथ याचा भाऊ सदाशिवभट गणपले याचेकडून गुन्हेगारीची मागणी करण्यांत आली. तेव्हां असा हुकूम करण्यांत आला की, राघो विश्वनाथ याने मनसबी केली हे गैर केलें. तर उभयतांची मनसबी वाजवी मनास आणोन करणें व म्हणोन रामाजी महादेव यास पेशव्यांनी हुकूम केला . हा हुकूम इ. स. १७६४।६५ सालचा आहे. ह्यावरून असा तर्क होतो की, मराठी रियासतींत न्यायाधिशाचे काम करण्याकरिता जे अधिकारी नेमीत असत, असे थोड्या वेळापूर्वी मी आपणास सागितले, त्या अधिकाऱ्यांचे विद्यमानें नेमलेल्या पंचाईतांनी च फक्त व्यवहाराचा निर्णय करावयाचा असा निर्बंध इ. स. १७६४।६५ चे सुमारास अस्तित्वात आला होता असें दिसतें. राघो विश्व

नाथ यास अन्याय माफ केला आहे, असा उल्लेख ह्या हुकुमांत आहे तो हि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था ह्या भागांत समावेश करण्यास योग्य अशा स्वरूपाची माहिती यथपावेतो दिली.

आतां निरनिराळे ज्ञातीत उपजीविकेचे साधनासंबंधी अगर मानापमानासंबंधी मराठी रियासतीत उत्पन्न झालेल्या व्यवहाराचे आढळण्यात आलेले कांही महत्वाचे निवाडे नमूद करितों.

## पटवेकरी व जंगम

पटवेकरी व जगम याचे मध्ये उदिमाचा कज्या लागला. तेव्हा ह्या व्यवहाराचे निर्णयाकरिता पटवेकरी व जगम पैठण थळास गेले. तेथील देशमूख, देशपाडे व महाजन, चौधरी व मोकदम व कासार, मण्यार व समस्त महास्थलिक लोक यांस आपले करिने सागितले. तेव्हा थळिकानी सागितले समस्त सभा करितो. दोघे जण सभेस येणे. थळिकांनी सभा केली पटवेकऱ्यास व जगमास बोलाविणें पाठविले. पटवेकरी सभेस हजर राहिले. जगम गेरहजर जाले. त्याची थळिकानी चार दिवस वाट पाहिली. जंगम हजर झाले नाही तेव्हा स्थलिकानी महाजन जेजुरी यास पत्र दिले जेः– पैठणी चाली परंपरा रेशमी काम पटवेकरानी करावे. जंगमास संबंध नाही, सुतीकाम, कटदोरे व सूत वगैरे जितके पडेल ते जंगमानी करावें ऐशी चाल आहे हे थळपत्र पटवेकरांनी छत्रपतीस सातारियाचे मुक्कामी आणून दाखविले त्यावरून छत्रपतीनी पटवेकरास अभयपत्र दिलें. हा निवाडा सन १७२४।२५ सालातील आहे. वाड भाग १ पान १५३ ).

जोशी प्रात पुणे<br>विरुद्ध<br>सोनार

पुणें प्रांताचे जोशी व सोनार यांचा उपाध्येपणाचा कजिया झाला. सोनाराचे उपाध्ये त्याचे स्वजाती आहेत त्यांनी सोनाराचे उपाध्येपणाचा हक्क घ्यावा असें ठरलें. ( वाड भाग १ पान २१७ )

कासार तांबट व<br>सोनार वगैरे पंचाळ<br>विरुद्ध<br>वाणी बकाल

कासार, तांबट, सोनार वगैरे पंचाळ ज्ञातीत आणि वाण्यामध्यें लग्नात नवऱ्यामुलाची वरात हमरस्ता चारी पेठांतून मिरवीत नेण्याचे हक्काबद्दल व्यवहार उत्पन्न झाला. सदरहू व्यवहाराचा निर्णय करण्याकरतां निरनिराळ्या सत्तावीस व्यापारी पेठांत व निरनिराळ्या प्रांतांत चाल कशी आहे याबद्दल माहिती मागविण्यात आली. त्याचप्रमाणे ह्या प्रकारचे व्यवहार पूर्वी उत्पन्न झाले ते वेळी त्याचा निकाल कशा रीतीनें करण्यांत आला या बद्दल हि माहिती मागविण्यांत आली. ही माहिती मागविण्यासंबंधीचा हुकूम १७४७।४८ सालांतला आहे. शेटे माहाजन बंदर मुंबई यांचेकडून ह्या संबंधोची माहिती मागविण्यांत आली होती ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ह्या व्यवहाराचा अखेर निकाल काय

झाला हें समजण्यास मार्ग नाही. परतु जातीतील मानापमानासंबंधी व्यवहार उत्पन्न झाल्यास त्याची व्यवस्था कोणत्या प्रकारे करीत हे या लेखावरून दिसून येतें ( वाड भाग १ पान २२४ )

जोशी विरुद्ध जगम

मुधोळ परगण्यांतील चिचोली, अलूर व नेरली या गावचा जोशी मयत झाला. त्यास कोणी वारस नव्हते. सबब परगण्यांतील जमीदार देशमुख देशपाडे याणी रुपये साठ घेऊन तिन्ही गावची जोशी-वृत्ति एका ब्राह्मणास करून दिली. मुधोळ परगण्यांत जंगम याची चाल, वाणी लिगाईत याचे घरचें लग्नमुहूर्ताचे अमीष जंगमानी निम्मे घ्यावे व निमे जोशी यानी घ्यावे, अशी आहे. असे असता वाणी व शूद्र वगैरे ब्राह्मणाखेरीज वरकड जातीचे अमिष जंगमास निमे द्यावें अशी जंगम तक्रार करूं लागले. पूर्वापार वहिवाटीप्रमाणें चालविण्याविषयी हुकूम झाला सन १७६०।६१.ह्या वादाची जी हकीगत दिली आहे त्यांत एक महत्वाचा मुद्दा आहे, जोशी वृत्तीचा मालक मयत होऊन वृत्ति बेवारशी झाली. त्यानंतर तिन्ही गावची वृत्ति परगण्याचे जमीदार देशमूख व देशपांडे यांनी एका ब्राह्मणापासून साठ रुपये घेऊन त्यास वृत्तीचा मालक करून महजर करून दिला. ह्यावरून जोशी-वृत्ति बेवारशी झाल्यावर ती चालविण्याचा अधिकार एखाद्यास देण्याचा हक्क सरकारकडे नसून जमीदार देशमूख देशपांडे यांचेकडे असे असें दिसते ( वाड भाग २ पान ३७ ).

सोमया जंगम मठ
साखरखेडले
विरुद्ध
हाटग

हाटगर हे जंगमाचे शिष्य असून त्यानीं लिग धारण करावे असे असतां पांच सात जणांनी लबाडी करून जानवी घातली व लिंग धारण ते च आपलेआपल्यांत करूं लागले. म्हणून श्रीहरीमंदिरी जंगमाची व लिंगाईताची पंचाइत झाली. हाटगर खोटे झाले, त्याचीं जानवी काढविली व हाटगरानी लिंग जंगमापासून धारण करून जंगमाचे शिष्यत्व करावें असा निवाडा झाला इ. १७५१।५२ ( वाड भाग २ पा २०४ ).

जोगी, भराडी व गोंधळी, या तीन जातींमध्यें सूरसंमोळ वाजविण्याबद्दल वाद उपस्थित जाला. जोगी यांनी सूरसंमळ वाजवावा, असा ह्या वादांत निकाल झाला. ह्या कामांत जोगी यांचेकडून सरकारची नजर घेण्याचा हुकूम जाला, त्याप्रमाणें २१३७।८४ नजर निरनिराळ्या प्रांतांतील जोगी लोकांकडून वसूल करून घेण्यांत आली. ( वाड भाग ७ ( २ ) पान ६३२ ).

कासार प्रांत कऱ्हाड
विरुद्ध
लिंगाईत वाणी

कासाराचे लग्नात कलशासमवेत वरात पेठेतून मिरवीत नेत असत. कऱ्हाडचे लिंगाइत वाणी यांनी कासाराचे मिरवणुकीस हरकत केली. या वादाचा जिल्हेकडील सुभेदार व हुजूर मामलेदार यानी असा निकाल केला की, कासार सोमवंशी क्षेत्री त्याची वरात कलशा समवेत मिरवावी असें शास्त्रमते आहे. इ. स. १७६७।६८. ( वाड भाग ७ ( २ ) पा. ३३७ )

विसाजी कृष्ण
देशमुख चोपड
विरुद्ध
आनंदराम जोशी
व इतर

विसाजी कृष्ण याचे म्हणणें की, आनंदराम जोशीप्रभृति ब्राह्मण अभीर, त्याची आमची एक जात नव्हे. आम्ही माध्यंदीन ते अभीर होत. सदरहू वादाची मनसुबी पचाईमते होऊन असें ठरले की, खानदेशात अभीर नाहीत. अन्नसबंध कोणी माध्यं-दिनांनी केला तरी प्रत्यवाय नाही पंक्ती व उपाधिकें चाल-वून सुखरूप राहणे. सदरहू निवाड्याचे कामीं २५००१ सरकारनजर वसूल करण्यांत आली सरकारनजरेची रकम त्या कामी फार च मोठी वसूल करण्यात आली. ( वाड भाग ७ ( २ ) पा. ३४१.)

कुंभार
विरुद्ध
कासार व सुतार

कुंभार व कासार याचेमध्ये कुंभाराची वधुवरे घोड्यावर बसून मिरवावी किंवा मिरवू नये याबद्दल वाद उत्पन्न झाला. सदरहू वादाचा निकाल होऊन असे ठरले की, कुंभाराची वधुवरे घोड्यावर बसून मिरविण्यास हरकत नाही. ( वाड भाग ७ ( २ ) पा. २६५ ).

दसनाम गोसावी
विरुद्ध
मानभाव

मानभाव एकमते मिळोन गैर रीतीनें वर्तो लागले. अबुद्धिजनास वश्य करून आपले मतांत वर्तवितात. पुरुष व स्त्री यांची मुडणे करून आपले वेश धरवितात व शिष्य होतात त्याजकडून त्याची प्राचीन कुलदैवतें त्यागवून खापऱ्या पुजवितात. त्याप्रमाणें मानभाव वर्तन करूं लागल्यानतर पैठण येथें मानभाव व दसनाम गोसावी याचेमध्ये वाद उत्पन्न झाला. तेव्हां समस्त क्षेत्रस्थ ब्राह्मण अधि-कारी व जमीदार मिळोन शास्त्रान्वये विचार करोन निर्णय केला की, मानभाव अति-निंद्य, सर्वधर्मबहिष्कृत, षड्दर्शनांत नाहीत, शास्त्रविरुद्ध, अविधिमुंडित, मानभावाचा उपदेश कोणते हि निकृष्ट जातीमध्ये हि घेणें योग्य नाही. त्यांचे मतास जे अनुसरले असतील त्यांना राजदंड व ज्ञातिदंडपूर्वक प्रायश्चित्त झाल्याविना त्यांचे घरी ब्राह्म-णांनीं जाऊं नये. असा ठराव करण्यात आला. येणें प्रमाणें निवाडा इ.स. १७८२।८३ सालचा आहे ( वाड भाग ८ पा. २७१ ).

जोशी पौडखोरे विरुद्ध माहार

पौडखोरे येथील महारानी जोश्यावर फिर्याद केली की, माहाराची लग्नें जोशी यनीं लावण्याची वहिवाट असून जोशी लग्न लावीत नाहीत सबब जोशास लग्न लावण्याचा हुकूम व्हावा. ह्या कामी चौकशी होऊन, महारांचीं लग्नें जोतिष्यांनीं लावावयाची चाल नाही, कोठें कोठें लावीत हि असतील परंतु कोकणप्रांतीं महारांची लग्नें ज्योतिषी लावीत नाहींत; अतिशूद्रांचे जातीत ठेगोमगो हे च माहारांची लग्नें लावतात, सबब ज्योतिष्यानी लग्नें लावूं नयेत, असा ठराव करण्यांत आला. औरंगजेब बादशहाचे कारकीर्दीत किल्ल्याचे चाकर व प्रांतांतील दोन चार हजार माहारांनीं, ज्योतिष्यांनी आपली लग्नें लावावी म्हणून औरंगजेबाकडे फिर्याद केली होती व पुरातन चाल मनात आणून ज्योतिष्यांनी माहाराची लग्नें लावूं नयेत असा ठराव केल्याचा ह्या निवाड्यांत उल्लेख आहे. हा निवाडा इ. स. १७८५।८६ सालांतला आहे ( वाड भाग ८ पान २७९ ).

सटवाजी आदमणा कोष्टी कडु

सटवाजी कोष्टी हा कडू, बटकीचा वंश, असतां त्यानें पुण्यांतील चांगले जातीचे कोष्टी यास आपले मिलाफी करून परगणे संगमनेर येथें जाऊन चांगले जातीचे कोष्ट्यांच्या सोईरका केल्या. मेहेत्रे कोष्टी याचे म्हणणें की, आमचे जातीत बटकीचा वंश गोतपत करून चांगले जातीत घेत नाहीत, तरी ये विषयीचा शोध मनास आणून निर्वाह करावा. या उपरी पंचाईतमते व पांचसात जागेमातबर येथील गोताचे विचारे जी आज्ञा करल त्याप्रमाणे वर्तन करण्याचे उभयतांनी कबूल केल्यावरून वाई, कऱ्हाड, नातेपुते, तान्हळे, बारामती, येवले, तीसगाव, वगैरे गांवचे कोष्टी ज्ञातीतील मेहेत्रे याच्या साक्षी घेऊन बटकीचा वंश चागले कोष्टी जातीत घेत नाहीत, असा ठराव करण्यात आला. सटवा आदमणा जातीचा कडू, याजला चांगल्या जातीत सोईरका करावयासी संबंध नाहीं. कडू जातींत वर्तावे. मेहेत्रे खरे जाले सबब त्याचे माथा सरकार नजर रुपये ५००० पांच हजार ठेवण्यात आली. इ. स. १७६९।७० ( वाड भाग ७।२ पा ३३९ ).

गौळीः—गौळी जातीत एका नवरा मेलेल्या स्त्रीचा मुहूर्त न लागतां एका गौळी माणसाबरोबर संबंध झाला. त्यास त्यापासून एक मुलगा झाला. पुढें दोघे हि मयत जाले. मरतेसमयी मुहूर्त न लागता संबंध घडलेल्या स्त्रीपासून झालेल्या मुलाची गोत पतकरून जातीत घेण्याविषयी त्या इसमानें आपले लग्नाचे बायकोपासून झालेल्या मुलास सांगितलें. गोनाम त्या मुलानें विनंति केल्यावरून गोतानें मुहूर्त न झालेल्या स्त्रीपासून झालेल्या मुलास जातीत घेण्याचें कबूल केलें. पुढे जातित घेतलेल्या मुलाची सोयरीक पुण्यास ठरली, सबब पुणेकर गोतास त्यास जातींत घेण्याविषयी अर्ज केल्यावरून पुणेकर

गौळी यांस विचारतां त्यांनी गोतांत घेण्याचे कबूल केले. त्यावरून माहाड, पेण, वीरवाडी, भोरप, आवटे, पाल, बोर, धामणी वगैरे गांवचे गौळ्यांस आज्ञापत्र देण्यांत आलें. इ. स. १७६२।६३. बेकायदेशीर झालेल्या संबंधापासून प्रजा झाल्यास ती प्रजा त्या जातीत घेण्यापूर्वी कोणत्या मार्गाचे अवलंबन करावे लागे याचा उलगडा या उदाहरणावरून होतो. कोष्टी जातीत गौळी जातीप्रमाणें बटकीचा वंश गोतांत घेतां येत नसे हे आता च सांगिलेल्या निवाड्यावरून स्पष्ट झालें आहे. वाड भाग ७ ( २ ) पान ३२५.

पठाण बिन मलिक दाउद भांड विरुद्ध अजिज बिन जाफर भांड

पठाण भांड वस्ती पेण यानें स्वामीस अर्ज केला कीं, कोकणप्रांत व वरघाट ह्या प्रांती आपले वडील व आपण भांडणाचे कसब करून पोट भरतो मौजे मुंगोशी तर्फ दुर्ग परगणे सागसे प्रांत कल्याण हा गांव आपणांस वंशपरंपरेने इनाम करून दिला आहे. सांप्रत आजिज बिन जाफर भांड नाशीककर कसबा भिवंडी येथें पोट भरावयास आला आहे व इनाम गांवचा विभाग मागतो. यावरून चौकशी करून असा हुकूम करण्यांत आला की, जाफर भांड यास कजिया करावयासी संबंध नाहीं. दुसरा कोणी भांड प्रांतांत फिरोन भीक मागेल त्यास प्रांतांत फिरो न देणें इ. स. १७४४ । ४५ ( वाड भाग १ पान १५९ ).

फकिर महमद नूर महमद अतार विरुद्ध बुवाजी बिन मोहबत अतार

फकीर महमंद मेहेतराखुम अतार प्रगणे पुणे याचे मालकीचे खूम आतारचे मेहेतरकी वतन असतां व आतारचे घरी लग्न शादी व सुंता होतील त्याकडे त्याचा मेहेतरकी मान शेला व पानें असतां त्यास बुवाजी अतार यानें खलेल करून मान व हक्क देत नाही असें सांगितलें. या वादाची चौकशी करून बुवाजी अताराजवळील कागद तगलुफी आहेत असें ठरविण्यांत येऊन फकीर महंमद याचे तर्फे निवाडा करण्यांत आला. इ. स. १७४५।४६ ( वाड भाग १ पान १७१ ).

गोधळे माहूरकर विरुद्ध भुत्ये तुळजापूरकर

गोंधळे व भुत्ये यांचे मध्ये कजिया उत्पन्न झाला तो विल्हेस लावण्यास मौजे कनेरसर तर्फ खेड प्रांत जुन्नर येथें थल नेमून देण्यांत आले. मनसुबीमुळे भुते व गोंधळे यांचेपासून जे उत्पन्न होईल त्यांपैकी निमे श्री माहूरच्या भवानीस व गोत खर्चास द्यावे व निमें सरकारांत द्यावे असा हुकूम करण्यांत आला ( वाड भाग २ पान २ ).

वसई प्रांती पाताणे प्रभू याची वस्ती आहे त्याचे घरचे उपाध्येपण पळसे आपले म्हणतात. पाताणे प्रभूचें म्हणणें उपाध्यपण ब्राह्मण चालवितात, पळसे चालवीत नाहीत. त्याप्रमाणें उपाध्येपणाबद्दल कजिया सुरू झाल्यानंतर उपाध्येपण सरकारांत अनामत करण्यांत आले. इनसाफ झाल्यानंतर ज्याचे ठरेल त्यास उत्पन्न देवविलें जाईल. उपाध्येपण ब्राह्मणाकडून चालविणें. जें उत्पन्न होईल त्यापैकी निमे गुमास्त्यास देणे निमें सरकारांत जमा करणें ( वाड भाग २ पान ४ ).

ब्राह्मण विरुद्ध पळसे

कोणत्या हि वादांत हल्ली फिर्याद चालू असतां रिसिव्हर नेमणें अगर त्या च स्वरूपाच्या दुसऱ्या तजविजी करण्यांत येतात; त्या च स्वरूपाची ही तजवीज आहे व वतन मिळकतीसंबंधीचे वादांत ह्या मार्गाचें नेहमी अवलंबन करण्यांत येई असें दुसऱ्या अनेक उदाहणांवरून दिसून येतें. इ. स. १७४७।४८. क्वाचित् प्रसंगी उभयतां वाद्यांकडून नजर घेण्याचा करार करून वतन अनामत करण्यांत येत नसे असें हि आढळण्यांत येतें.

कसबे पावल प्रांत जुन्नर येथील पाटिलकीचा व कुळकर्णीपणाचा कजिया होता त्या कामीं वतनदाराचे विनंतीवरून इनसाफ होईपर्यंत वतन अनामत करावे सबब नजर करार केली. १२०१ निमे मोकदम याजकडे, रुपये ८०० कुळकर्णी याजकडे इ. स. १७४८।४९.

हे जोशी व कुळकर्णी अनुक्रमे मौजे जेजुरी व आंबले येथील होते. यांचेमध्यें एकजथी भाऊपणाचा कजिया लागला. खंडो शामराजाचें म्हणणे मोरो बाबाजी हे एकजथी भाऊ वतनाचे निमे विभागी. मोरो बाबाजी म्हणे की, खंडो शामराज भाऊ नव्हत. पाठराखे आडनांवाचे बेलसरे आहेत. सदरहू कजियाची मनसुबी हुजूर पडली म्हणोन मौजे जेजुरीचें वतन अनामत करून हरदूवाद्यास बहिष्कृत करण्यांत आले. सदरहू वादाचा निकाल पंचाईतमतें होऊन उभयता वादे एकजथी ठरले. कुळकर्ण वतनाचे उत्पन्न त्रिवर्गानीं घ्यावें असे ठरलें. जोतिष हे प्रायश्चित्त घेत तोवर गुमास्ता ठेवून चालविण्याविषयी हुकूम करण्यांत आला. (वाड भाग ७ ( २ ) पान १४१ ).

खंडो शामराज बेलसरे
विरुद्ध
मोरो बाबाजी बेलसरे

लोकांचे आचार व प्रायश्चित्त विषयक वर्तनाशीं ज्या वृत्तीचा संबंध आहे त्या वृत्तीबद्दल वाद उपस्थित झाल्यास, वाद उपस्थित जाहाल्यानंतर, उभयता वाद्यास बहिष्कार घालण्याचा प्रघात होता व त्या बहिष्काराची प्रायश्चित्त घेतल्याखेरीज निष्कृति होत नसे, असें ह्या उदाहरणावरून स्थापित होतें.

उपजीविकेचीं साधनें, मानापमान इत्यादिसंबंधी निरनिराळ्या जातींती निरनिराळ्या व्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या व्यवहारांचीं उदाहरणें वरील प्रमाणें आपणां सादर केलीं आहेत. फार पुरातन कालापासून जातीभेद हा आपले समाजांत रू असल्या कारणानें व स्मृत्यादि ग्रंथाचे व रूढीचे दृष्टीनें निरनिराळ्या जातीचे आचा विचार, मानापमान, उपजीविकेची साधनें इत्यादि गोष्टी ठरल्यासारख्या जाहल असल्याकारणानें ह्या प्रकारच्या व्यवहारांस त्या काळी फार महत्व होतें. प्रस्तुत राजकीय सत्ता ही स्मृत्यादिक नियमानी बांधली नसल्याकारणाने वरील प्रकार व्यवहार हल्लीचे काळी आतां म्हणण्यासारखे उपस्थित हि होत नाहीत व उपस्थि झाल्यास त्यांचे निर्णयाचे बाबतीत दिवाणी कोर्टाची सत्ता हि बरी च मर्यादित आ

आतां, ऋण, दान, लग्न, दत्तक, दायविभाग इत्यादि बाबतींसंबधी कां अपरिचित मुद्दे ज्यावरून दृष्टोत्पत्तीस येतात अशी काही उदाहरणें नमूद करतोः—

मराठी रियासतीत कर्ज वसूल करण्यासंबंधी जी एक प्रकारची तजवी अमलांत असल्याचें आढळते ती, त्या काळीं दळणवळणाची साधनें अत्यंत दु होती ही गोष्ट लक्षात घेतली असतां, लोकांस फार सोईची व हितप्रद होती अ दिसून येतें.

वाड भाग २ पान १३२, १४६, १४८, १७० ह्यावर ती उदाहरणें दि आहेत. ह्या सर्व उदाहरणांचे सामान्यस्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन करित कोणत्या हि ठिकाणी एखाद्या सावकारास वसूल केलेल्या कर्जापैकी चवथा, पांच अगर साहावा हिस्सा देण्याचे करारानें सदरहू कर्ज सरकारी अधिकाऱ्यांकः वसूल करण्याची तजवीज होत असे. ह्या बाबतीत सरकारी अधिकाऱ्यास जो हुकूम देत त्यांत कर्ज असेल त्याची चौकशी करून खताप्रमाणें पावला ऐव वसूल करून त्याची चौथाई अगर ( जो भाग ठरला असेल ) तो ऐव सरकारांत घेऊन हुजूर पावता करणें, बाकी ऐवज मालकास देणें.

## लग्न

फिरंगण प्रांतांत यजुर्वेदी ब्राह्मणांत मामाची कन्या भाच्यास देण्याचा प्रघ सुरू झाला. धर्मशास्त्र पाहतां हे अयोग्य कर्म, यास्तव जो असे कर्म करील त्या पासून गुन्हेगारी घेऊन त्यास जातीबाहेर ठेवण्याविषयीं हुकूम फर्माविण्यांत आल इ. स. १७४४।४५ ( वाड भाग २ पान १९९ ).

एके ठिकाणी मुलीचें लग्न करण्याचे ठरलें असून ती दुसऱ्या वरास दिल्य नवरीचे बापापासून मातबर गुन्हेगारी घेण्यांत येत असे. त्याखेरीज मुलाचे बाप जो खर्चवेंच लागला असेल तो त्यास देण्याचा हुकूम करीत असत, असें बऱ्हाणपू वाणी जातीत अशा प्रकारच्या उत्पन्न जाहलेल्या व्यवहाराचे कामीं केलेल्या निवाड वरून दिसून येतें (वाड भाग ७ ( २ ) पान १८२ ).

## दत्तक

रामाजी मल्हार कुळकर्णी कसबे तळेगांव याचा मुलगा नारोबा मयत जाहला. त्याचे मागें त्याची विधवा स्त्री राहिली. रामाजीचा वृद्धापकाळ सबब सर्व ग्रामस्थांनीं वाग्दत्त पुत्र पांडुरंग यास रामाजीचे ओटींत घालून चिमाबाईचे मांडीवर बसवून घेवविला. पांडुरंग हा नारोरामचे पुत्रत्वास अर्ह झाला असें ठरवून त्याचे नांवची भोगवट्याची पत्रें करून देण्यांत आली. ह्या घराण्यांत पूर्वापार चालत आलेल्या रूढीस अनुसरून हें दत्तविधान योग्य ठरविल्याचें दिसतें " असें त्याचे भाऊपण्यांत चालत आलें आहे याजकरिता सदाशिव अपाजीचे चौघां पुत्रांपैकी, एक पुत्र मागून घ्यावा असें ठरलें" इत्यादि वाक्यावरून ह्या घराण्यांत पूर्वापार चालत आलेल्या रीतीस अनुसरून पांडुरंगाचे दत्तविधान योग्य ठरविल्याचें दिसते. हल्लीच्या कायद्या-न्वयें हे दत्तविधान कायदेशीर ठरणार नाही. अन्य गोतांतला दत्तक घेतला तर तो कायदेशीर समजला जात नसे, असें ( वाड भाग ८ पान ६० ) वरील, " तरी काशीनाथ डिंगरे मृत्यु पावले. त्याचे बायकोने अन्य गोत्री तिसा वर्षांचा पुत्र घेतला हें ठीक नाही " ह्या उल्लेखावरून दिसून येतें.

दत्तक पुत्र होता होईल तो नवऱ्याचे भावाचे मुलापैकी कोणीतरी घ्यावा. जवळचे भावाचा मुलगा असतां त्यास न घेतां दूरच्या भावाचे मुलास घेऊ नये, असा निर्बंध मराठी रियासतींत होता. जवळचे भावाचे मुलास एका बाजूस ठेऊन दूरचे भावाचे मुलास दत्तक घ्यावयाचे असल्यास सरकारची परवानगी लागत असे ( वाड भाग ८ पान २७८). दत्तक घेते वेळीं आई व दत्तक मुलगा यांचेमध्यें मिळकतीचे व्यवस्थेसंबंधीं कांही अटी ठरल्यास त्या कितपत कायदेशीर असत किंवा समजल्या जात याचें एक उदाहरण देतों. " गिरमाबाई कोम कृष्णाजी हरी देशपांडे सरकार जुन्नर इनें पोटी पुत्र नसल्या कारणानें दत्तक पुत्र घेऊन दसकतांत बायकोचें ( स्वतःचें ) व जो दत्तक पुत्र घेतला त्याचे नांव घालून कामकाज चालविलें. दत्तक घेते वेळी दत्तक पुत्रानें आपल्यास पत्र लिहून दिले की, आपण कामकाज दरबारी व खासगी गुमास्त्याची तागिरी बहाली व वतनाची खरेदी फरोक्त तुमचे इत्यलयाने करीत जाऊं व तुमचे मर्यादेंत राहूं इत्यादि. "

यानंतर भगवंतराव मयत झाला. त्याचा मुलगा अमृतराव व गिरमाबाई यांचे-मध्यें गिरमाबाई आपलें व माझें नांव कतब्यावर व वतनी कागदावर आपले हातें घालून दसकतें करून कर्ज घेऊन मनस्वी वर्तणूक करितात, म्हणून वाद उपस्थित जाहला. तेव्हां त्याविषयी योग्य बंदोबस्त करण्याविषयी अमृतरावानें सरकारकडे अर्ज केला. त्यावरून पंचाईतमतें मनास आणता अमृतराव भगवंत यांनी वतनाचा बंदोबस्त राखून गुमास्ते नवे ठेवणें अथवा दूर करणें तें त्यांनी करावें. गिरमाबाई जिवंत आहे तोपावेतो तिचे नांव दसकतांत चालवावे. गिरमाबाईचे स्वरूपाप्रमाणें तिची अन्न-

वस्त्राची बेगमी करून देत जाणें. ह्याप्रमाणें निवाडा करण्यांत आला. इ.स. १७७२-७३ ( वाड भाग ७ ( २ ) पान ११० ).

मुसलमान जातीमध्यें मुलगा दत्तक घेण्याचा प्रघात होता असें एका उदाहरणावरून दिसून येतें.

चाळीसगाव येथील काजी मयत जाहला. त्यास पुत्रसंतति नव्हती. तेव्हां त्याचे बायकोने आपले पोटी अवला-अफलाद नाही याजकरितां जालाल महंमद हा मिठेखानाचे बहिणीचा लेक, आपला भाचा, यास फरजद लतफीलेक घेतला त्याचे हाती काजीपणाचे काम घेणे. अर्जाप्रमाणे काजीचे वतनाचा भोगवटा जलाल महंमद याचेकडे सुरू करण्यात आला. ( भाग ७ पोट भाग २ पान १०९ ) इ.स. १७६६ । ६७.

## वारसा

निवारसी परदेशी मेल्यास त्याची मालमत्तेशी जी असते ती त्याचे क्रियेस खर्च होऊन ती त्याचा गुरु ब्रह्मचारी अगर बैरागी याजजवळ ठेवितात. सरकारांत घेत नाहीत. त्याचा कोणी वारसदार आला तर त्याचे हवाली करतात, न आला तर भंडारा अगर दानधर्म करितात, असें चौकशीअंती ठरल्यावरून बिनवारशी परदेशाची मिळकत सरकारजमा केलेली ब्रह्मचारी यास परत देण्यांत आली. इ. स. १७७१ ।७२. ( वाड भाग ७ ( २ ) पान १८२ ).

मौजे वाकी बु॥ येथील मोकदमी वतनाबद्दल पाटाचे बायकोपासून झालेला परंतु वयानें वडील व लग्नाचे बायकोपासून झालेला परंतु वयानें लहान असे दोघा भावांमध्यें वाद होता. वतनास मालक लग्नाचे बायकोपासून झालेल्या धाकटे भावास करण्यांत आले व त्याचेकडून सरकारची नजर रुपये १२०० घेण्यात आली. ज्या जातीत पाट लावण्याची चाल आहे त्यांचेमध्यें वारसाचे वादांत पाटाचे लग्नापासून झालेल्या संततीत व लग्नाचे बायकोपासून झालेल्या संततीत कांही फरक कोठें केल्याचे आढळत नाही. या दृष्टीने हे उदाहरण विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे धार्मिक कृत्यांत पाटाची बायको कमी दर्जाची समजतात परंतु तिचें लग्न जातिरिवाजाप्रमाणें पूर्ण कायदेशीर असतें. असे स्थितीत वरील प्रकारचा भेद कितपत योग्य आहे हा प्रश्न आहे. इ. स. १७७१ । ७२.

महाराष्ट्रीय समाज वर्ण व जाती यांनी युक्त असल्याकारणाने व प्रत्येक वर्णातील व जातीतील व्यक्तीची आचरणपद्धति विशिष्ट प्रकारची ठरली गेल्या कारणाने कोणत्या हि व्यक्तीची आचारविषयक बाबतीत सर्व जातींविरुद्ध तक्रार उत्पन्न झाल्यास त्या तक्रारीचा निकाल कोणत्या रीतीनें केला जात असे ह्याचें दिग्दर्शन करतों. मनुस्मृति अध्याय ८ श्लोक ४१

जातिजानपदान्धर्माञ्छ्रेणीधर्मांश्च धर्मवित् ।
समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत् ॥

हा, आपल्या विरुद्ध नसलेले ब्राह्मणादिकांचे याजनादि जातिधर्म, देशांतील लोकांचे देशधर्म व वाणी, कारागीर इत्यादिकांचे कुलपरंपरागत धर्म जाणून त्याच्याशी विरोध न येईल अशा रीतीचे धर्म राजानें व्यवहारामध्ये नियत करावेत, असा श्लोक आहे.

प्रत्येक जातीचे अगर कुलाचे धर्म व्यवहारात नियत करण्याची जबाबदारी धार्मिक राजावर आहे. महाराष्ट्रात धर्मराज्य स्थापन झाल्यानंतर अर्थात् ही जबाबदारी छत्रपतींवर येऊन पडली, व महाराष्ट्रीय समाजातील कोणत्या हि वर्णातील अगर जातीतील व्यक्तीची तक्रार त्या व्यक्तीचे जातिविरुद्ध असल्यास तिचा निकाल करणे राजाचे एक कर्तव्य होऊन बसलें. असल्या प्रकारचे व्यवहाराचे कामी चौकशी करून त्या तक्रारीसंबधी योग्य ते हुकूम देशमुख, देशपांडे, मोकदम व रयतेस जाहीर करण्यात येत असत. ह्या बाबतीची काही उदाहरणे देतों.

मराठे जातीतील स्त्रीचा नवरा परागंदा जाहला. तिचे मायबाप मरोन गेले. दादल्याकडील हि कोणी अन्नवस्त्र चालवावयास नाही. असे स्थितीत पाटाचा नवरा करण्याची परवानगी छत्रपतीनी दिली व देशमुख, देशपांडे, गोत यांस स्वामींनी आज्ञा केली. त्याप्रमाणे तिनें तिचे जातीचे इसमाबरोबर पाट लाविला. पुढे मागें त्याशी कोणी कजिया करूं नये म्हणून स्वामींनी अभयपत्र दिले. अशा प्रकारचे हुकूम जातीत वर्तविण्याविषयी व जातीत घेण्याविषयी आढळतात. सोयरीक ठरली असून लग्न होत नाही ते करण्याबद्दल, मुहूर्ताची बायको केली सबब जात दिकत घेते ती दूर करण्याबद्दल, मुलगी लग्नांत देण्याबद्दल, मूल नांदत नाही ते नांदिशी करण्याबद्दल, सोइरिकी ठरलेला मुलगा रकापित्या निघाला, सबब दुसऱ्या मुलाबरोबर लग्न करण्याची परवानगी मिळण्याबद्दल, सरकारकडे अर्ज केल्याची व सरकारनें ह्या बाबतीसंबंधी हुकूम दिल्याची अनेक उदाहरणे आहेत.

स्मृतिकाराना जी समाजव्यवस्था संमत आहे त्या समाजव्यवस्थेंत राजाचीं कर्तव्ये ठरली आहेत. वरील बाबींसंबंधी फिर्याद प्रजेपैकी कोणी हि इसमानें केल्यास तिचा निकाल करून फिर्याद करणारास योग्य ती दाद द्यावयाची हें राजाचें अनेक कर्तव्यापैकी एक कर्तव्य असल्याकारणानें मराठी रियासतींत ह्या बाबींसंबंधी लोक सरकाराकडे आपली गाऱ्हाणी नेत व सरकार योग्य ते हुकूम करी. हे अगदी योग्य व न्याय्य असे, हे सांगावयास पाहिजे असें नाहीं. समाजव्यवस्थेचे बाबतींत राजा व प्रजा यांची कर्तव्यें ज्या मूलभूत तत्त्वांवर उभारली आहेत तीं तत्त्वें ज्या समाजास संमत नाहीत, अशा समाजाचे हातात राज्यसूत्रें गेली असत समाजांत कोणत्या प्रकारची क्रांति घडते हें आतां पावेतों केलेल्या विवेचनावरून व हल्लींच्या महाराष्ट्रीय समाजाचे स्थितीवरून उघड होत आहे. ह्या हि दृष्टीनें आत पावेतों निवेदन केलेली माहिती विचार करण्यासारखी आहे.

व्यवहारनिर्णयासंबंधी विधिविषयक नियम, हा जो माझे विषयाचा एक भाग आहे त्यांत पडणारें एक नवीन चमत्कारीक उदाहरण माझे आढळण्यात आहे तें एथें नमूद करून हा लेख पुरा करितो:—

दोन गांवचे शिवेबद्दल वाद असल्यास त्या वादाचा निकाल दिव्याचे आश्रयानें करण्याचा प्रघात असे, हें मी पूर्वी वाचलेल्या निबंधांत दर्शविलें आहे. दिव्याचे अनेक प्रकार मीं ह्यापूर्वी नमूद केले आहेत. आता जो प्रकार मी नमुद करणार आहे तो जरा चमत्कारिक आहे:—

मौजे उरण तो वाळवे प्रांत पन्हाळा व मौजे बोरगाव परगणे शिराळे ह्या दोन गांवचे लोकांत गांवाचे शिवेबद्दल वाद होता. " बोरगांवकर गैररजावंद होऊन उरणकरांचे क्रियेस रजावंद झाले. क्रियेचे राजीनामे उभयतांनी दिले. उरणकराकडून बाजी बिन नाभाजी पाटील यानें कराराप्रमाणे मस्तकी गाईचे चर्म व श्रीकृष्णेचा चंबू भरला व उजवे हाती घेऊन शिवेने चालुन शींव खरी केली. त्यास चंबू जड झाला सर्प निघाला त्याची दिकृत बोरगांवकरानी घेतली, त्याची चौकशी शिवेवर अमिनानें केली. दोघे वादी हुजूर आलियावर साहेबी पचाइतास हुकूम करून अर्थ मनास आणतां त्यांनी दिकती घेतल्या त्या खोट्या जाहाल्या. "

एणेंप्रमाणें ह्या दिव्याचे वर्णन वाड भाग ७ पान १८० मध्यें दिलेलें आढळतें. गाईचे कातडें डोक्यास बांधून कृष्णेचे पाण्याचा चंबू हातांत घेऊन खऱ्या शिवेवर चालून जावयाचे हा दिव्याचा प्रकार स्मृतिग्रंथांत कोठें वर्णन केलेला आढळत नाहीं. परंपरागत रूढीस संमत असे कांहीं दिव्याचे प्रकार अस्तित्वांत असावे व त्यांपैकी हा एक प्रकार असावा असा तर्क होतो. दिव्य केल्यानंतर दिव्य करणारा दिव्यास उतरला किंवा नाही ह्याबद्दल उभयतां वाद्यांमध्यें वाद असल्यास कोणत्या प्रकारची तजवीज करीत असत ह्या बाबीचा हि ह्या उदाहरणावरून उत्तम प्रकारचा खुलासा होत आहे. व्यवहाराचे कांही नवीन बाबीसंबंधीं ज्ञात झालेली माहिती ह्याप्रमाणें नमूद करून मी हा लेख पुरा करतों.

भा. बा. भट

# मानभावोत्पत्ति

## लेखाकरितां वाचलेले ग्रंथ

### मानभावी

सांकेतिक लिपीतील:—

१ लीलासंवाद ( आनंदाश्रम प्रत ), २ लीलाचरित्र ( प्राचीन ), ३ गुंडम चरित्र, ४ चांगदेवचरित्र, ५ नागभट चरित्र ( कांहीं भाग ), ६ सूत्र पाठ, ७ चक्रधर दिनचर्यादि किरकोळ प्रकरणें.

असांकेतिकः—

१ फलटण–माहात्म्य, २ तीर्थावलि, ३ दर्शनप्रकाश, ४ मतिरत्नाकर, ५ ज्ञानसागर, ६ महानुभावपंथ, ७ रत्नमाल ( कांहीं भाग ).

इतरः—

१ श्री ज्ञानदेव गाथा, २ श्रीमुक्ताबाई गाथा, ३ नामदेव गाथा, ४ श्री नाथांचा गाथा, ५ महीपति बुवाकृत चांगदेव चरीत्र, ६ श्री ज्ञानेश्वर चरित्र, ७ केसरी वगैरे वर्तमानपत्रातील लेख व डा. भांडारकरांचे इंग्रजी पत्र, ८ सवाई माधवराव पेशवे यांची डायरी, ९ गोडबोलेकृत अर्वाचीन कोश, १० चरित्रें ( गुजराथी ).

## मानभावोत्पत्ति

शके १५३१ चे पूर्वी वैदिक धर्मानुयायी भगवद्भक्त श्री एकनाथ यांनीं असें म्हटले आहे—

" होउनी मानभाव । अवघा बुडविला ठाव ॥ १ ॥
॥ नाहीं चित्त शुद्ध गति । द्वेष देवाचा करिती ॥ २ ॥
॥ धरिती उफराटी काठी । रांडापोरें भोंदी वाटी ॥ ३ ॥
॥ नेसुनियां काळेपण । आंगा लाविती दूषण ॥ ४ ॥
एका जनार्दनी देवा । जळो जळो त्यांची सेवा ॥ ५ ॥"

एकनाथी गाथा अभंग १९६२

शके १७०४ चे सुमारास श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांनीं मानभावांचे बाबतीत व्यवहारनिर्णय केला आहे. त्यांतील उल्लेख असाः—

"मानभाव अति निंद्य, सर्वधर्मबहिष्कृत, चातुर्वर्णापासून निकृष्ट जातीपर्यंत कोणत्या हि जातीत नाहीत, व षड्दर्शनांत नाहीत, अविधिमुंडित, नीलांबर, ऐसे, यांचा उपदेश कोणत्या हि जातीनें घेऊं नये, घेतला असेल त्यांस बहिष्कार" सल्लास समानीन मया व अलफ ( ११८३ ) रजब ३ ( १५ जून १७८२ ) शनिवार जेष्ठ शु॥ ४ शक १७०४. पेशव्यांची डायरी भाग ८ पान २७२

'मातंगगजकेसरी' ह्या नांवाचा एक ग्रंथ आधुनिक मानभावास सम्मत, असा आहे; त्यांत मातंग पंथाची जी उत्पत्ति दिली आहे तिचा सारांश असाः—

---

१ हें लिहिल्यानंतर भा. इ. सं. मंडळाचे शके १८३७ चें इतिवृत्त हातीं पडलें. त्यांतील श्री. तात्यासो मेहेंदळे यांचा मानभावावरील लेख वाचनीय आहे.

२ आधुनिक मानभावाचे मतें ' मातंग पंथ ' व आपला ' मानभाव पंथ ' हे भिन्न आहेत; परंतु वस्तुतः तसें नसून हे दोन्ही पंथ एक च आहेत, असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

" मातापूरचा कोणी कृष्णभट होता, त्याचा गुरु तोरणमालचा कंथडीनाथ, त्यानें कृष्णभटास जारण-मारणादि शिकविलें व त्याबरोबर च मातंगीमंत्र हि दिला. परंतु कृष्णभट मातंग कन्येमुळें पतित झाला. त्यास तिचे पासून पांच मुलें झाली. तीं, दत्तो, ढगो, गुंडो, मेधो व चागो. चांगो हा अत्यंत सुस्वरूप व व्यभिचारी होता. त्याचा राजाज्ञेने शिरच्छेद केला गेला. "

गोडबोलेकृत अर्वाचीन कोश व गुजराथी भाषेत लिहिलेला चरित्र ग्रंथ यांत व इतर कित्येक हस्तलिखित बाडान मानभावांचें तिरस्कारदर्शक वर्णन केलेलें आहे अगदी अलीकडे बॉम्बे ग्याझिटीअर मध्यें मानभाव पंथाची स्थापना मातंग-कन्येपासून उत्पन्न झालेल्या पुरुषानें किंवा त्या मुलीशी सहवास करणाऱ्या तिच्या ब्राह्मण नवऱ्यानें केली आहे, अशा अर्थाचा उल्लेख केलेला आहे; म्हणजे मातंग-गज-केसरी मध्यें मातंग-पंथाची जी उत्पत्ति मानभावांस सम्मत अशी दिली आहे, ती च ग्याझिटिअर मध्यें मानभावांची म्हणून दिली आहे. ह्यावरून आजपावेतो मानभावासंबंधी आमच्यांत कोणती समजूत रूढ आहे इचें उत्तम प्रकारें दिग्दर्शन होतें. आमची मानभावांसंबंधी जी समजूत आहे ती साधार आहे. परंतु त्या आधाराचें दिग्दर्शन केलेलें आजपर्यंत कोठे हि पाहण्यांत आलेलें नाही. म्हणून मानभावांचें काय म्हणणें आहे ते लक्षांत घेऊन ऐतिहासिक सत्य कोणतें तें ठरविण्याचा आज उपक्रम करीत आहें. कोणत्या हि प्रश्नाची विचिकित्सा करण्याचे दोन मार्ग आहेत. एक बाह्य पुराव्याचा आधार घेऊन व दुसरा अंतर्गत पुराव्याच्या साह्यानें; पैकी दुसरा श्रेष्ठ. त्याचें च अवलबन ह्या पुढील विवेचनांत मी करणार आहें. मानभावांचे ग्रंथांवरून च मातंग-गज-केसरीमध्यें दिलेली कथा किंवा ग्याझिटिअर मध्यें दिलेले वर्णन हा च ह्या मानभाव पंथाचा खरा इतिहास आहे, असें मी या लेखानें सिद्ध करीत आहे.

मानभावांचे ग्रंथ कांही सांकेतिक लिपींत आणि इतर कांही असांकेतिक म्हणजे प्रचलित लिपींत आहेत. त्यांचे प्राचीन हस्तलिखित ग्रंथ बहुधा सांकेतिक लिपीत आहेत. त्यांतील संकेत एक प्रकारचा नसून अनेक स्वरूपाचा आहे. कित्येक ठिकाणी एका च शब्दांत कांही अक्षरे सांकेतिक व कांही असांकेतिक अशीं आढळतात; कित्येक सबंध एका शब्दाचे एकाक्षरी असे संकेत आहेत, तर कांही सबंध वाक्ये हि तशा च संकेतांत दिलेली आढळतात. इतरत्र सांकेतिक अक्षरांऐवजी संकेत चिन्हांचा च उपयोग केलेला आहे. संकेताचें असें भिन्न स्वरूप असल्यानें मानभावी प्राचीन ग्रंथ अत्यंत गूढ झाले आहेत व त्यांचें पठण करणे हि अत्यंत दुष्कर झालें आहे. आजपावेतों या पंथासंबंधी यथार्थ ज्ञान तत्पंथबाह्य लोकांस झालेलें नाहीं याचें कारण हा ' संकेत ' आहे. खुद्द मानभावांस हि त्यांच्या धर्माचें खरें स्वरूप कितपत

अवगत असेल ह्याची मला तरी दृढतर शंका आहे. ही शंका येण्याचें कारण असें की, प्राचीन मानभावी ग्रंथकारांनीं चरित्रवर्णनांत प्रथम पासून च बुद्धिभ्रम उत्पन्न व्हावा ह्या उत्तानपणें दिसून येणाऱ्या हेतूनें, सर्व च घोटाळा माजवून दिलेला आहे; आणि त्यामुळें सहज च सर्वत्र असंबद्धत्ता, धरसोडपणा, विचित्रता वगैरे दोष ह्या चरित्र–ग्रंथांत उपलब्ध होतात. अशा त्या ग्रंथांचें तौलनिक परिशीलन करून व बाह्य ग्रंथांचा आधार घेऊन सत्य काय आहे हे शोधण्याची बुद्धि व कुवत, अथवा इच्छा पाहिजे तर म्हणा, आधुनिक मानभावांत सार्वत्रिक नसावी हे सहज च आहे.

मानभाव ग्रंथांच्या वर वर्णिलेल्या दुर्बोधत्वामुळें कित्येक आधुनिक विद्वानांत हि त्या पंथाच्या मूळ स्वरूपाबद्दल अज्ञान वसत आहे असें दिसतें. म्हणून ह्या मानभाव पंथासंबंधी खुद्द मानभावांनीं आणि त्यांच्या ग्रंथांचें प्रत्यक्षेनें परिशीलन न केलेल्या आधुनिक विद्वानांनी जें मत दिलें असेल तें ह्या प्रश्नाचा निर्णय करण्यास असमर्थ म्हणून निरूपयोगी आहे हे उघड आहे. ज्यांस मानभावोत्पत्तीचा शोध करणे असेल त्याने मानभावी ग्रथाचे प्रत्यक्षतेनें परिशीलन करणें आवश्यक आहे. इतकें सांगून आतां मानभावांचें स्वतःसंबंधीं काय म्हणणें आहे तें देतों.

## मानभावांचा पक्ष

फलटणमाहात्म्य, दर्शनप्रकाश, लीलासंवाद, लीलाचरित्र, चांगदेवचरित्र, गुंडमचरित्र, सूत्रपाठ व तीर्थावलि ह्या मानभावी ग्रंथांचे आधारें त्यांचें काय म्हणणें आहे, ते साग्र देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे एक स्वतंत्र टीकात्मक ग्रंथ च लिहीणें आहे; इतका त्यांत परस्पर विरोध आहे. म्हणून त्या भानगडींत न पडतां स्थूल दृष्ट्या त्यांचें काय म्हणणे आहे ते देतों:— आपला धर्म–मुण्डीमार्ग, मुनिमार्ग, महानुभावपंथ– अनादि असून चक्रधर नामक अवतारी पुरुषानें त्याचे पुनरुज्जीवन केलें.

मुनिमार्ग होता उच्छेदिला । तो **प्रशांतें चक्रधरें** संस्थापिला ॥
**नागार्जुन** मुखें चालतां केला । महाराष्ट्रीं ॥ फ. म. ६० ॥

चक्रधर यानें मानभावांचा धर्म प्रथम च प्रस्तृत केलेला नसून त्याचे पूर्वी हि त्या धर्माचें अस्तित्व होतें. त्या धर्माचा उच्छेद झाल्याने

( १ ) चक्रधरानें त्याचें पुनरुज्जीवन केले. आपल्या धर्माचें अनादित्व पुढील वर्णनावरून मानभाव प्रस्थापित करतात.

( २ ) कृतयुगीं:— नारायण ऊर्फ चक्रपाणी, किंवा पिताधर्म्य

त्रेतीं:—नर ऊर्फ गुंडम, प्रभु, किंवा सदानंद

द्वापरीं:—प्रवर ऊर्फ कृष्ण किंवा वृषभ

कलींतः--प्रशांत ऊर्फ चक्रधर किंवा सिद्ध

हे भिन्न युगी ह्या पंथाचे पुनरुज्जविन करणारे भिन्न आचार्य झाले आहेत. ( द. प्र. पान ६१ ते ६३ ). तथापि या पंथाचा आद्यप्रवर्तक आत्रेयदत्त हा होता आणि म्हणून यास दत्तसांप्रदाय म्हणण्याचा हि प्रघात आहे. तेव्हां मानभाव पंथाचे-भिन्न युगीं कां होईना- प्रवर्तक दत्त, चक्रपाणी, गुंडम, कृष्ण व चक्रधर, हे पांच गणले आहेत. या पांचांस च आधुनिक मानभाव **पंचकृष्ण** असे एक समवायी नाव देतात.

" तया पांचा मिळून एक नांव । तें बोलिलों अति सुहाव ।
कृष्णपक्षीं अवतरला देव । म्हणोनि पंचकृष्ण ( द. प्र. ५९ )

" पंचकृष्ण " हें नांव आधुनिक मानभावांनीं दिलेलें आहे. कारण लीलासंवाद, लीलाचरित्र, किंवा सूत्रपाठ ह्या सांकेतिक लिपीतील प्राचीन मानभाव ग्रंथांत ' पंचकृष्ण ' हा शब्द कोठें हि उपलब्ध होत नाहीं. मला वाटते, चरित्र-वर्णनात उडविलेल्या घोंटाळ्यांतून मार्ग निघून सत्य काय आहे याची खूण बुजूं नये, म्हणून च कीं काय ' पंचकृष्ण ' हा शब्द त्यानीं प्रचारात आणिला असावा. ' पंचकृष्ण ' या शब्दांत केवढा गर्भित अर्थ भरला आहे, व तो किती यथार्थ इतिहास-सूचक आहे, हें मी पुढें दाखविणार च आहे, असो. वरील अवतरणावरून पंचकृष्ण ह्या शब्दाची मानभाव कशी उपपत्ति देतात, तें दिसनें च आहे. त्याचे मतें दत्त, गुंडम, चक्रधर, चक्रपाणी व कृष्ण हे पांच हि कृष्णपक्षात जन्मले असल्यामुळें त्यास 'पंचकृष्ण' हे नांव मिळालेलें आहे. ही मानभावी उपपत्ति केवळ असमाधानकारक आहे, इतकें च नव्हे तर ती मानभावांस विघातक हि आहे. मानभावी दत्ताचा जन्मकाल वैशाखांतील कृष्ण पंचमी हा असल्यानें ( द. प्र. पान ५९ ) सनातनधर्मीयांच्या मार्गशीर्ष शुद्ध १५ स जन्मलेल्या श्री दत्ताहून हा वैशाखांतील दत्त भिन्न असला पाहिजे, हें उघड आहे आणि मग आम्ही दत्तोपासक आहोंत; आमचा व वैदिक धर्मानुयायी हिंदूंचा दत्त एक च आहे, असें जें आधुनिक मानभावांचें म्हणणे आहे तें सर्वथैव खोटें ठरतें. केवळ

---

१ येथें 'चक्रधर' असें म्हटलें आहे. परंतु या च ग्रंथांत पुढे नारायण चक्रपाणी यानें ही कामगिरी बजाविली आहे असें पर्णन आहे. हा चक्रधर-चक्रपाणी यांतील घोंटाळा वाचकानी पूर्णपणे लक्षात वागवावा.

२ इतर कांहीं ठिकाणीं प्रत्येक युगी दोन दोन प्रवर्तक झाले आहेत असें वर्णन आहे:--कृतीं--हंस, नारायण; त्रेतीं- दत्त, नर; द्वापरीः--कृष्ण, ऋषभ; कलीः-- प्रशांत, चक्रधर. मुळांत दिलेल्या कथेंत व येथें उल्लेखिलेल्या कथेंत किती विरोध आहे !

नांवाच्या सारखेपणावरून व्यक्तींचें हि सादृश्य सिद्ध करूं पाहण्याच्या त्यांच्या ह्या प्रथम प्रयत्नास आपत्ति उत्पन्न होते. तेव्हा मानभावांनी 'पंचकृष्ण' या शब्दाची वर दिलेली उपपत्ति एक तर निव्वळ खोटी तरी असली पाहिजे, किंवा वैदिक धर्मानुयायांच्या व त्यांच्या दत्तांतील भासणारा एकीभाव तरी मिथ्या असला पाहिजे हें उघड आहे. तिसरा हि एक पक्ष असा आहे की, ह्या दोन्ही मिथ्या असूं शकतील. हा तिसरा पक्ष च खरा आहे, असें पुढील विवेचनावरून वाचकांचे ध्यानीं येईल. गुंडम-चरित्रावरून असें स्पष्ट दिसते की, दत्त ही देवता नसोन कलीत गुंडम, चक्रधर आणि त्यांचा शिष्य जो नागदेव किंवा भटोबा अथवा ज्यास वानरेय हि म्हणत असत, त्यांचा समकालीन व संबंधी असा कोणी एक पुरुष होता. गुंडमाने आपल्या मरणसमयीं जवळ असलेल्या नागदेव भटास "माझें मरण जवळ आलें माझ्या मरणानंतर तूं दत्ताकडे जा." असे निरविलें असतां त्याने उत्तर दिले की "एकाचा ( चक्रधर[1] ऊर्फ चक्रपाणी याचा ) मीं अंत पाहिला; हल्लीं आपला पाहात आहे, आणखी तिसऱ्या ( दत्ता ) कडे मला पाठवूं नका." यावरून नागदेवानें ज्याचा अंत पाहिला व ज्याचा तो पाहात होता, आणि नंतर ज्याकडे त्यास पाठविलें जात होतें हे तिन्ही पुरुष नागदेवाचे समकालीन होते. तसें च प्रथम चक्रधराचा शिष्य म्हणून त्याचे जवळ राहून त्याचे मरणानंतर गुंडमाची शिष्यवृत्ति[2] ज्यानें पत्करिली त्यास च पुढें तिसऱ्याकडे जाण्याची आज्ञा झाली; यावरून ह्या तिन्ही व्यक्ती कोणत्या तरी एका प्रेमाच्या बंधनानें परस्पराशी बद्ध होत्या असें हि दिसतें. हे बंधन कोणते होते त्याचा खुलासा पुढे होईल च. तेव्हां मानभावांचा दत्त पौराणिक अत्रीचा मुलगा नसून गुंडमासारखा च कोणी दत्त नांवाचा मानभावांस पूज्य असा पुरुष होता, हे निश्चित आहे.

पंचकृष्णाचे अवतरण ज्या ग्रंथावरून दिलें आहे त्या ग्रंथाचे मतें मानभावी पंचकृष्ण म्हणजे दत्त, चक्रपाणी, गुंडम, कृष्ण व चक्रधर हे होत. परंतु ज्या कोणास मानभाव पंथाची दीक्षा घेणें असते त्यास दीक्षेपूर्वी जे पांच मंत्र म्हणावे लागतात (म्हणजे ज्या पाच पुरुषास नमन करावें लागतें किंवा मी या पांचांस च मानतों इतरांस मानीत नाहीं असें कबूल करावें लागतें ) ते हे:—

१ द्वापरी श्री कृष्ण चक्रवर्ती गोसावी यांचे चरणाशरण

२ द्वारावति श्री चांगदेव राऊळ गोसावी याचे चरणाशरण

३ सह्याद्रि श्री दत्तात्रय प्रभु गोसावी याचे चरणाशरण

---

१ चक्रधर व चक्रपाणी हे एक च आहेत असें फलटण-माहात्म्यांतील उताऱ्यावरून आपण पाहिलें च, पुढें हि मी ते सिद्ध करीत आहें. २ चक्रधर जिवंत असतांना च त्याचे शिष्य गुंडमाकडे तो काही दिवस पाठवीत असे, असें चरित्रावरून दिसतें. पद्दा लीला ४११.

४ रुद्रपुरी श्री गुंडम राऊळ गोसावी यांचे चरणाशरण
५ प्रतिष्ठानी श्री चांगदेव राऊळ देवांचे चरणाशरण

( ज्ञानसागर )

या नमनांत चक्रधराचें नांव मुळीं च आलेले नाही. वस्तुतः भैरवादि देव नव्हत. 'चक्रधर हा देव, वेद विद्या ज्ञानसाधन साध्य धर्म आनद ही सर्व च्युतिमंते, चक्रधर हा अच्युत, ब्रह्मांडाते देवाते रक्षिता उद्धरिता, असे ज्या चक्रधराचे लीलासंवादांत वर्णन केलें आहे, ज्यास मानभाव धर्मसंस्थापक म्हणतात, त्या चक्रधराचे नांव हि दीक्षाकालीं उच्चारिलें जाऊं नये हें केवढे आश्चर्य आहे ? त्याचा नामोच्चार नसून चांगदेव याचें नांव मात्र दोनदां आले आहे, तेव्हां हा काय मानभावाचा प्रमाद म्हणावा ? पण तें संभवत नाही. तेव्हां हे कांही तरी गुह्य असले पाहिजे आणि ते उकलण्यात च मानभाव-पथाचा सर्व इतिहास भरला आहे. तेव्हां ते गूढ आता आपण उकलूं म्हणजे अनायासे च आपणांस मानभावाच्या ' पचकृष्णाचा ' आणि पर्यायाने त्यांच्या पंथाचा इतिहास अवगत होईल.

वर दिलेल्या नमनांत प्रतिष्ठानीचा एक व द्वारावतीचा एक असे दोन भिन्न चांगदेव दिले आहेत. याचें कारण, हे वस्तुतः दोन भिन्न होते हे नसोन, पंचकृष्णाची पांच ही संख्या पूर्ण करणें होती हे आहे. मग चक्रधराचे नांवाचा उल्लेख करून तिची पूर्तता झाली असती. तसे कां केलें नाही ? याचें कारण मानभावांची विस्मृति हें नसोन चांगदेव–चक्रधर हे एक असून, त्या पंच कृष्णापैकीं एकाचे नांव गाळावयाचे होतें हें आहे. तो गाळलेला पुरुष कोण तसें च चागदेवाचे नाव दोन वेळ कां ! या प्रश्नांची उत्तरं देणें म्हणजे च मानभावांच्या गडबडगुंड्याचा खुलासा करणें आहे.

लीलासवाद व लीलाचरित्र या दोन चरित्रात मानभाव ग्रथकारांनी दोन भिन्न सांकेतिक चिन्हाचा उपयोग केलेला आहे उद्देश कांही हि असो परन्तु या भिन्नत्वाचा फायदा मात्र आधुनिक मानभावास घेण्यास फार सोईचे झालें. त्यांचे म्हणणें असें की, लीलासंवाद यात **चक्रधर** याचें चरित्रवर्णन केले आहे व लीला-चरित्रांत **चक्रपाणी** याचें चरित्रवर्णन आहे. परंतु हा केवळ बुद्धिभ्रम आहे.

**चक्रधर** हा च **चक्रपाणी** होय. एका च व्यक्तीची हीं पर्याय नामे आहेत. लीलासंवाद व लीलाचरित्र हे दोन्ही ग्रंथ एका च व्यक्तीचे चरित्रवर्णन करीत असोन त्यापैकी ' संवाद ' हा

---

१ ' दर्शनप्रकाश ' व ' फलटण–माहात्म्य ' या दोन ग्रंथांवरून असें स्पष्ट दिसून येईल कीं ' चक्रपाणी ' हें चांगदेव याच नांव होते व तें त्याचे आईचे नवसाचें होतें. तेव्हां चांगदेव यास च चक्रपाणी म्हणत असत.

पूर्वार्ध व ' चरित्र ' हा चरित्राचा उत्तरार्ध आहे. आधुनिक मानभाव ग्रथकारांनी हा ' मतिभ्रम ' पूर्णतेस जावा म्हणून ' चांगदेव ( चक्रपाणी ) चरित्र ' म्हणून एक स्वतन्त्र ग्रंथ च निर्माण केला आहे. वस्तुतः चक्रधर ( चक्रपाणी ) याचे चरित्रास आरंभ कसा झाला हें ' संवादांत ' दिले आहे व त्याचा शेवट कसा झाला तें ' चरित्रांत ' दिलें आहे; परंतु हा चक्रपाणी ( चक्रधर अथवा चांगदेव ) याचा अंत सर्वांस गम्य होऊं नये म्हणून मानभावांनी जो अत्यंत अट्टाहास केला आहे तो कां, हे विवेचन वाचल्यावर सहज च अवगत होईल. सध्या मी माझे विधानास ( चक्रधर—चांगदेव—चक्रपाणी एक च ह्मास ) प्रमाणे देतोः—

पतितो थापन स्वीकारे ॥ ही एक लीलासंवादांत पहिली लीला आहे. तीः—

" चक्रधर हिमालयी राज्य करित होते तेथे चक्रधराचे दर्शना **ई, ळी** पेणें केलें एका विवरी दर्शन जाले इ, ळो, चक्रधरें तुम्ही कामाक्षी निमित्ते पुर ( देह ) त्यजुनी हे यथिचे ( माझें ) पुर अगिकरावे हे पुर ये विवरी परित्यजूनि एथौनी **भरवसीं** प्रधान पुत्राचे पतित ( शव ) उठविजैल मग केतुलया एका काळा चक्रधरें तें पुर हिमालयी विवरी परित्यजूनि भरवसे गुजरातेचया प्रधान पुत्राचें पतित आत्मीय केलें."

या कथेचा भावार्थ असा आहे की, चक्रधर हा हिमालयांत असतां ई, ळ, नांवाचा एक पुरुष त्याचे भेटीस गेला. तेव्हा चक्रधरानें ई ळा स आज्ञा केली की, कामाक्षी या स्वीकरितां तुम्ही आपलें शरीर टाकून देऊन या माझ्या शरिरांत प्रवेश करावा. माझें हें शरीर येथे च हिमालयी ठेवून भडोच येथील मेलेल्या प्रधान पुत्राचे शवांत मी प्रवेश करणार आहें. या संवादांतील लीलेवरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही की, चक्रधराचा जन्म गुजराथेत भडोच येथे झाला. आतां लीला-चरित्रांत ( चक्रपाणी ) चांगदेव स्वतःसंबंधी काय म्हणतो तें पाहाः—

आऊसा नेत्र दीपु अनुवादु ॥

" विचारिले जी, जी, कैसें, आमचे या चांगदेवाचे डोळे बरवे तैसांचि गुजरातेचे या माणसाचे उत्तरीलें बा गुजरातेत डोले याचे दीप की, या उत्तरीले हे पूर्वी गुजरातेंत भरवसी होते उपनलें वाढीनलें" या लीलेवरून चांगदेव ( चक्रपाणी ) आपण गुजराथेंत भडोच शहरीं उपजलों, वाढलो व राहिलो असें स्पष्ट म्हणत आहे; आणि लीला-संवादांत चक्रधर भडोच शहरीं जन्मला असें वर दाखविलें च आहे. यावरून चक्रधर व चांगदेव ( चक्रपाणी ) ही एका च पुरुषाचीं दोन नांवे होती असें स्पष्ट होते; अथवा चक्रपाणी याचा चक्रधर हा केवळ पर्याय शब्द आहे, असे दिसतें. तथापि एका च शहरी दोघे जन्मले म्हणजे ते एक च असावे असा काही नियम नाहीं, ही शंका राहू

नये म्हणून आणखी पुरावा देतों

लीलासंवादांतील ६१ वे लीलेंत चक्रधर व गुंडम यांची परस्पर भेट वर्णन केली आहे. तेथे " मग चाटे यार्चा सूत बडबडवितो मोगरी, होती तें ई करी घेऊनी आले मग विचारिलें आवो मेला जाये एथींचें ऐश्वर्य विदित करताये म्हणे प्रकट, करताये म्हणे म्हणौनि. चक्रधराच्या पृष्टी भागावरी हळुहळु बद् बद् करी दोनी तिनी घाये दीधलें "

या कथेचा इत्यर्थ इतका च की, लीलासवादांतील चक्रधर याची व ऋद्धपूरचा गुंडम राऊळ याची भेट झाली असतां गुंडमानें चक्रधराचे पाठीवर बुद्, बुद् शब्द उठेल अशी मोगरी मारिली.

लीलाचरित्रात ।। गुरुप्रसंगे वाचा अनुवाद ।। ४५० हि लीला अशी आहे.

" विद्वांसु एकुं ( चक्रपाणीचे ) चांगदेवाचेया दरिसनासीं आला होता तें-ही चांगदेवां पुसिलें जी, जी, चांगदेवाचे गुरु ते कवण उत्तरिलें हें गुरु नेणें श्री प्रभु थांप एकीं घेतलीं तें हे आठवूनि असे तथा "**मोगरी**". लीलाचरित्रांत ज्या चांग-देवाचें चरित्र वर्णन केलें आहे तो, आपणास गुरु कोणी नसून श्री प्रभु म्हणजे गुंडम याची मोगरी हा च आपणांस प्रसाद झाला असें म्हणतो. लीलासंवादांत चक्र-धराचे पाठीवर गुंडमानें मोगरी मारिली असा उल्लेख आहे. तेव्हां चरित्रांतील चांगदेव चक्रपाणी हा च लीलासंवादांतील चक्रधर आहे हें उघड आहे.

लीलाचरित्र लीला ३०० यांत ( चक्रपाणी ) चांगदेव यांवर त्याची आऊबाइ नांवाची शिष्यीण कांही ओंव्या म्हणते. त्या ओंव्या अशाः—

गोमतिये तीरी । निळीयां गुढुरां ।
राजेया गूजरा । श्रीचक्रधरा ।। १ ।।
निळा गुंढरु । राजा गूजरु ।
मंडपी माडवी । श्री **चक्रधरा** ।। २ ।।
राज्य करूनि मग । गोमटे मांजिटे ।
आखे कुडीचे । राजेया दौंडीचे श्री **चक्रधरा** ।। ३ ।।
अंग गोरे बाइया । डवारिया चंदनें ।
**चक्रधरा** क्षणें । दृष्टि होये ।। ४ ।।

यावरून लीलाचरित्रांतील चक्रपाणी चांगदेव याची शिष्यीण त्याची जी प्रशस्ति करते तींत ती त्यास ' चक्रधर ' ह्या नावानें संबोधिते.

लीलासंवाद लीला १२७ इच्यांत, चक्रधर यास विषप्रयोग झाल्यामुळें त्याचे आंगावर फोड उठले होते ते मावळल्यावर त्याचे शिष्यांनीं त्यास आरती केली, असें वर्णन आहे. ती आरती हीः—

जय तु मंगल मंगला । म्हणौनि केली ओवाळणी ।
परमानंदा ई **चक्रपाणी** । जीवाचया जीवना ।।

जो लीलासंवाद ' चक्रधराच्या ' लीलांचें वर्णन करतो, त्या च संवादां चक्रधराचे शिष्य त्यास ' चक्रपाणी ' म्हणून आळवितात; हे एक च प्रमाण 'चक्रधर व 'चक्रपाणी' हे दोन नसून एका च व्यक्तीचीं ही दोन नांवें होती हें सिद्ध करण्यास पुरेसें आहे.

फलटण माहात्म्यांतील वर दिलेल्या उतान्यावरून असें स्पष्ट होतें कीं ' चक्रधरा' नें मानभावधर्म उच्छेदिलेला महाराष्ट्रांत पुनः प्रवृत्त केला. परंतु त्यांत च पुं असें वर्णन आहे कीं, ही कामगिरी ' दत्तानें ' चक्रपाणी ( नारायण ) याजवर सोंपविली होती व ती त्यानें आपले भावाचे आज्ञेप्रमाणें बजाविली. तेव्हां या ग्रंथावरू हि ' चक्रधर ' ' चक्रपाणी ' ही दोन्ही नांवें एका च व्यक्तीची होती हे उघड आहे

या सिद्धीस आणखी प्रमाणें हवीं असल्यास ' लीलासंवाद ' व ' लीलाचरित्र यांतील चक्रधर, चक्रपाणी यांचें स्वभावसाम्य, चरित्रसाम्य व शिष्यसाम्य ही पाहिलं म्हणजे झालें. असो.

तेव्हां चांगदेव, चक्रपाणी व चक्रधर हे वस्तुतः एक च असल्यानें चक्रधराच उल्लेख नमनांत कां नाहीं या प्रश्नाचें उत्तर आपणांस मिळालें. परंतु चांगदेवाचें नां दोन वेळां कां ? आणि मानभावांच्या म्हणण्याप्रमाणें जर त्यास पांच इसम पूज्य हो तर मग वरील नमनांत गाळलेला पांचवा इसम कोण ? हे प्रश्न सहज च उद्भवतात पैकी पहिल्या प्रश्नाचें उत्तर इतकें च की, पांचवा गाळावयाचा होता म्हणून चांगदेवाचा दोनदां उल्लेख केला आहे. आतां तो गाळला कोण याचा विचार करूं.

वरील नमनांत ज्या ४ इसमांचा उल्लेख केलेला आहे ते पुरुष हेः—दत्त, गुंडम कृष्ण व चांगदेव. तेव्हां मानभावांच्या म्हणण्याप्रमाणें पांचांची भरती करण्यास आणखी एका पूज्य पुरुषाचा उल्लेख त्यांच्या पुरातन ग्रंथांतून कोठें तरी सांपडणे अवश्य आहे. तसा तो सांपडतो कां पाहूं:—लीलासंवादांत ई, ळ या पुरुषाचा वारंवार उल्लेख येतो; इतकें च नाहीं तर प्रतिष्ठानीच्या चक्रपाण्याहून म्हणजे चक्रधराहून व गुंडमाहून तो भिन्न होता व तो द्वारावतीचा होता, असा त्या ग्रंथांत स्पष्ट उल्लेख आहे. ( पहा लीलासंवाद लीला—२, ३७, ६९ व चरित्रलीला ४०३।४४५) तसें च चक्रपाणी ( चक्रधर ) व गुंडम यांप्रमाणें च हा ई ळ हि लोकांस ( खराट्यानें व सुपानें हाणून ) विद्यावंत करीत असे. त्याची परकायाप्रवेशाची विद्या तर वरील पहिले लीलेंत दिली च आहे. तसें च ज्याप्रमाणें चक्रधरास (चक्रपाणी यास) अगर गुंडमास ' ईश्वर ' हें उपपद लावीत, तसें च त्यास हि मानभाव ग्रंथकारांनी लाविलें आहे, यावरून तो त्यांस पूज्य हि होता. या ईळाची, चक्रपाण्याची व गुंडमाची परस्पर भेट झाल्याचा हि उल्लेख त्यांचे ग्रंथांत असल्यानें हा त्यांच्या सम-

वंत व उपदेश करण्यास समर्थ अशाचें नांव पंचकृष्णांत येणें अवश्य होतें व तें द्वारावती एवढी खूण ठेवून त्या पंचकृष्णांत मानभावांनीं गोविलें हि आहे. फक्त ई, ळ हें नांव गाळून त्याचे जागी चांगदेवाचें दुसऱ्यांदा घातलें; परंतु तेथें एक द्वारावतीचा व एक प्रतिष्ठानीचा असा भेद खूण म्हणून राखून ठेविला. असला गडबडगुंडा करण्याचें कारण काय, हे ई, ळ या सांकेतिक शब्दाचा बोध आपणांस झाला म्हणजे स्पष्ट होईल. या ईळाचें नांव पंचकृष्णांत गोविलें म्हणजे ते दत्त, गुंडम, कृष्ण, ई ळ व चांगदेव असे पांच होतात. ई, ळ हें उघड सांकेतिक आहे. तो संकेत काढून त्याचे खरें नांव कोणतें हें आतां पाहूं.

मानभाव आपल्या सर्व प्राचीन सांकेतिक ग्रंथांत ई हें एकाक्षर ' ईश्वर ' या शब्दा ऐवजीं उपयोजितात. जसें ई मुकुटी, ई करी म्हणजे ईश्वरमुकुटीं, ईश्वरकरी इत्यादि. तेव्हां ई, ळ, यातील ' ई ' हा संकेत काढला तर ईश्वर ळ असें त्याचें रूप होतें. ' ळ ' हा संकेत लीलासंवादांत 'ढ' चे ऐवजीं दिलेला आहे तेव्हां ईश्वर ळ म्हणजे ईश्वर ढ असें होतें.कोणत्या हि शब्दा ऐवजी त्याचें आद्याक्षर किंवा अंत्याक्षर घालण्याची मानभावांची नेहमींची पद्धत आहे. जसें त–तर, ष–पुरुष, प–परंतु, ब्रा–ब्राह्मण; हें आपणास माहित आहे. तेव्हां या पद्धतीस अनुसरून ईश्वर ढ म्हणजे ईश्वर कोणी असा एक पुरुष की ज्याचे नावाचें अद्याक्षर किंवा अंत्याक्षर ' ढ' हें आहे. आता मातंगगजकेसरी अथवा बॉम्बे ग्याझिटिअर यांत दिलेल्या मातंगपुत्रांच्या कथेकडे आपण दृष्टि दिली तर आपणांस असें दिसून येईल कीं, मानभाव ' पंचकृष्णां ' पैकी दत्त, गुंडो, चांगदेव व कृष्ण ही नांवें, मातंगीशी रममाण होणाऱ्या कृष्ण भटाच्या स्वतःच्या व त्याच्या तीन पुत्रांच्या नांवांशी अगदीं तंतोतंत जुळतात. त्या च पुत्रांत, एक **ढगो** या नांवाचा हि कृष्णपुत्र मांतगगजकेसरीनें दिला आहे. तेव्हां ' ढ ' हा संकेत ढगो या च नांवाचा आहे, हें निःसंशय होतें. तेव्हा मानभावांचे परम पूज्य पुरुष, संवाद व चारित्र यांवरून त्यांचा वरील संकेत काढल्याने जे आपणांस उपलब्ध होतात ते, दत्तो, ढगो, गुंडो, कृष्ण, व चांगदेव हे होत. मानभावांच्या या पंच कृष्णांत आणि मातंगगजकेसरीतील कृष्णभट व त्याचे चार पुत्र यांच्यांत असलें विलक्षण नामसादृश्य पाहून सहज च '**ते च हे**' असें अनुमान काढण्याकडे प्रवृत्ति होते. आणि ह्या विलक्षण साम्याचा बोध होऊं नये व मातंगीपासून आपल्या पूज्य पुरुषांची उत्पत्ति आहे हें सर्वश्रुत होऊं नये म्हणून ई, ळ इत्यादि संकेतांचा मानभावांनी उपयोग केलेला आहे असें वाटतें. व ई ळ याचा पुढें समूळ लोप करून त्याची खूण म्हणून केवळ ' द्वारावतिकार ' येवढें च पद पंचकृष्ण-नमनांत त्यांनीं ठेविलें असें दिसतें. ई, ळ म्हणजे ढगो आणि चांगदेव चक्रपाणी म्हणजे च चक्रधर असा एकदां उलगडा झाला म्हणजे पंचकृष्णाचे बाबतींत उत्पन्न होणारा सर्व संशय व घोंटाळा दूर होतो.

मानभावी पंचकृष्णाचें मातंगगजकेसरींतील कृष्णभट व त्याचे पुत्र यांच्याशीं जें मीं साम्य वर दिलें आहे, तें केवळ नामसाम्य आहे. हें जरी खरें तरी असें हें सादृश्य केवळ काकतालीयन्यायानें असणे असंभवनीय आहे. जीं नांवें पंचकृष्णाची तीं च कृष्णभटाचे कथेंतील पितापुत्रांची असावी. परंतु त्या व्यक्ती मात्र भिन्न असाव्या हें सभवत नाहीं. तशांत ढगो, गुंडो, हीं नांवें अशीं आहेत कीं, तीं सामान्यतः सर्वत्र आढळून येण्यासारखी नाहीत, आणि म्हणून मानभावी पंचकृष्ण च मातग–पितापुत्र आहेत या अनुमानास विशेष जोर येतो. तशांत मानभावी 'संवादांवरून' व 'चरित्रा' वरून हे सर्व समकालीन होते, हें पाहून तर तें अनुमान सिद्धांतपदास जातें. हा सिद्धांत ध्यानांत ठेविला म्हणजे मग मानभाव ग्रंथकारांनीं या चौघांचा काल व त्यांचे कुल हीं भिन्न होतीं असें दाखविण्याचा असंबद्ध व परस्पर विरोधी अशा कथारूपानें का प्रयत्न केला व अत्यंत क्लिष्ट असे संकेत कां उपयोजिलें याचें चांगलें समाधान होतें. तथापि, नामसादृश्यावरून च केवळ मानभावी दत्तो, ढगो, गुंडो, व चागो, हे च कृष्णभटास मातंगी पासून झालेले दत्तो, ढगो, गुंडो, व चागो होते, असा सिद्धांत करून ह्या विषयाची पूर्तता करण्याचा माझा विचार नाही; तर नामसादृश्याहून अधिक स्पष्टतेनें खात्री पटविणारें जे चरित्र-साम्य तें मानभावांच्या च ग्रंथांतून देऊन वरील प्रमाणास मी आतां पुष्टि देतों:—

मातंग–गजकेसरीत चांगदेव हा व्यभिचारी होता असें वर्णन आहे. लीला-चरित्र व लीलासंवाद ( म्हणजे चक्रधर अथवा चक्रपाणी ह्याचे चरित्राचा पूर्वार्ध व उत्तरार्ध ) यांत चक्रधर या नांवानें किंवा चांगदेव चक्रपाणी या नांवानें ज्या लीला वर्णन केल्या आहेत, त्यांचा साकल्यानें विचार केला तर असें दिसून येईल कीं, त्यांचा बहुतेक भाग अश्लील असा आहे. त्या सर्व लीला येथें देणें शक्य नसल्यांन चरित्रांतील अत्यंत अश्लील अशा कांहीं देतों:—

४९ कामक्षी सोवासनी मिरविणें
१५८ साधा जलक्रिडे बोलाविणें
२३३ रात्री क्रिडे साधा नमस्कारुं
२७७ हंसराजा ( स्त्री ) भेटी
३४७ कान्हा वहाडिये वेवादुविती सामर्थ्यकथनम्

या लीलांवरून शिष्यांत हि योगाचे पांघरुणाखाली व्यभिचार होत असे असें स्पष्ट दिसते.

३५७ दांईबा प्रती विषय भोगुं निरोपणें
३८५ धानाई कास घालणे

३९९ पण्या स्त्री बटिका अनुवादु

४०७ उमाई नमस्कारें अगुंठा लावणे

४३७ नागराऊळां भुवनीं पांगडे भूषण धरण

४३८ छाया गोपाळीं स्त्रीभूषण स्वीकारुं

४४२ गंधर्वपाति निरोपणें

४७७ नग्न भय चकित आउसा स्मशानीं बैसणें

४७८ नग्न आउसा करवी नग्न मुनियां क्षेमालिंगन देवविणे

४७९ नग्न आउसी नृती करणी रात्री करणें

४८० आउ बडवे घास घेणे

( या लीलेंत आउ या स्त्रीचें मागून येऊन नागदेवाने चुंबन घेतले. तिनें चांगदेवाजवळ सांगितल्यावरून ह्या गुरूने आपले शिष्यांस मोठा घास ! (मोठे चुंबन) घेऊं नको असें सांगितले. ( येथें मोठे चुबन याचें विशदीकरण न करणें बरें असो. ) ह्या लीला येथें देण्याचें कारण असें की, मातंगगजकेसरीतील मातंगीपुत्र चांगदेव व लीला-चरित्रांतील मानभावी चांगदेव ( चक्रपाणी ) याचे नुसते नामसादृश्य आहे असें नव्हे; तर स्वभावसादृश्य हि आहे, हें स्पष्ट व्हावें. मातंगी पुत्र चांगदेव हा व्यभिचारी होता हें मातंगगजकेसरीवरून मानभाव दाखवितात. त्यांचा चागदेव व्यभिचारी होता हें त्यांच्या च ग्रंथांतील वर दिलेल्या लीलांवरून दिसतें परंतु ह्या चरित्रसाम्यांतील आणखी एक अत्यंत चिनमोल अशी अखेरची मात्रा मानभावास देऊन त्यांच्या चांगदेवाचें सत्य स्वरूप वाचकापुढें माडितों; म्हणजे मातगीपुत्र चांगदेव हा च मानभावांचा चांगदेव हे निःसंशय सिद्ध होईल. मातंगगजकेसरींत चांगदेव याचा व्यभिचाराचे आरोपावरून राजाज्ञेनें शिरच्छेद झाला असें वर्णन आहे.

लीलाचरित्रांतः- मढादौत्ति आसनः षः आवेव गुपित करणें ।। ह्या आदीची ४९४ वी एक लीला आहे. ती साग्र येथें न देता तिचा गोषवारा मात्र स्वतःचे शब्दांत देतोंः—

नागांबा ( शिष्यीण ) प्रतिष्ठानास बाजार करण्यास गेली असतां मागें ( चक्रपाणी ) चांगदेवांस धरण्यास शस्त्रधर असे राजपुरुष आले. त्यांस भटोबानें ( नागदेवानें ) मोठ्या आवेशानें अडथळा केला. परंतु त्यास न जुमानतां त्या राजपुरुषांनीं चांगदेवांस चतुर्भुज करून राजद्वारीं नेलें. तेथे सभा बसली ( पंच जमले ). त्या सभेंत " महाजन विद्वांस, पुराणीक, संन्याशी, ब्रह्मचारी, क्षेपणीक, नाथपंथीचे ऐसें अवघे मीनले " नंतर राजाज्ञेनं चांगदेवावर व्यभिचाराचा आरोप ठेवण्यांत आला व सभाजनानुमतें तो शाबीत हि झाला. तेव्हां, " धरा, धरा, मारा, मारा,

अशी राजाज्ञा झाली. ३६ धेड्यांनी ( किंवा धेड्यांनीं ३६ ) प्रहार चांगदेवावर केले. या शस्त्रप्रहारानी या मानभावी चांगदेवाचे हस्तपादादि छेदन झाले, असें पुढील लीलावरून व 'पुरुष अवेव गुपित करणें' या लीलेंतील आदीवरून दिसतें.

व्यभिचाराकरिता ज्याचे हातपाय तोडिले आहेत, अशा ह्या मानभावी चांगदेवाची, व्यभिचाराकरिता च राजशासन भोगणाऱ्या कृष्णभटास मातंगी पासून झालेल्या मातंगगजकेसरीतील चांगदेवाशी तुलना केली असतां एक च गोष्ट निष्पन्न होते ती ही की, **मानभावी चांगदेव हा च कृष्णभटास मातंगी पासून झालेला चांगदेव होय.** मातंगगजकेसरींतील कृष्णभटास चांगदेव म्हणून पुत्र होता व त्यास व्यभिचाराकरिता राजदंड भोगावा लागला ह्या गोष्टीचा, मानभावानी आपल्या चांगदेवाहून हा चांगदेव भिन्न आहे, असें दाखविण्यास कां होईना, आपले ग्रंथांतून अनुवाद केला असल्यानें त्यांस ती कथा सम्मत आहे. आणि वर जी मी आता ४९४ वी लीला दिली आहे, ती हि पण मानभावांच्या च सांकेतिक लिपींत लिहिलेल्या लीलाचरित्राच्या म्हणजे चक्रपाणी किंवा चांगदेव अथवा चक्रधर ह्याच्या चरित्राच्या उत्तर भागातून च उद्धृत केली आहे. तेव्हां या दोन चांगदेवाचे याहून अधिक चरित्र-सादृश्य ते काय दाखवावयाचें! याप्रमाणें नाम-सादृश्यावरून व चरित्र- सादृश्यावरून मानभावी चांगदेव हा मातंगी पुत्र होता हें निश्चित होते. तसें च जर चांगदेव ( मानभाव पंचकृष्णापैकीं एक ) हा मातंगी पुत्र होता हें निर्विवाद आहे; तर मग इतर जे त्याचे समकालीन व त्याचे निकट संबंधी गुंडम, ढगो, व दत्तो ( ज्याचे इतर मातंगी पुत्रांशी नामसादृश्य आहे ते ) कोण होते, हे आतां निराळे स्पष्ट करण्याची आवश्यकता नाही. तेव्हां दत्तो, ढगो, गुंडो, व चांगो हे मानभावी चार कृष्ण हे च मातंगीपासून कृष्णभटास झालेले दत्तो, ढगो, गुंडो व चांगो ह्या नांवाचे चार पुत्र होत, हे निःसंशय सिद्ध होतें. हा इतिहास गूढ राहावा म्हणून च मानभाव ग्रंथकारांनी सांकेतिक लिपीचा व चिन्हांचा उपयोग केलेला आहे. तसें च त्यांनीं वेळोवेळी ज्या "आपलें मतांच्या नाना प्रकारें नवीन चाली पाडल्या" त्यांचें हि रहस्य ह्या इतिहासांत च आहे. पंचकृष्ण हें जें नांव मानभावानी आपले पूज्य पुरुषास दिलें त्या नांवाची हि उपपत्ति या च इतिहासांत आहे. पंचकृष्ण हें समवायी नांव कृष्ण पक्षांत हे जन्मले म्हणून नव्हे; तर हे चार कृष्ण पुत्र होते, म्हणून पडलें असें म्हणणें युक्तीस धरून आहे.

वस्तुतः हा विषय येथें संपविला तरी आतां चालेल. तथापि दत्तो, ढगो, गुंडो व चांगो हे मानभाव मातंगी पुत्र असून त्यांचा पिता कृष्ण होता हा इतिहास दर्शविणाऱ्या आणखी ज्या कित्येक सूचक लीला, लीलासंवाद, लीलाचरित्र व सूत्र-पाठ यांत आहेत; त्यांचें येथें आतां किंचित् दिग्दर्शन करतोंः—

लीला चरित्रांतील ४९७ वी लीला

॥ भटां पातलेपण अनुवादु ॥

ही आहे. ह्या लीलेंत चांगदेव हस्तपाद विरहित होऊन मरणोन्मुख झाला असतां **कृष्णभट** ह्या नांवाचा कोणी एक ब्राह्मण त्याचे समाचारास आला असें वर्णिलें आहे. ह्या कृष्णभटाची तीन वेळ बोळवणी केली असतां हि त्याचे चांगदेवास सोडून न जाणें, चांगदेवाची ती दुःसह स्थिति पाहून त्याची गहिंवरलेली स्थिति व अविरल अश्रुपातानें युक्त अशी स्निग्ध परंतु शून्य दृष्टि इत्यादि वर्णन वाचून हा कृष्ण भट दुसरा कोणी नसून, आपल्या पुत्राची ती हीन स्थिति दुर्दैवानें पाहणारा मानंगगजेकसरीत ज्याचा उल्लेख आहे तो, चांगदेवाचा बाप प्रत्यक्ष कृष्णभट च होता हें निःसंशय होतें. एरवी त्याच्या अशा स्थितीची दुसरी उपपत्ति च लागत नाही. पण या प्रसंगाचें योग्य चित्र वाचकांपुढें उभें राहावे म्हणून, ती लीला च येथें देतोंः—ब्राह्मण एकु चांगदेवाचेया दरिसना आला तो वाडवेळु जवळीं बैसला होता मग चांगदेव तेयासी पाठवणी दिधली. तेया नांव **कृष्णभट** विचारिले भटो आतां जा होकां जी बोलावुनी पैल ठावो वेन्ही गेला आणि मागौता येऊनी बैसला मागौते सांगितलें भटो आता जा मागौन पैल ठावो वेन्ही जाती आणि मागौते येउनि बैसतीः आणि आस्व पाति डोळे आहाळ बाहाळ जाले मग चवथींये वेळे शब्दे विचारिले माते कां ह्या **चक्रपाणी** पाठविती यैसे देहात मान जाले मग चवथींये वेळे सांगितले आतां जाना तरी येथेची आण आहे. मग मागौते पाहाती दुःख करिती मग निघाले." ही लीला वाचली आणि तिची संगति मानभावी चांगदेव हा मातंगी पुत्र आहे ह्या वर दिलेल्या प्रमेयसिद्धीशीं लाविली म्हणजे मग त्याचे भेटीस आलेला हा कृष्णभट दुसरा कोणी नसोन प्रत्यक्ष त्याचा बाप च होता हें सहज च अनुमान निघते. हा कृष्णभट चांगदेवाच्या शिष्यांपैकी कोणी होता असा ह्या ललित किंवा इतरत्र कोठे हि मानभावी चरित्रग्रथांत उल्लेख नाही. मग, चागदेवाचें तसलें दैन्य पाहून कृष्णभटाची अशी स्थिति होण्यास त्या दोघाचा परस्पर प्रेमसंबंध असला पाहिजे हें उघड आहे. आणि मानभावी चांगदेव हा च कृष्णभटास मातंगी पासून झालेला पुत्र आहे, असे एकदां अवांतर प्रमाणांनी सिद्ध झाल्यानंतर या लीलेंतील तो प्रेमसंबंध पितापुत्राचा होता, हें निर्विवाद आहे. तसें च मानभावांनी आपले ग्रंथ ज्या एका भावनेनें लिहिले आहेत ती भावना हि या लीलेवरून स्पष्ट होत आहे. ज्या चरित्रग्रंथांत व्यभिचारामुळें आपल्या पंचकृष्णापैकीं एका कृष्णाचे ( चांगदेवाचे ) हस्तपाद छेदन होतात, हें वर्णन संकेतांत द्यावयाचें, त्या च ग्रंथांत प्रत्यक्ष त्याच्या बापाचा म्हणजे कृष्णभटाचा तिऱ्हाईतपणें निर्देश करावयाचा हें योग्य च आहे. आपले ' **पंचकृष्ण** ' हे मातंग होते हा इतिहास राखवेल तितका गुप्त राखण्याचा अट्टाहास करावयाचा ही जी मानभावांची

दृष्टि ती लक्षात ठेवून त्या ग्रंथाकडे पाहिलें की, त्याची योग्य संगति लागते. असो. मातंगगजकेसरीतलि कथा आधारभूत घेऊन मानभावांच्या 'संवाद' व 'चरित्र' या ग्रंथांवरून च असे सिद्ध केलें की, ज्यास मातंगपुत्र अथवा 'मागभाऊ' म्हणतात ते च हे मानभाव दत्त, ढगो, गुंडो, व चांगो होत. त्यांचा पिता कृष्णभट याचा हि शोध आपणांस मानभावांचेच ग्रंथात लागतो. एवंच मातंगगजकेसरीतील कथा मानभावाच्या ग्रंथात आपणास पूर्णतेने उपलब्ध होते. मग ते व हे भिन्न होते असे प्रतिपादन करणे धाष्टर्य आहे आता पंचकृष्ण हे मातंग होते असा पुरावा स्वतंत्रेनें मानभावाच्या च ग्रथात कितपत उपलब्ध होतो तें पाहूं:—

(१) फलटण माहात्म्यांत हा मानभाव अथवा माहात्मापथ 'मातंग ग्रंथ' आहे, असा लोकसमज पूर्वकाळीं होता अशी कबुली दिली आहे—

तेही (जैनी) शाब्दिकाचेनि बळें ॥
धीटे प्रसाद वाचा सळे (छळे) ॥
दर्शनें[1] केली सकळें ॥ अंत्यजमूळें म्हणौनि ॥ ३० ॥

एरीकडे निबंनाथे जैनें । मातांगमूळें केली सर्व दर्शने ।
तो ग्रंथ वाचिला तेणे । सिघणा[2] प्रति ॥ ४ ॥

(२) चरित्रांतील २५ वे लीलेत चागदेवानें मातंगाचा लाडू स्वीकारून तो 'महाप्रसाद' म्हणून त्याची इच्छा नसता हि आपले शिष्यांस दिला.

(३) लीला ५४ वी इच्यात "मातंग पव्हे उदक पान" वर्णिले आहे.

(४) लीला १२२ वी विशेष महत्वाची आहे. 'साधा' या नांवाची शिष्यीण होती. ती काही दिवस चक्रधर अथवा चक्रपाणी चागदेव याजकडे व कांहीं दिवस गुंडमाकडे अशी रहात असे सर्व च शिष्यांशिष्यिणीचे असे असे की, कांही दिवस त्यांनी चक्रपाण्याकडे राहावे व काही दिवस गुंडमाकडे जावे. या लीलेंत एका प्रसंगी गुंडमानें 'साधा' इजला 'मातांगाची किडारूं' असे तिच्याशी असलेल्या स्वतःचे संबंधास उद्देशून म्हटलें आहे.

(५) लीला १३९ यांत 'कुन्हे मातांग भिवडी वस्त्रा स्वीकारूं' याचें वर्णन आहे.

---

१ मानभावांची 'दर्शनें (?).

२ सिंघण हें नांव मानभाव ग्रंथकारानें आपले पंचकृष्णाचा कालविपर्यास करावा म्हणून कांही तरी घातले आहे.

( ६ ) आज हि आपण मांग व महार चांगभले असा त्यांच्या मङ्गल प्रसंगीं त्यांस उच्चार करतांना ऐकतों. याची उपपत्ति आजपावेतों अज्ञात होती. पण आतां या मानभाव ग्रंथांवरून ती स्पष्ट होत आहे. आपण जसें ' उद्योऽस्तु ' ' उद्योऽस्तु ' 'उदो उदो' असें म्हणतों; तसा चांगदेव चक्रपाणी यानें जो उच्चार केला तो लीला ४६९ मध्यें दिला आहे.

"सोरटी सोमनाथु, आवर्ढेनागनाथ, परळी वैजनाथु, सेलिंगा, सहस्रलिंगा, कोटीलिंगा, एक दंडवत, सायासी भले, मायासी भले, माउ माइसी भले, काउबाइसी भले, आउयी विचारिलें हें काईंजी उत्तरिलें **शूद्र ऐसेचि देव बाहाति** ॥ "

या लीलेंत सोरटी सोमनाथादि देवतांस चांगदेवानें दंडवत केलें व शूद्रांच्या सायासी आदि देवतांचें ' भले ' म्हटले आहे. हा शूद्रांनी शूद्र देवतांस नमन करण्याच्या पद्धतीचा अनुवाद त्यानें केला आहे. या पद्धतीस च अनुसरून लीला १५९ मध्यें गुंडमानें आपली शिष्यीण जी **काळो** तिच्याकडून ' चांगभलो ' असा उच्चार करविला; व लीला २०० मध्यें सर्व शिष्यांनीं रोज प्रातःकाळीं ' चांगभले ' म्हणावें अशी आज्ञा केली आहे. या आज्ञेस अनुसरून अद्याप हि मांग व महार ' चांगभले ' ' चांगभले ' असा त्यांच्या मंगल प्रसंगी उच्चार करतात. यावरून हे शिष्य व गुरु कोणत्या ज्ञातीचे होते तें कळतें.

( ७ ) संवादांतील लीला ६९ यांत ई ळ म्हणजे ढगो सूप व खराटा हीं मारून आपले शिष्यांत विद्या प्रकट करीत असे असें वर्णन आहे. उपदेश करण्याची ही तऱ्हा विलक्षण च आहे. सूप व खराटा ही चिन्हें आज हि आपण **मांगांत** पाहातो.

( ८ ) चरित्र लीला ४०३ वरून सूप व खराटा या चिन्हांबद्दल ई ळ म्हणजे ढगो याची प्रसिद्धी होती असें दिसते.

( ९ ) चक्रधराचा शिष्य चक्रधर स्पृष्ट भांडीं घरांत घेत नसे.

( १० ) माझें शिष्यपण पत्करण्यांत आपल्या जात गोतास मुकावें लागेल असें चक्रधरानें आपल्या शिष्यिणीस सांगितलें आहे.

ही इतकीं प्रमाणें या 'मांगभाऊ' अथवा ' मानभाव ' बंधूंची जात कोणती असावी याचें अनुमान काढण्यास पुरेशी आहेत.

या एकंदर विवेचनावरून जें निष्पन्न झालें तें असें:—

१ कृष्णभटास मातंगीपासून जे पुत्र झाले ते दत्तो, ढगो, गुंडो व चांगो हे चार व शुद्ध कृष्णभट पांचवे असे मिळून मानभावांचे पंच कृष्ण होत.

२ हे कृष्ण व कृष्णपुत्र या दृष्टीनें त्यांस ' पंचकृष्ण ' हें यथार्थ न मानभावांनीं दिलें आहे.

३ आपल्या पंथाच्या उत्पादकांचा हा इतिहास गुप्त राहावा या इच्छे प्राचीन व अर्वाचीन मानभाव ग्रंथकाराचा अव्याहत प्रयत्न सुरू आहे. सांकेति लिपी, सांकेतिक चिन्हें, कुल व काल यांबद्दल भिन्न ग्रंथांत केलेली भिन्न व परस्प विरुद्ध विधानें आणि नामानिर्देश ही सर्व या प्रयत्नाचा परिणाम आहे.

याप्रमाणें मानभावांच्या उत्पत्तीचा हा इतिहास आहे. तो कोणतें हि बा प्रमाण न घेतां मानभावांस सम्मत अशी मातंगगजकेसरींतिल कथा ह आधारभूत घेऊन मानभावाच्या च संवाद व चरित्र या ग्रंथांवरून दाखविला. मान भावांची सांकेतिक लिपी जर अवगत असती तर हा इतिहास या पूर्वीं प्रसिद्धीस आला असता व त्यामुळें पुष्कळशा गैरसमजुतींचा निरास झाला असत इतकें च नाहीं तर त्यामुळे आपल्या इतिहासावर हि पुष्कळ उजेड पडला असत मानभावांचीं मतें कोणती, त्यांचे वेळची समाजस्थिति कशी होती, या पंथा योगानें समाज व वाङ्मय यांवर कोणते परिणाम झाले वगैरे प्रश्न विचार करण्य सारखे आहेत व त्यांचा पुढें केव्हा तरी विचार करण्याचें योजिले आहे. आत प्रस्तुत विषयाचा जो एक भाग राहिला आहे त्याकडे वळतों. तो प्रश्न काला संबंधीं होय.

## पंचकृष्णाचा काल

हा कालनिर्णय हि मी मानभावांच्या ग्रंथांतील माहितीवरून च करणार आहे परंतु तत्पूर्वी एक सूचना करणें इष्ट वाटते ती ही की, या ग्रंथांत मानभाव ग्रंथ कारांनीं कांही राजांचा उल्लेख केलेला असल्यानें त्यावरून बरा च गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव आहे. परंतु मानभावांचा ' गडबडगुंडा ' 'लक्षांत घेतला त्यांचा आपला इतिहास गुप्त ठेवण्याचा प्रथम पासूनचा अविरत प्रयत्न पाहिल

---

१ अलीकडे मानभावांच्या ग्रंथांत शकांचा हि उल्लेख दिसूं लागला आहे माझे जवळ अत्यंत पुरातन संवाद व चरित्र यांच्या प्रती आहेत. परंतु त्यांत को हि शक नाहींत.

२ येथें कृष्णभटाच्या पांचवे पुत्राचा उल्लेख केलेला नाहीं. संवाद, चरित्र व सूत्रपाठ या तिन्ही ग्रंथांत चांगदेव राऊळ, गुंडम राऊळ, या प्रमाणें च दुंडी राऊळा चा हि उल्लेख आलेला आहे. परंतु नामसादृश्याचे अभावामुळें त्याचें येथें स्पष्टीकरण केलें नाहीं.

म्हणजे शंका घेण्याचें कांही कारण नाही. तशांत हीं विधानें अशीं आहेत कीं, त्या नांवांच्या ऐवजी इतर कोणत्या हि राजाची नांवे घातली तरी कथांच्या अनुसंधानांत काडीचा हि भंग होण्यासारखा नव्हता म्हणजे यादव राजा-ऐवजीं मुसलमान राजांची नांवे जरी मानभाव ग्रथकारांनी घातली असती तरी चाललें असतें. असो. मराठी वाङ्मयात श्रीएकनाथापासून नंतरचे कालांत वैदिक मतानुयायी ग्रंथकाराचे ग्रंथात मानभावाचा उल्लेख उपलब्ध होतो. परंतु श्रीज्ञानेश्वरांचे ग्रंथांत जैनादिकांचा उल्लेख असून हि मानभावांचा उल्लेख नाही, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. श्रीनाथांनी जो मानभावाचा उल्लेख केलेला आहे, त्यावरून या पंथास प्रचलित होऊन त्याचा समाजावर इष्टानिष्ट परिणाम होण्याइतका तरी १०० । १२५ वर्षांचा काल गेला असला पाहिजे.[1]

श्री नाथांचा काल शके १५२१ मध्ये झाला. तेव्हां स्थूल मानानें शके १४३० किंवा तत्पूर्वी हा पंथ प्रस्थपित झाला असला पाहिजे हे उघड आहे. म्हणजे कालाची एक बाजू आपणास स्थूल मानाने समजली.परंतु शक १४३० पूर्वी किती[2] या बाजूचे निरीक्षण केले पाहिजे. श्री ज्ञानेश्वरांचे ग्रथांत या पथाचा उल्लेख नाही, असें वर दिलें च आहे. श्री ज्ञानेश्वर समाधिकाल १२१८ चे सुमारचा आहे. तेव्हां मानभाव पंथाच्या स्थापनेचा काळ शक १२२० व शक १४३० या दोनशें वर्षांत केव्हां तरी असला पाहिजे हे उघड आहे, तो कोणता असावा हें पाहूं.

( १ ) ' चांगदेव चक्रपाणी ' हे नांव पडण्याचे कारण मानभावी फलटण–माहात्म्यकारानें असे दिलें आहे की, चाकण प्रदेशी असणाऱ्या चांगदेवाचे समाधीस याचे बापानें नवस केल्याने हा पुत्र झाला, म्हणून याचें नांव चांगदेव ठेविलें व मातेनें आपल्या माहेरचें कुलदैवत जो चक्रपाणी यास नवस केला म्हणून ' चक्रपाणी ' हें हि नांव त्यास मिळालें.

या कथेंत ज्या चांगदेवाचे समाधीचा उल्लेख केलेला आहे. ती समाधी पुरंधर पर्वताजवळील संवत्सर ग्रामी असलेली वटेश्वर[3] चांगदेवाची होय हें उघड आहे.

---

१ नामदेवासंबंधी अद्याप अनिश्चितता असल्यानें त्याचे ग्रंथ पुराव्यास अग्राह्य आहेत.

२ श्रीज्ञानेश्वर–कालीं ' मानभाव ' अस्तित्वांत नव्हते हे पुढें सप्रमाण दिलें आहे. त्यास अनुसरून हें लिहिले आहे.

३ वटेश्वराची समाधी सासवडीं आहे हें मी पूर्वी च सिद्ध केले आहे. पहा भा. इ. सं. मंडळ इतिवृत्त शके १८३६ पृ. ९९

वटेश्वर सोपानदेवाबरोबर परंतु श्रीज्ञानेश्वरानंतर समाधिस्त झाले. शक १२१९ चा सुमार, तेव्हा शक १२१९ मध्ये जे वटेश्वर समाधिस्त झाले त्याच्या समाधीस केलेल्या नवसाचें फल जर हा मानभवी चागदेव आहे, तर शक १२१९ नंतर निदान शेंपन्नास वर्षांनी तरी या चांगदेवाचा जन्म झाला असला पाहिजे, हें संभाव्य दिसते. हें एक च प्रमाण, विशेषतः ते मानभाव ग्रंथकाराने दिलें असल्यानें इतरत्र जो यादव राजाचा नामोल्लेख आलेला आहे, आणि त्याचें व या पंचकृष्णांचें समकालीनत्व प्रस्थापित करण्याचा जो अट्टाहास केला गेला आहे, तो फोल ठरविण्यास पुरेसें आहे. असो.

( २ ) संवादातील लीला १ ली इच्यांत चक्रधर ( चक्रपाणी ) यास हिमालयावर असतां मक्ताबाईनें दर्शन दिधले, असा उल्लेख आहे.

( ३ ) त्या च ग्रंथांतील लीला २१६ मध्ये चक्रपाणी पैठण येथील विज्ञानेश्वराचे देउळांत असतां एका तपस्व्याची पाठ उन्हानें काळी झालेली पाहून असें च मुक्ताबाईनें तप केलें होतें, असे त्यानें उद्गार काढल्याचें वर्णन आहे.

श्रीज्ञानेश्वरादि भावंडांचा जन्म पैठण जवळील आपेगांवी झाला व चक्रपाणी विज्ञानेश्वराचे देउळांत होता या दोन गोष्टी लक्षांत ठेविल्या म्हणजे कोणत्या **मुक्ताबाईचा** त्यानें उल्लेख केला हे उघड होते.

( ४ ) चरित्रांतील ३५२ वे लीलेंत असें वर्णन आहे कीं, सारंगपंडित नांवाचा एक मनुष्य चक्रपाण्याचे दर्शनास आला असतां त्याचे भोंवती बायकांचा घोळका बसलेला पाहून त्याने उद्गार काढले की, " पूर्वी मी नाथ, सिद्ध, अवधूत, साधक, विरक्त होऊन गेले असें ऐकिलें आहे, परंतु नाथिनी, सिद्धिनी, अवधूतिनी, साधकी ह्या मला अश्रुतपूर्व आहेत " असली ही हेटाळणी ऐकून चक्रपाणी यानें गार्गी, मैत्रेयी, मदालसा व **मुक्ताबाई** याचा त्यास दाखला दिला. त्यानें त्यांस या लोकींच्या योगिनी असें म्हटले आहे. वरील तीन उताऱ्यावरून मुक्ताबाईचे समाधीनंतर बऱ्या च वर्षांनी हा त्यांचा उल्लेख चांगदेवानें ( चक्रपाणी यानें ) केला असला पाहिजे हें उघड आहे.

मुक्ताबाई शक १२२०चे सुमारास समाधिस्थ झाल्या हे सर्वसंमत आहे. तेव्हां वटेश्वर चांगदेवाचे व श्रीमुक्ताबाईचे उल्लेखांवरून शक १२२० नंतर शें पन्नास वर्षांनीं तरी चांगदेव चक्रपाणी जन्मला असला पाहिजे हें उघड होतें.

या कालाची अटकळ बांधण्यास साधनीभूत विशेष महत्त्वाची अशी एक लीला आहे ती सबंध च येथें देतोः—

चरित्रलीला ४९५ । विठ्ठल वीरूकथन ॥
आउसीं पुसिलें जी, जी विठ्ठल श्रीकृष्ण

चक्रधराचि अवतारु बोलताती हें साच जी : उत्तरिलें : विठ्ठल तो येकी ब्राह्मणीचा पुत्र : तो ब्राह्मण : आणि नामदेओ तो कोळीम्हाइआ गुरुव : हे तिघे चोर वळपेया. करिती : घोडेयाचे वुऽपे करिती : ओरपे द्रवडे घेति : येक घेणें घेऊनि जाये : दो पलाग सांवरिती : ते मंगळवेढ्याचे : तेही येकी गांवी ठाइं वळपा केला : तो म्हाइद्रना गाइ घेउनि गेला : तो लाग पाठी लागला : तो नामदेओ कोळी घाइं पडिला: पांठिये तिये पांढारियेवरि विठलु पडिला. त्याचे पुत्र आले तेहि तेथ भडखंबा केला: मग लिंगस्थापना केली: तेथ देवता अभिमानु घेतला: लोकांचे मनोरथ पुरउ लागला : तेयाचिये अस्त्रिये नांव गोराइये: येकीं नांव लखुमाइसे: तेयाचे पुत्र जतपडे करिति : ते विठ्ठल रूकमिणी अभंगी घालिती तो लोकांमध्ये क्षांतीते पावला: तो हा विठ्ठलु: तो घुटिका सिद्धी जाणे: पौळी पागा राउते: स्त्रियांसी भोगी: तांबोल उगाळ ( देई ) येसा तो विठ्ठलु: वा: ॥

या लीलेवरून ज्या वेळीं चांगदेव चक्रपाण्याने ही विठ्ठलासंबंधी अश्रुतपूर्व कथा आपले शिष्यिणीस सांगितली त्या वेळीं नामदेव—विठ्ठलमित्र—हा केवळ लोककथेचा विषय होऊन बसला असला पाहिजे हें उघड आहे. नामदेवांचा समाधिशक माझ्या मते जरी अद्याप निश्चित नाही तरी तो शक १२३०पूर्वीचा तर नसावा. तेव्हां १२३० नंतर शें पन्नास वर्षांनी ही कथा चांगदेवानें आपले शिष्यिणीस सांगितली असली पाहिजे हें उघड आहे.

दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा या लीलेंत उल्लेख केलेला आहे. विठ्ठलाचीं मुलें आपले अभंगांत विठ्ठल रुक्मिणीची नांवें घालीत असत असें येथें म्हटलें आहे. श्रीज्ञानेश्वराचे वडील विठ्ठलपंत व मातोश्री रुक्मिणीबाई होत्या हें श्रुत च आहे; तसें च त्यांनीं '' बाप रुकमा देवीवरू विठ्ठलु गे '' हें शेवटीं घातलेले असे अभंग बरे च केलेले वाचकांस माहीत च असतील. तेव्हां सदरचे अभंगाची रचना होउन बरी च वर्षें झाल्यावांचून तर ते रूढ झाले नसतील; अथवा निदान या अभंगाच्या रचनेनंतर तरी ही कथा चांगदेवानें सांगितली आहे हें निर्विवाद आहे. ( या लीलेवरून मानभाव हे सनातन धर्मीयांच्या पूज्य दैवतांस कितिकसा मान देतात हें हि दिसतें च आहे. )

सारांश, नामदेवाचे निधनानंतर म्हणजे शक सुमार १२३०नंतर बरीं च वर्षें गेल्यावर चांगदेवाचा जन्म झाला असला पाहिजे. शक १५३१ पूर्वी शेंसवाशें वर्षें या पंथाची स्थपना झाली असली पाहिजे म्हणून वर दिलें च आहे. तेव्हां शक १२३० नंतर शेंसव्वाशें व शक १५२१ पूर्वी शेंसव्वाशें हा काल या पंथाचे स्थापनेचा असला पाहिजे असें निर्णित होतें. मला वाटतें शकांच्या चवदावे शतकाच्या मध्याचे सुमारास मानभावी पंचकृष्णांचा काल असावा; ते यादवकालीन खास नाहींत.

गो. का. चांदोरकर

# जेधे यांची शकावली

१ पुढील शकावलीची वही रा. रा. दयाजीराव सर्जेराव ऊर्फ दाजीसाहेब जेधे देशमुख, इसाफतदार मौजे कारी, संस्थान भोर यांजकडून मजकडे सुमारें ९।१० वर्षांखालीं आली. त्या वेळचे कांही महत्वाच्या कामांतील मनोव्यग्रतेमुळें, इतर कागदांबरोबर ती जी एकदां गैरविल्हेस लागली ती मालकानें गेले सहा महिन्यांपूर्वी तिची मागणी करीपर्यंत तशी च पडून राहिली होती. ती शोधून काढल्यानंतर, तिची नकल करून घेऊन मूळ वही मालकांकडे परत केली, व नकल आपले मंडळाकडे तपासून घेण्याकरितां ठेविली. आपले अध्यक्ष, चिटणीस, व संशोधक रा. पां. न. पटवर्धन यांणी तिची चांचणी केली असून, तींतील कांही मित्त्या गणितदृष्टीनें तपासून पाहिल्या आहेत.

२ ही वही उभ्या व अरुंद अशा पोर्तुगीज कागदावर लिहीली आहे. तिचीं पाठपोट बावीस पानें असून, तेविसावें पान अर्धें च लिहिलेलें आहे. हीत शके १५४० ते शके १६१९ पावेतोंची सालवार हकीकत कमजास्त तपशिलानें दिलेली आहे. मूळ वही तपासून पाहिल्यानंतर अगर वाचल्यानंतर, तीत कोणीं तरी बरे च ठिकाणी शोध केले आहेत, कांही ठिकाणीं बोजड रीतीने अक्षरें चिताड करून गिरविली आहेत.

३ मंडळाचे सुप्रसिद्ध संशोधक रा. वि. का. राजवाडे यांणी म. इ. सा. खंड १८, लेखांक ५ मध्यें एका त्रुटित शकावलीची काही पानें छापिलीं आहेत. त्यांतील शक १५५४, १५७८, १५८६, १५८८, व १५९२ या सालांतील हकीकत या वहीतील त्या च सालांखाली दिलेल्या हकीकतीशी लावून पाहतां असें निश्चयानें म्हणतां येते की, या दोन्ही शकावलीचें मूळ एक च असावें. भाषेच्या दृष्टीनें रा. राजवाड्यांची शकावली जुनी आहे. प्रस्तुतची वही शेंदीडशें वर्षांपूर्वी लिहिली गेली असावी असें या वहीतील खा, सा, स वगैरे अक्षरांचे वळणावरून म्हणण्यास हरकत नाहीं. दोन्ही शकावलीत जो भेद–म्हणजे तपशिलाचें आधिक्य–आहे त्यावरून असें बिनधोक म्हणतां येतें की, जेधे यांची सालोसाल उपलब्ध झालेली माहिती मूळ शकावलींत त्या त्या सालाखाली नमूद करून, या वहीचे लेखकानें ही शकावली सजविली आहे, व ती जेधे देशमुखांसाठी च केली असावी.

४ या शकावलीतील खाली दिलेल्या सहा बार्बा विशेषेंकरून लक्षांत घेण्यासारख्या आहेत:—

( १ ) शिवछत्रपतींचा जन्मकाळ या शकावलींत शके १५५१ फाल्गुन वद्य ३ शुक्रवार असा दिला आहे. ही बाब खरोखर चमत्कारिक आहे. सुमारें १६ वर्षांपूर्वी, या बाबीची बरीच भवति न भवति होऊन, छत्रपतींची जन्मतीथि शके १५४९, प्रभव, वैशाख शु, १ गुरुवार, उत्तररात्र, आश्विनी नक्षत्र, ता. ६

एप्रिल सन १६२७ ( old style ) असल्याबद्दल मी ठरविलें होतें ( पहा, केसरी वर्ष २०, अंक १७, ता. २४।४।१९०० ). प्रसिद्ध व अप्रसिद्ध बखरीत या जन्मतिथीबद्दल अत्यंत विसंगतता आहे; सबब या बाबीचा जितका जास्त खल होईल तितका पाहिजे च आहे.

( २ ) शक १५७१ तील थोरले शहाजी महाराज व जेधे देशमुख याचे दरम्यान शपथपूर्वक झालेल्या करारमदारासंबंधीचे उल्लेखावरून असें म्हणण्यास हरकत दिसत नाही की, दादाजी कोंडदेव व शिवाजी महाराज यानी पुणे प्रातात रचूं घातलेल्या व्यूहास व धोरणास शहाजीची पूर्ण अनुमति होती. कदाचित् शहाजी महाराजांची च ही मसलत असावी.

( ३ ) या शकावलीत अफजलखानाचे वधाचा प्रसंग बरा च खुलासेवार दिलेला आहे, व तो देताना, अखेरीस

॥ हनुमंत अगद रघुनाथाला ॥
॥ जेधे बादल शिवाजीला ॥

असा एका पोंवाड्यांतील चरणाचा उल्लेख खुबीनें केला आहे. हा उल्लेख कोणते पोंवाड्यांतील आहे हें कळत नाही.

( ४ ) शिवाजीमहाराज व औरंगजेब यांची भेट आग्र्यास झाली — दिल्लीस नव्हे — असे या शकावलीत स्पष्ट म्हटलें आहे. या उल्लेखावरून रा. राजवाडे यांच्या म. इ. सा. खंड ८, ले. २३ मधील उल्लेखाची संगति लागते. इकडील बखरींतून दिल्लीस भेट झाल्याचे जे उल्लेख आहेत त्यांचा अर्थ इतका च घ्यावयाचा की, ही भेट स्थूल मानानें मोगलांचे राजधानीत म्हणजे दिल्लीस झाली. भेटीसंबंधाने या शकावलीत दिलेले स्थानाचा मुसलमानी तवारिखातील हकीकतीशी उत्तम मेळ आहे.

( ५ ) कारंज्याचे स्वारीचा बखरीतून उल्लेख आहे. परंतु स्वारीचें साल वगैरे या शकावलींत पहिल्यानें च आढळतें.

( ६ ) नेताजी पालकर सरनोबत यांस शुद्ध करून घेतल्याचा उल्लेख या शकावलीत शके १५९८ त आलेला आहे. इकडील बखरीत नेताजीचे धर्मांतराचा उल्लेख नाही. 'मआसिर–इ–आलमगिरी' या मुसलमानी तवारिखेंत मात्र या-संबंधाने निर्देश असून, ता. १ शवाल १०७७ हिजरी ( ता. २७ मार्च १६६७ ) रोजी नेताजीची सुंता झाली असें तींत स्पष्ट लिहिलेलें आहे. नेताजीचें नवीन नांव मुर्शिदकुलीखान ठेवण्यांत आलें असे हि वरील तवारिखेंत आढळतें. शिवाजी-महाराजांवर आग्रा येथें आलेल्या प्रसंगाशी या धर्मांतराचा संबंध येत नाहीं. बळजबरीनें बाटविले जाण्याचा नेताजीवरील प्रसंग अलग आहे.

**बा. गं. टिळक**

(पान १ बाजु १)

श्रीगजवदनवरद

श्री शके १५४० कालयुक्त नाम संवछरे कार्तिक वद्य प्रतिपदा औरंगजेब उपजला

शके १५४६ रक्ताक्षी संवछरे

कार्तिक मासी भातवडीस मोगलाचा सुभेदार लस्करखान व येदिलशाही मुला महमद येसी दोन कटके मलिक आबरे बुडविली १

मलिक अबरे सोळापुरास वेढा घालून विज्यापूरकरापासून घेतले. १

शके १५४७ क्रोधन नाम संवछेरी जाहगिर पातशाहावरी त्यांचा लेक सुलतान खुरम रुसोन निजामशाहीमध्ये गेला त्यास निजामशाहामध्ये मलिक अबरे ठाव दिल्हा १

शके १५४८ क्षय नाम संवछरें वैशाख मासी मलिक अबर परलोकास गेला १

शके १५५० विभव नाम संवछरे सुलतान खुरुम पातशाहीस दिलीस बैसला नाव शाहाजाहा ठेविले.

(बाजू २ री) १

ये वर्षी कार्तिक मासी कृष्णपक्षी पंचमी गुरुवासरी नक्षत्र पुष्य राजश्री कान्होजी नाईक जेधे यांची पहिली स्त्री पासलकराची लेकी सावित्रीबाई होती तिचे पोटी बाजी नाा पुत्र जन्मला माहा नक्षत्र अनुराधा दक्षणायेन

शके १५५१ शुक्ल संवछरें

फालगुण वद्य त्रितीया शुक्रवार नक्षत्र हास्त घटी १८ पळें ३२ गड ५ पळें ७ ये दिवसी राजश्री

चैत्रमासी ईभराम ईदिलशाहा परलोकास गेला सुल(ता)न महमद शाहा तख्ती बैसले खवासखान प्रधान जाला मुरार जगदेराव

सिवाजी राजे सिवनेरीस उपजले १

श्रावणें पूर्णिमेस लुखजी जाधवराव निजीमशाहानी मारिले १

कारभारी जाला १

शके १५५२ प्रमोद संवछरे

ये वर्षी दुकाल पडिला

पौश वद्य येकादसी फतेखानास सोडून मज्यालस दिल्ही १

शके १५५३ प्रजापती संवछरें

फतेखाने बुऱ्हान निजामशाहा मारिला १

शके १५५४ अगिरा संवछर

जेष्ट काजी महबतखानें वेढा घालून दौलताबाद घेतली १

भाद्रपद मासी शाहाजी राजे याणी पेमगिरीस निजाम शाहावरी छेत्र धरिले १

( पान २ बाजु १ )

शके १५५७ युव संवछरें शाहाजी राजे माहुलीस गेलें तेथें रणदुलाखान ईदिलशाही व खानजमा मोगलाचा सुभा जाऊन वेढा घालून निजामशाहा हाती घेतला शाहाजी राजें ईदिलशाही चाकर जालें ते समई रणदुलाखानाने कान्होजी जेधे नेले होतें तेथें माहाराजाची भेटी जाली १

शके १५५८ धाता संवछरें तद्

शके १५६१ प्रमाथी संवछर ये संवछंरी बसवापटण ईदिलशाहानी घेतले १

शके १५६५ सुभान संवछरी
बाहादुरशाहा उपजले नाव शाहा
अलम ठेविले १

शके १५७० सर्वधारी नाम संवछरी
श्रावण वद्य प्रतिपदा शाहाजी राजे
मुस्तफाखाने धरिले नजीक चंदी त्या-
जबा कान्होजी नाईक जेधे व दादाजी
कृष्ण होते त्यास कनकगिरीस अटकेत
ठेविले तें समई दादाजी पंतासचा
पुत्र रत्नाजी पंत कनकागिरीस मृत्य
पावले १

( बाजु २ री )

शकें १५७१ विरोधी संवछर जेष्ट
शुध पूर्णिमा शाहाजी राजे कोंढाणास
येऊन सोडिले ते समई कान्होजी नाईक
जेधे व दादाजी कृष्ण लोहकरे यास
सोडिले माहाराजांची व त्यांची भेटी
जाली ते समई माहाराज बोलिले की
तुम्ही अम्हामुले बदवानी श्रमी जालेस
यांउपरी आम्ही पातशाहासी तह केला
की बारा गांवातून मजुरा करून
हुकुम प्रमाणें कर्नाटक प्रांते मस-
लत करावी त्यावरून बेगरुल
प्रांत पांचा लक्षा होनाचा जाहा-
गिर दिल्हा आहे यांकरिता आ-
पणास कर्नाटकाची मसलत क-
रावी लागली तुमचे वतन माव-
ळात आहे चिरंजीव राजश्री सि-
उबा खेडेबारीयांत व पुणा आहेत
त्याजवल तुम्ही जंमावानसी रा-
हावें तुमची जबरदस्ती त्यां प्रांते

आहे अवघे मावळचे देशमुख
देखील त्यासी रुजू होऊन त्यांचें
आज्ञेत वर्तेन येसा विचार क-
रून जबरदस्तीने राहावे येखादी
मोगलाई कडील फौज व ईदिलशाही
कडील फौज आली तरी आपण ईमान
राखाव त्यांसी लढाई

( पान ३ बाजु १ )

करावी येसी शफत ईमान पुरस्कर
बेलरोटीवर हात ठेऊन घेतली तैसी
च त्याणी हि कान्होजी नाईकांस शे-
फत दिल्ही अणी कान्होजी नाईक
यांस व दादाजी कृष्ण यांस वस्त्र
देऊन बरावर हुजऱ्या व पत्रे देऊन
राजश्री सिवजी राजे यांजकडे पाठविले १
शकें १५७६ जये संवछरीं संभाजी राजे
यांस उमाजी राजे पुत्र जाले
कार्तिक वद्य द्वादसीस उपजले १
शके १५७७ मन्मथ संवछरीं राजश्री
सिवजीराजे याणी पौष चतुर्दसीस
जाऊन जावली घेतली ते समई
कान्होजी जेधे देशमुख व बांदल
व सिलिंबकर यांचा जमाव व मावल-
च्या देशमुखांचा जमाव बरावर
घेऊन जमावाच्या बळे युध्य करुन
जाउली घेतली १

शके १५७८ दुर्मुख छंवछर

वैशाखमासी राजश्री सिवजी
राजे याणी रायरी घेतली स-
मागमे कान्होजी जेधे देशमुख
ताा भोर व बादल व सिलीं-

मार्गसीर्ष मासी सुलतान म-
महद ईदिलशाहा मृत्य पाव-
ले १
अस्वीन वद्य पक्षी राजया-

बकर देशमुख व मावळचा
जमाव होता हैबतराउ व बा-
लाजी नाईक सिलीचकर याणी
मध्यस्ती करून चंद्रराउ कि-
लियाखाली उतरले त्यावरी
दुसरा सिका हैबतराउ सिलि-
चकर यांस दिल्हा आणी भावा-
भावाच्या वांटणीया केल्या १

नी सुपे घेतले संभाजी मो-
हिते धरिले १

माघ शुध पक्षी गायेकव-
डासी सोयरीक केली स-
खवार बाईचे लग्न जाले १

## शके १५७९ हेमलंबी संवछर

चैत्र वद्य येकादसी र-
विवारी घटी ८ अवरं-
गजेबने अदलशाहापासू-
न बेदर घ्यावयाचा तह
केला आणि बेदरास अले
अशाढ शुध त्रितीया गुरु-
वारी बेदर घेतले १ वैशाख
शुध पंचेमीस जाधवराया-
सी सोयरीक केली १

जेष्टमासी नौसिरखान यासी
युध्य अमदानगरी राजश्री
सिवजी राजे याणी केले १

कार्तिक शुध पोणिमेस खान
महमद बडे साहिबिणीने मारिला १

पौष मासी औरंगजब दिली-
वर चालले १

( पान ४ बाजू १ )

वैशाख शुध द्वारसीस ईंगलीया-
ची सोयरीक केली १

वैशाख मासी जनर लुटले १

जेष्ट शुध द्वादसीस राजश्री सिवजी
राजे यास संभाजी राजे पुत्र
जाले पुरंधरी उपजले १

अश्वीन वद्य द्वादसीस कं-
ल्याण भिवडी राजयानी
घेतली ते समई लस्कर
व हाशम दादाजी बापूजी-
स सुभा सांगोन रवाना केले
तेव्हां कान्होजी नाईक जेधे
याजपासून दादाजी कृष्ण
लोहकरे त्यांचे भाऊ सखो
कृष्ण लोहकरे

## शके १५७९ हेमलंबी संवछर

· यांस मागोन घेतले अणी
दादाजीपंत यांस कंल्याण-
चा नामजाद हवाला व स-
खोपंतास भिवडीचा हवाला

सागितला येसाजी गोपनाथ
यांणी अपले भाउ कान्होजी
नाईक जेधे यांकडील कार-
भार अम्ही करीत होतों तै-
सा च करावा म्हणून हाती
दिल्हें १

शके १५८० विलंबी संवछर पौष
मासी फतेखान विजापुरी विश दे-
ऊन मारिले व श्रावण मासीं बाहा-
लोलखान मारिला भाद्रपद शुध १३
सोनाजीपंतास दिलीस रवाना केले
वस्त्रें दिल्ही १

शके १५८१ विकारी संवछर

औरंगजब तख्ती बैसल १

वैशाख मासी अदल-
शाहा पातशाहा यांचे
फरमान मावळच्या देश-
मुखास अले की अफजल-
खानास सामील होणे त्यांस
केदारजी खोपडे अफजलखा-
नाजवळ होते खडोजी बिन
धर्मोजी खोपडे देशमुख ताा
उत्रोली हे अफजलखाना-
कडे गेले १

कान्होजी नाईक जेधें यास
मावळच्या देशमुखाबराबरी
फरमान अला होता तो घेऊन
व आपलें पाच जण पुत्र घे
ऊन राजश्री स्वामीच्या द-
र्शनास राजगडास गेलें रा-
जश्री स्वामीस परवाना दा-
खविला तेव्हा राजश्री स्वा-
मी बालिलें की तुमचें सेंजा-

श्रावण शुध २ सिवाजी राजे
जाऊलीस अले भाद्रपद
वद्य चतुर्दसीस सिवाजी
राजे यांचे स्त्री सईबाईस
देवआज्ञा जाली १

कार्तिक मासी अफजलखानाने
प्रतापगडास कृष्णराव हेजीब
राजश्री स्वामिकिडें पाठविला
त्यांस वस्त्रे देऊन प्रतापग
डाखाली भेटी व्हावी हा
निश्चये करून माघते पाठवि-
लें तेव्हां अतथस्तें विचार
कान्होजी जेधे व सरकारकून
बैसोन राजश्री स्वामीनी विचार
केला की मुसलमान बेमान
अहे बादलाचा जमाव जाउ-
लीस व दंराच्या रानात
राहाणें कदाश्चित भेटींचें
समई त्याने बेईमानी केली

री केंद्रारजी व खंडोजी खो-
पडे दशमुख ताा उत्रोली
ह अफजलखानाकडें गेलें
तुम्ही पातशाहाई हुकुम मोडून
राहिले म्हणजे वतनास अपाये
होईल जिवावरी गोष्ट येऊन
संकट पडेले याकरितां तुम्ही
हि जाणे त्यावरी कान्होजी
नाा बोलिले की माहराजानी
अपली क्रिया घेऊन तु-
मचे हाती दिल्ही ते च क्रि-
या व ईमान आपला शाबूत
आहे वतन साहेबाच्या पा-
यावरी ठेविले आपण व
आपले सों साहेब पुढें सखस्त
होऊन तेव्हा जे होणे तें होईल

( पान ५ बाजु १ )

कान्होजी -

तरी त्यांचे लस्कर पारात
आहे ते डोगरास चढून देणे
अणी निवडक माणूस घेऊन
अपली मदत करणें कदाश्चि-
त श्री अबेंच्या वरदे अफ-
जलखान मृत्य पावला तरी
ईशारतीचें अवाज गडावरी
होंतील तेव्हां पारावरी चालून
घेऊन अगदी लस्कर बुडवणे
हैबतराउ व बाळाजी नाा सिलि-
बकर जमावानीसि बोचेघो-
लीचें घाटी ठेविलें आहेत
तें घाट लस्करास चढूं देणार
नाहीत यैसा अतःस्ते विचार
जाला आणि बंदोबस्ती केली- १

मार्गेसीर्ष मासी शुधपक्षी सप्तमी गु-
रुवारी प्रतापगडाचें माचीस अफजलखान

## शके १५८१ विकारी मार्गेसीर्ष मास

यैसें बोलोन शफत केली त्या-
वरी राजश्री स्वामी बोलिं-
लें की हातावरी पाणी घेऊन
वतनास घालणें आज्ञेप्रमाणे
वतनास हतावरी पाणी घेऊन
सोडिले तेव्हा बोलिलें की अ-
पला कबिला कारींस आहे तो त-
ळेंगावाकडें घेंऊन जाणें ते
समई दादाजी कृष्ण यांस क-
ल्याणच्या हवाला होता त्यांस
बोलून आणून त्यांचे वडील
पुत्र रखमाजी दादाजी आप-
णाजवळ ठेऊन कान्होजी ना-

बाा पालखी व हेजीब घेऊन हुद्-
करासमवेत भेंटीस आले राजश्री
स्वामी किलियावरून उतरून भेटी-
स अलें भेटी समई येकांगी करून
अफजलखान जिवें मारिला सिर
कापिले जीव माहाला व लोंक
व कान्होजी नांा यांचे पुत्र बाजी
सर्जाराउ यांणी युध्याची सर्त
केली ईशारती अवाज प्रताप
गडावरी जाला तेंव्हा कान्होजी
नाईक जेधे जमावानिसी व
बादल देखील यांणी पारावरी

---

१ ज्यास्त पडला आहे.

ईकानी अपला कबिला व दा-
दाजी पंताचा कबिला राजश्री
स्वामीचें आज्ञेप्रमाणें नळेगा-
वास ढमढेरीयांच्या गावी ठे-
विला राजश्री स्वा-
मीची व कान्होजी नाा यांची
क्रिया बेलरोटीवरी हात ठेऊन
जाली त्याउपरी बांदलाचा जमा-
व व हैबतराउ सिलिंबकर व
पासलकर मारणे व ढमाले
व मरळ डोघार (ठोर) बोलाऊन अणून
अतःस्तें यांच्या विद्यमाने
क्रिया घेंऊन हाशमाचा जमाव
खरा केला राजश्री पंताजी
गोपनाथ

चालोन घेऊन लस्करांत
मारामारी केलीं अगदी ल-
स्कर बुडविलें काही पळोन
गेलें तेव्हां खंडोजी खोंपडा
पाडाव जाला त्यांस राजश्री
स्वामींनी शास्त केली कान्हो-
जी नाा जेधे व लोक येक-
निष्टा धरून राहिले त्यांची न-
वाजीस केलीं जेंधियांस का-
नतखोरचे अधी यावें यैसा
सिधांत केला १
मार्गेसीर्ष वद्य नवमी सोमवारी
रात्री राजश्री स्वामींनी पनाळा
घेंतला १
माघ शुध १४ स विज्या-

( बाजू २ री )

यांस अफजल खानाकडे हेंजबीस
पाठविलें अणी प्रतापगडा
घा(खा)ली भेटी घ्यावी यैसी बोली
केलीं १
रुस्तुमजमा व फाजिलखान यां-
सी व राजश्री स्वामीसी कोंल्हा-
पुरानजीक युध्य जाले बारा हाती
व दोन हजार घोडी राजश्री स्वामी
कडें पाडाव जाली गनिम पळोन
गेला १

पुर प्रांते राजश्री स्वामींनी
स्वारी केलीं कृष्णेच्या काठे ग-
दलक्ष्मीश्वरा पावेतो खंडणीया
घेंतल्या १
कान्होजी जेधे यांजपासून
कावजी कोंढाळकर व केरोजी
तुपे यांस मागोन घेऊन हश-
माच्या हजारिया सांगितल्या १
पवाडा केला त्यामध्यें आहे
की " हनुमंत अंगद रघुनाथाला
जेधे बादल सिवाजीला " यैसे १

शके १५८२ शार्वरी नाम संवछर

चैत्र शुध प्रतिपदेस राजश्री
सिवाजी राजे फिरोन पनालि ( या ) स

जेष्ट शुध ८ वासोटा गड घेतला
संवछर प्रतिपदा बुधवारी शा-

आले मग सिद्दी जोहार येऊन
पनाळीयास वेढा घातिला १
अश्वीन मासी चाकणेचा कोट शा-
स्ताखाने घेतला मग पुणियास
अला १
भाद्रपद वद्य त्रयोदसी पनाळा
सलाबत खानासी दिल्हा सला केला १

स्ताखान भिवरा उतरोन अ-
ला १
आषाढ वद्य १ पनालियाव-
रून राजश्री स्वामी उतरोन
खेळणीयास गेले ते समई सि-
द्दी जोहार यांची फौज पाठीवरी
अली युध्याची दाटी बहुत जा-
ली तेंव्हा बादलाच्या लोकानी
युध्याची शर्त केली लोक खस्त
जालें बाजी प्रभु देशकुळकर्णी
ठार जाला

( पान ६ बाजू १ )

शके १५८२ शार्वरी

माघ शुध चतुर्दसी मंगळवारी
काहार तलबखान यांसी लडाई
जाली बारखिंडीस जुझ जाले
राजश्री स्वामीची फतें जाली
त्या पासून खंडणी घेऊन वाट
दिल्ही १

माघमासी राजश्री स्वामी ( नी )
निजामपूर लुटिलें दाभुल व
प्रभावली कबज केलीं १
पौष शुध १२ द्वादसीस रा-
जश्री मोरोपंतास मजमु दिल्ही १

आषाढ वद्य १
तेंव्हा तरवारेचें पान आधीं
बादलास द्यावेसे केले त्याव-
री जेधीयांस द्यावे ६
कार्तिकमासी राजश्री सोनाजी
पंडित शास्ताखानाचा निरोप
घेऊन राजगडास राजियापासी
आलें १
ईदिलशाई परडे कोट मोगला-
स शास्ताखानाचे मारफातीने
दिल्हें १

शके १५८३ प्लवग संवछर

वैशाख शुध ११ सोमवारी श्रृं-
गारपुर राज्यानी घेतलें
तेथील राजे सूर्याराउ पळोन
गेले १
कार्तिक मासी राजश्री वर्धन-

दईरी गडास बुलाखीने
येऊन वेढा घातला तेथें काव-
जी कोंढाळकर जाऊन चारशें
लोक मारून वेढाकाढिला १
सिदि जोंहार सलाबतीखाना-

गडास जाऊन उष्णाकाल सं-
पूर्ण राहिलें १

भाद्रपद शुध शष्टी नरहरी
अनंदराउ यांस पेशवाई
दिल्ही अणी अनाजी पंतास
वाकेनिसी दिल्ही सरकार-
कुनास पालख्या दिल्या १

वरी अली ईदिलशाहा खा-
सा जाऊन लडाई करून मो
डिला तों पळोन केलोसीस गे-
ला अणी दो महिनीयानी
मेला १

( बाजू २ री )

शके १५८४ शुभकृत संवछरे
वरी खासा राजियांनी
पेणेस छापा घातला
मोरोपतास पेशवाई
भाद्रपद शुध द्वाससी
दिल्ही पेणेच्या जुझांत
व लोक हि जखमी

जामदारखाना
मिरे डोंगरास जाऊन
चैत्र वद्य दशमी गुरुवारी
निळोपतास मजमु दिल्ही
अनाजी पंतास सुरनिसी
वाघोजी तुपे जखमी जाले
जालें कांही पडिले १

शके १५८५ शोभकृत संवछरें

चैत्र शुध अष्टमी रविवार
शास्ताखानावरी पुणियात सि-
वाजी राजा खासा जाऊन छा-
पा घातला १ शास्ताखानाचा हात
तुटला मग पलाला त्यांचा लेक
अबदुल फते ठार जाला लाल मा-
हलात सिरले तेव्हा कान्होजी ना-
ईक जेधें यांचा पुत्र चादजी नाई-
क समागमे युध्य समई होते सर्ज्या-
राउ स्वाराच्या जमावांत नदी पालि-
कडें ठेविले होते राजश्री स्वामी
लाल माहालचे दिडीने बाहेर निघ-
ताच घोडियावरी

मार्गेसीर्ष मासी जसवंतसिंग
कोंढाणिया खाले वेढियास आले १
माघ शुध शष्टी शनवारी शाहाजी
राजे परलोकास गेले १
माघ वद्य चतुर्थी भृगुवारी
राजे फिरोन गडास आले पौष
मासी वद्य चतुर्थीस जाऊन
सुरत लुटिले १

( पान ७ बाजू १)

शके १५८५ शोभ कृत्य

चैत्रशुध
बैसोन निघोन स्वारीबराबर

कर्यात मावळात निघालें वरकड
जागाजागा लस्करच्या टोल्या
ठेविल्या होत्या त्यांही निघाल्या
१

शके १५८६ क्रोध संवछर

जेष्ट शुध चतुर्दसी सोमवारी जसवंतसिग कोढाणीयाचा वेढा काढिला त्यांचा सुबा तगीर होऊन जयसिंगास जाला १

मार्गेसीर्ष मासी खुदावद्पूर राजश्रीनी लुटिलें १

पौष वद्य अमवाशा माहाचळेश्वरी जिजाई आउ तुला जाली ग्रहण सूर्याचे होते १

सोनाजी पंती हि तुला केली १

कार्तिक मासी येदिलशाहाची व राजेंश्री स्वामीचा बिघाड होऊन खवासखान कुडाळास आले राजेश्री स्वामी शेनेसहवर्तमान जाऊन घोरपडें मारिले. खवासखानासी युध्य केलें तो पळोन घाटावरी गेला समागमे सर्ज्याराउ जेधे होते त्याणी युध्याची शर्त केली १

माघ मासी राजश्री जाहाजात बैसोन बसनुरास गेले ते शाहार मारून आले १

माघ वद्य पंचमीस सोनाजी पत परलोकास गेले १

शके १५८७ विश्वावसू संवछरे
( पान ७ दुसरी बाजू )

चैत्र वद्य दशमी शुक्रवारी राजश्री पुरंधरास आले १

वैशाख मासी जयेसिंग व दलेलखान येऊन पुरधरास वेढा घातला आषाढ शु १० राजश्री येऊन जयासिगास भेटोन सला केला राजेश्री संभाजी राजे यास पंचहजारी देऊन चाकर केलें १

फालगुण शुध नवमी सोमवारी राजश्री सिवाजी राजे व राजश्री संभाजी राजे येसें औरंगजबचे भेटीस गेले समागमे सर्ज्याराउ जेधे नेले १

येदिलशाहाचा व मोगलाचा सला जाला उठोन जयेसिग व राजश्री सिवाजी राजे व दलेलखान विज्यापरावरी मार्गेसीर्ष मासी चालून अले तेथें इदिलशाही फौजे सर्ज्याखान वगैरे येऊन लडाई दिल्ही मग अंतःस्तें द्रव्य देऊन विज्यापूरकरानी सला मग मोगलासी केला राजश्री सिवाजी राजे यांणी जयेसिंगापासून निरोप घेऊन राजगडास आलें १

शके १५८८ पराभव संवछरे

जेष्ट शुध द्वितीया राजश्री सिवाजीराजे अगरीयास पाऊन

श्रावण वद्य द्वादसी अगरीयाहून पटारयांत बैसोन पळाले

औरंगजबाची भेटी घेतली बिघाड होऊन राजश्रीस चौकिया दिल्या १

मार्गसीर्ष मासी परिमिया व ताजखान देवरुखी होतें तो झगडा होऊन मारिला हाती पाडाव केला १

यावरी राजश्री संभाजी राजे-सहवर्तमान मार्गेसीर्ष शुध पंचमीस राजगडास आलें १

श्रावण वद्य अमवाशेस त्रिंबकपंत व रघुनाथपंत कोरडे अगरा धरिले १

( पान ८ बाजू १ )

शके १५८९ प्लवंग संवछरें

चैत्र वद्य *पंचमी त्रिंबकपंत दबीर व रघुनाथ पंत कोरडें दिलीहून सुटलें राजश्री सिवाजी राजे यांचे व मोगलाचें सख्य जाले ते च वर्षी राजश्रींनीं मुलकाची बटाई केली १

कार्तिक वद्य पंचमी संभाजी राजे शाहाजादा व शाहा अलम यास भेटीस औरंगाबादेस गेले मोगलासी संला जाला १

वैशाखमासी बहलोलखान व राजश्री येकोजी राजे रागणीयास वेढा घातला राजश्रींनी वेढा मारून काढिला मग भाद्रपद मासी येदिलशाहाचा व राजश्री सिवाजी राजे यांचा संला जाला १

जसवंतसिंगाची भेटी कार्तिक वद्य शष्टीस जाली राजपुत्राचे दर्शन कार्तिक वद्य त्रयोदसी सोमवारी होऊन दुसरे दिवसी औरंगाबादेहून स्वार होऊन राजगडास आले १

शके १५९० कीलक संवछरें श्रावण शुध अष्टमी बुधवारीं प्रतापराउ व श्रावण शुध पंचमी रविवारी नीराजी रावजी स्वार होऊन फौजेनिसी औरंगाबादेस गेले १

शके १५९१ सौम्य संवछरें

भाद्रपद मासी औरंगजेबे कासीस उपद्र

( पान ८ बाजू २ )

व केला देवालये पाडिले १

माघ वद्य नवमी सुक्रवारी कोंढाणा घेतला उदयेभानं किलेदार मारिला तान्हाजी

पौष मासी मोगलाची व राजश्री सिवाजी राजे यांचा सला तुटला प्रतापराव आनदराउ फौजेनसी औरंगाबादेस शाहाजादी यांजवळ होते राजगडा आले १

---

* प्रथम दशमी असे होते ते खोडून पंचमी केलें आहे.

मालुसरा राजश्री कडील ह-
शमाचा सुभेदार पडिला १

फालगुण वद्य १२ भोमवारी
निळोपंत मजमदारानी पुरंधर
घेतला केसो नारायेण नऱ्हेकर
पडिले १

फालगुण सुध १५ राजगडी
राजाराम उपजले १

## शके १५९२ साधारण संवछरे

भाद्रपदमासी राजश्री रायेगडी-
हून मोगलाच्या मुलकावर चालि-
ले जुनरास वेढा घातला आपण
कार्तिक सुध प्रतिपदेस सुरतेस
जाऊन शाहार लुटिले १

कार्तिक वद्य त्रिंबक गड राज-
श्री मो–

कार्तिक सुध १४ सुरतहून फि-
रोन येतां दिंडोरीपासी दाउदखा-
न व राजश्री यांसी झगडा जाला
हर्ती येक पाडाव केला मग
कुंजरगडास येऊन राहि-
ले मार्गसीर्ष मासी कारंजीयास
गेले जातां

( पान ९ बाजू १ )

## पुरणी शके १५९२ साधारण संवछरे

रोपती घेतला १

पौष मासी सालेरी भेदेंकरून
घेतली १

आशाढ वद्य २ बुधवारी रो-
हिढा घेतला १

आशाढ सुध ९ गुरुवारी मा-
होली घेतली १

अहिवंत व रवलाजवला व मारकं-
डा हे गड काबीज केले १

जेस्ट सुध ४ सुक्रवारी माळा
लाऊन लोहोगड घेतला १

## शके १५९३ विरोधकृत संवछरे

वैशाख मासी महबतखानें
वेढा घाल(न) अहिवंत व मार-
कंडा व जवला अचलागरी हे
घेतले माघमासी मोरोपंती
हाशम घेऊन सालेरीची माची-
या वेढा मारिला उपराळा केला

जेस्ट मासों बाहादुरखान व दले-
लखान येऊन सालेरीस वेढा
घातला अस्विनामध्यें वेढा का-
ढून औरंगाबादेस आले आणि
तेथे फौज ठेविली १

( बाजू २ री )

प्रतापराव व आनंदराव फौजे-
नसी जाऊन बहलोलखान धरिला
मोहोकमसिग व दारकोजी भोसले
धरिले हती अकरा व घोडी सत-
रासे पाडाव केली १

माघ मासी सुलतान शाहा-
अलम औरंगाबादेहून दिलीस
गेले १

शके १५९४ परिधावी संवछरें

जेष्ट वद्य ५ मोरोपंत जाऊन
जवार घेतली तेथील राजा विक्र-
मशाहा पलाला मोगलाईत गेला १

जेस्ट सुध ७ कल्याणपंती
चिंचवडीं परलोकवास केला १

मार्गसीर्ष मासी अलि ईदिल
शाहा परलोकास गेले त्याचा
पुत्र सुलतान सिकिंदर तकती
बैसवि-

आशाड मासी रामनगर घेतले
तेथील राजा पलोन दवनेस
गेला १

जेस्ट सुध ५ भागानगरीचा
पातशाहा सुलताना अबदुला
कुतुबशा हा मेला त्यांचा जावई
तानाहाशाहा तकतीं बैसवि-
ले नाव सुलतान अबदुल
हसन ठेविले राजश्रीचें

( पान १० बाजू १ )

पुरवणी शके १५९४ परिधावी संवछरे

मार्गसीर्षे मास
ला खवासखान कारभारी जाला
राजश्रीचा व ईदिलशाहाचा सला
तुटला बावार्जा नाईक पुंडे वि-
जापुरी वकील होते त्यास बोला
ऊन आणिले १

फालगुण वद्य १३ पनालागड
आणाजीपंती भेद करून को-
डाजी फर्जंद बराबर लोक
देऊन घेतला साठी लोक रवा-
ना केले त्यानी पनाला घेतला १

पुरवणी जेस्ट
हेजीब नीराजीपंत भागान-
गरास जाऊन येक लक्ष हो-
नाचा तह करून भागानग-
रीहून सासष्ट हजार होन
घेऊन राजश्री पासी आले १

शके १५९५ प्रमादी संवछरे

चैत्र सुध प्रतिपदा राजश्री
राइरीहून पनाल्यास

चैत्र वद्य १० भोमवारीं किले
परेली घेतली विजयी दशमी-
च्या मुहू

( पान १० बाजु २ री )

गेले ते च मासी बहलोलखान यांसी व प्रतापराव व अनंद्राव यांसी लडाइ जाहाली विज्यापुराजवळ फते जाली येक हती पाडाव जाला १

श्रावण वद्य ९ रविवारी सातारा घेतला कार्तिक मासी सर्जाखानासी व विठोजी सिंदे यांसी झगडा जाला विठोजी पडिला १

ते राजश्रीनी जाऊन बंकापूर लुटिले १

माघ वद्य १४ सिवरात्रीस बाहलोलखानात व प्रतापराव सरनौबत याचा झगडा निवटियास जाला प्रतापराव पडिलें १

फालगुण वद्य ११ संपगावीची पेठ लुटिली आनंद्राव येतां सिद्रखानासी लडाई जाली दोन हती पाडाव केले १

शके १५९६ आनंद् संवछरे

चैत्र वद्य १४ राजश्री स्वामीनी केळंजा घेतला वद्य पक्षी फते जाली १

*चैत्र वद्य ९ बुधवारी दो प्रहरां रात्री मातुश्री जिजाई आउ पाचाडात निवर्तली

१ १

( पान ११ बाजु १ ली )

पुरवणी शके १५९६ आनंद् संछर

माघ वद्य ५ गुरुवारी राजश्री संभाजी राजे यांची मुंज जाली चैत्र शुद्ध १३ चिपोळणात लश्करची पाहाणी केली आणि राजश्री हंबिरराव मोहिते यासी सरनौबती दिल्ही १

फालगुण वद्य ५ मीस राजश्री स्वार जाले ते चैत्र वद्य ५ फोंडियास वेढा घातला बराबर राजश्री सरज्याराव जेधे होते १

जेस्ट शुद्ध १२ शुक्रवार घटी २१ पले ३४ स वी ३८।४० सी ४२ तीन घटिका रात्र उरली तेव्हा राजश्री सिवजी राजे भोसले सिव्हासनी बैसले छ. १० रबिलावल सु ॥ खमस सबैन

जेस्ट शुध ४ घटी ५ अवल सालिं राजश्रीची मुंज जाली जेस्ट शुद्ध ६ शनिवारीं समंत्रिक विवाह केला १

राजश्री स्वामी सिंव्हासनारूढ जाले ते दिवसीं जेधे व बादल

---

* ज्येष्ठ पाहिजे.

अलफ

१ व मावळचे देशमुख व लोक
याणी अर्ज केला कीं आमची
सर्फराजी करावी

बाजु २ री

त्यास राजेश्री स्वामी बोलिले
की आधी पान मावळचे व तुमची
वतने आपल्या वंशाने चालवा-
वी अन्याये तुमचा जाला तरी
क्षमा करावा तुमचे चालवावे १

शके १५९७ राक्षसनाम संवछरे वैशाख शुध २
राजश्री स्वामींनी फोडाचा कोट सुरुंग
लाऊन उडविला मेंग जेस्ट मासी कडवाडीं सी-
वेस्वर व आकोलें कबज केलें ते समई
राजश्री शरज्याराव जेधे समागमे होते
त्यानी तरवारेची शर्ती केली व बल कबज
करून रायगडास गेले त्या समई राजश्री
बाबाजी नाईक पुडे मृत्यू पावले सातारा
मार्गसीर्ष शुद्ध ५ पंचमीस घेतला बहलोल-
खान खवासखानें धरिला आपण कार-
भारी जाला छ ३ रमजान १

(पान १२ बाजू १)

शके १५९८ नल नाम संवछरे

जेस्ट वद्य ३० बहादुरखानासी व
बहलोलखानासीं हलगीस लडाई
जाली ईसलामखान रुमी मोगलाचा
पडिला बहलोलखानाची फते जाली
आशाड वद्य ४ रा नेतोजी
पालकर यानी प्राश्चीत घेतले
शुध जाले १
फालगुण मासी राजश्री सिवजी
राजे भागानगरास जाऊन पात-
शाहाची भेटी घेतली बा। राजश्री
सर्जाराव जेधे देसमूख ता। भोर

पौश मासी हुसेनखान माइणा
यासी व राजश्री हंबिरराव यासी
गदक प्राते यालगेदला जवळ
पाडाव केला दोन हजार घो-
डे व हाती पाडाव जाले
युध्य समई राजश्री नागोजी
बिन सर्जाराव जेधे याणी
युध्याची शर्त केली खाण्या-
च्या हतीच्या सोडेवरी वार
करून हाती वलिला तेव्हा
हसनखानाने हतीवरून

व येसजी कंक सरनोबत होते
त्यावरी पातशाही फौज बा घेऊन
करनाटकास गेले १

तीर मारला तो मस्तकी
लागोन हणवटी जवल
निघाला ते जखमेने ठार
जाले त्याची स्त्री गोदु-
बाई घोरपडी याची कन्या
कारीस सती निघाली १

कार्तिक सुध शष्टी ६ रविवार
राजश्री सभाजी राजे श्रीगार-

बाजू २ री

पुरास जाऊन राहिले होते १

शके १५९९ पिंगल संवछरे

चैत्र मासी राजश्री सिवाजी
राजे भोसले याणी चंजी घेत-
लीं कुल करनाटक कबज केले
आशाढ मासी त्रीपती जवल
सेरखान बैरागी पाडाव केला
ते समई राजश्री सर्जाराव जेधे
याणी युध्याची शर्त केली राजश्री
कडे हाती दाहा पाडाव जाले १
चैत्र मासी वद्य १२ राजेश्री त्रिं-
बकपंत दबीर यानी सिवपुरी
कैलासवास केला १
आशाढ मासी बहादुरखाने
अदलशाहाचे लालदरगे कोट
घेतला श्रावणमासी रणमस्तखा-
नाच्या विद्यमाने नलदुर्ग घेतले १

श्रावण मासी राजश्री सिवजी
राजे याणी व राजश्री यकोजी
राजे यार्चा भेटी जाली परस्परे
कित पडोन येकोजी राजे
न पुसता पळोन तजावरास
गेले त्यावरी राजश्री स्वामी-
नी त्याची विलात जगदेवगड
व मुलुक व चिदंबर व ब्रधा-
चल हा प्रात कुल घेतला
आणि कोल्हारास वेढा घात-
ला १
भाद्रपद मासी बहादूरखान त-
गीर होऊन दिलेरखान सुबा
आला मग अस्वीन मासी मळे-
खिडीस सर्जाखान व मसुदखान
व भागानगरकर मिळोन दिलेल-
खानासी झगडा केला मोगल
निघोन नलदुर्गास गेला ३

( पान १३ बाजू १ )

पुरवणी शके १५९९ पिंगळ सवछरे

आश्विन मासी राजश्री रघुनाथ

पौश मासी बहलोलखान पार-

नारायण यासी मजमु
दिल्ही लाख होन बकसीस
दिल्हे चजीचा साहेबसुबा
दिल्हा कार्तिक मासी राजश्री
स्वामी करनाटकातुन ग-
दक प्रांतास अले बलेवडी-
स वेढा घातला १
मार्गशीर्ष मासी राजश्री मो-
रोपंत पेशवे यानी नासीक
लुटिले त्या प्राते विक्रम
शाहा जेवरचा राजा होता
तो व सिदी फकीर मोगलाचा
फौजदार होता तो पाडाव
केला फते जाली १

लोकास गेले विजापूर मसुदखा-
नाच्या हावाला जाले तो च
कारभारी जाला १
कार्तिक मासी येकोजी राजे
फौउजेनिशी हंबीरराव सरनौबत
यासी करनाटकात अहिरीपासी
झगडा जाला येकोजी राजे यानी
तीन हजार घोडी व हती पाडाव
केले सरदार पाडाव केले अणी
जाऊन त्रिपदीस बैसले
मग कोल्हार कोट येकाजी
राजे यानी देऊन सला केला १

( बाजू २ री )

शके १६०० कालयुक्त संवछरे

जेष्ट मासी राजे गदक प्रांत
कबज करून रायेगडास अले १
पोश सुध १० संभाजी राजे
पारखे होऊन पालीगडावरून प-
ळोन मोगलाईत दिलेरखानापासी
गेले त्यानी त्यासी सप्त हजारी
दिल्ही संन्मान केला १
फाल्गुण वद्य १० शाहा अलम
अवरंगाबादेस आला अणी
अजमीरावर अवरंगजेब चढोन
गेले राणियावरी मोहीम
केली १

श्रावण सुध १४ करनाटकातील
पेरोलकोट रघुनाथ पंती व
अनंदराव याणी वेढा घालून
घेतला १
पौश वद्य १० पताजी
पंत वाकेनीस निवर्तले असेती
१
माघ वदी येकादशी भूमी-
कंप जाला १
बुधवारी रात्रउ २० । ४४
शृगारपुरी भवानीबाई लेक
संभाजी राजे यासी जाली १

शके १६०१ सिधार्थी संवछरें

चैत्र सुध प्रतिपदेस मोरोपंत
पेशवे याणी हुसेनखान माये-
णा याचा लेक पाठऊन किले

वैशाख सुध २ गुरुवारी
दिलेरखाम भूपालगड घेतला
रामनवमीस थोरले अनंद

कोपल घेतले अणी हुसेन-
खानास सोडिले अपला चा-
कर केला १

राव याणी बाळापूर घेतले १

( पान १४ बाजू १ )

पुरवणी शके १६०१ सिधार्थी नाम संवछरें

भाद्रपद सुध प्रतिपदेस शा-
मजी नाईक विजापुरास पाठवि-
ले अश्वीन मासी दिलेरखाने
विजापुरास वेढा घातला का-
र्तिक मासी ईदिलशाहाचा व
सिवजी राजे याचा सला जाला
त्याचि महिणियात राज्यानी जा-
ऊन जालनापूर लुटिले तेथे
रणमस्तखानासी लडाई जाली
सिदोजी निंबालकर गोळी ला-
गोन ठार जाले राजे फिरोन
पट्यावरून रायेगडास अले १
अश्वीन सुध ३ शनवारी वासो-
टियावरी च्यार घागरी रुपये
२६००० सापडिले १

दुसरे दिवसी गयेगडी
तरवारातून ज्वाळा निघाल्या मा-
र्गर्षीर्ष मासी संभाजी राजे
मोगलाईतून पळोन पनालि-
यासी अले १
पौष वद्य ७ भोमवारी रा-
ज्याची त्याची भेटी जा-
ली माघ मासी ईदिलशाहा-
चा मोगलाचा सला जाला
विजापूरचा वेढा उठिला १
फालगुण वद्य १० राजारा-
माचा विवाह जाला राये-
गडी प्रतापरायाची लेक
केली फालगुण वद्य २ राजा-
रामाची मुंजी जाली १

शके १६०२ रौद्र संवछर

चैत्र शुध १५ पौर्णिमा शन-
वारीं दों प्रहरां दिवसां राय-
गडी सिवजी राजे

वैशाख शुध ३ त्रितीयेस रा-
जारामास अनाजीपंत सुर-
णीस यानी मंच-

( बाजू २ री )

यानी देह ठेविला सुर सन
समानीन अलफ जेस्ट मासी
मोरोपंत पेशवे अनाजीपंत
प्रल्हादपंतास हबिररायाने
धरून पनालियास संभाजी
राजे यांजपासी नेले कुल फौज
येकत्र होऊन राज्य संभाजी
राजे यासी दिल्हे श्रावणमासी

की बैसविले संभाजी राजे
यास कैद करून यैसा तर्ह
करून मोरोपंत व आपण
पनालियावर चालोन गेले १
आशाढ शुध २ शुक्रवारी
संभाजी राजे रायेगडास
आले राज्य करू लागले
राजाराम कैदत ठेविले १

बाहादुरखान सुबा होऊन आले
आणि अहिवंतास वेढा घालून
दिलेरखान हुजूर गेले १
आश्वीन वदीं मोरोपंतीं देह
ठेविला रायेगडी मेले त्याचे
पुत्र निळोपंत सोडिले पेश-
वाई दिल्ही १
अनाजीपंतांस हि सोडिले
मजमु दिल्ही त्यास मार्गसीर्ष
मासी बऱ्हाणपूर हबिरराव
यानी मारिला १

श्रावण शुध ५ पंचमी सं-
भाजी राजे मंचकारोहोन
जाले १
पौश मासी रघुनाथ नारा-
येण चंदीत धरविले आ-
णि हरजी राजे माहाडिक
व शामजी नाईक पुंडे यासी
कर्णाटकाचा कारभार सांगि-
( त ) ला १

( पान १५ बाजू १ )

पुरवणी शके १६०२ रौद्र संवछरे

श्रावण वदी २ दाभोळेस मोत्याची
ग्रस्टी जाली श्रावण वद्य ५ रायग-
डास आणून राजयानी
पाहिली २

माघ सुध ७ रायेगडी
संभाजी राजे सिंव्हासनी
बैसले १

शके १६०३ दुर्मती संवछरे

चैत्र मासीं हरजी राजे मा-
हाडीक व शामजी नाईक
यांस संभाजी राजे यानी
बाा जईतजी काटकर व
बादजी कांडे हे फौज देऊन
कर्णाटकांत रवाना केली १
२
जेष्ट मासी सुलतान अक-
बर शाहा जाला औरंग-
जेबावर यागी होऊन
त्रिंबकास आले त्यास सं
भाजी राजे याणी कोकण
णात पालीस ठाव दि-

कार्तिक शुध १३ रविवारी
पातशाहापुरी संभाजी राजे
यांची व अकबराची भे-
टी जाली अगदी सेनासमु-
दाये लश्कर व हशम देखी-
ल समागमे होते अकबरास-
मागमें दुर्गादास होता बहुत
सन्मान केला ते च मासी अ-
जमशहा औरंगाबादेस आ-
ला पौषमासी क्षय संवछरा-
मध्ये औरंगजेब बुऱ्हाणपुरास-
आला माघमासी हसन
अलिखान कल्याणभिवडी

ल्हा
भाद्रपदमासीं संभाजी राजे
यानी कवी क-

( बाजू २री )

जाऊन फिरोन गेला १

ळशाचा बोले मागती आणाजी
दतो सचीव यांजवर ईतराजी
करून मार दिल्हा त्या मारानें
राजश्री अनाजी पंत व बाळ
प्रभु व सोमाजी दतो व हिरा-
जी फर्जंद परळी खाले कैद
करून मारिले कर्णाटकात शा-
मजी नाइंक यास कैईद करविले १

शके १६०४ दुंदुंभीं संवछरे

वैशाख वद्य ७ गुरुवारी
संभाजी राजे यासी पुत्र जाला
सिवाजी राजे नाव ठेविले १
चैत्रमासी शाहादिखान
येऊन रामसेजेस वेढा

घातला वैशाखमासी रुपाजी
भोसले व मानाजी मोरे जा-
ऊन शाहादिखानासी गणेश
गावापासी भाडण केले पाचसे
घोडी पाडाव

चैत्र मासी कर्णाटकात श्रीरं-
गपटणकरात व हरजी माहा-
डिक व जईतजी कांटकर दा-
दजी काकडे त्रिचंनापंलीस
मदतीस गेले होते तेथे भांडण
जाले दोन हजार घोडी पा-
डाव केली श्रीरंगपटणकरा-
चा सरदार कुमार यास पा-
डाव केला पौश मासी रघु-
नाथ नारा

( पान १६ बाजु १ )

पुरवणी शके १६०४ दुंदुंभी संवछरें

पुरवणी चैत्रमास

केलीं त्यावर आश्वीन मासीं राम
सेजेचा वेढा उठिला १
मार्गसीर्षमासी रणमस्तखान ये-
ऊन कल्याणी बैसले त्यावर रु-

पुरवणी चैत्र मास

यण कर्णाटकांतून येऊन राज्या-
स भेटले त्यास मुजमु दिल्ही १
माघ मासी सुलतान अजम-
शाहा येऊन कोल्हापुरापावेतो

पाजी भोसले व केसोपंत व नि-
लोपंत पेशवे रवाना केले १

धाविला त्यास हबिरराया-
नी फिराऊन भवरे पलिकडे
लाविले १

शके १६०५ रुधिरोद्गारी संवछरें

चैत्रमासी रोहिलाखान कोलव-
णातून उतरोन रणमस्तखान घा-
टावरी घेऊन गेला येते वेळेस
रूपाजी भोसले याणी तिटोली या-
जवल लडाई केली पद्मासिग रज-
पूत घेतला युध्यप्रसग होऊन
पद्मासिग व कितेक थोर थोर लोक
मारिले १
अश्वीन मासी अवरंगाबाद्हून
अवरंगजब

वैशाख वद्य ४ बुधवारी र-
घुनाथ नारायेण वलणी नि-
वर्तले जेष्ट वद्य ११ संभाजी
राजे श्वार होऊन राजापु-
रास गेले फिरंगी यासी
हि बिघाड केला रेवदंडी-
यासी वेढा घातला १
अशाढ सुध पोर्णिमा ज-
नार्दन नारायेण याणी देव-
रुखी देह टेविला कार्तिक
वद्य ७ संभाजी राजे बांडि-
यास

( बाजू २ री )

अहमद्नगरास आले ते च
मासी दिलेरखान विश घेऊन
देह सोडिला ते च कार्तिक
मासी शाहाद्खिान पुणियात
येऊन बैसला १
पौश वद्य ६ शाहा अलम
रामघाटे उतरोन कुडाल व
बादे जालून घाटावरी फालगुण
सुध पोर्णिमेस गेला लस्कर
फार मेले. १
पौश वद्य ४ शहाबाद्खिान
देव घाटे उतरोन निजामपुर
मारिलें १

गेले गोविकर फिरंगी यानी
कोटास वेढा घातला होता
त्यासी लढाई करून वेढा
उठविला तेथे येसजी कंक
व त्याचा लेक कृष्णाजी कंक
याणे युध्याची शर्त केली १
मागर्षीर्ष मासी फिरंगी याचे
कुंभार जुवे घेतले साष्टी व
बारदेस मारिला १
पौश सुध पोर्णिमा राजे रा-
येगडास गेले
कवि कलशास तेथे
कुल येखत्यार देऊन ठेविले १

माघ सुध १ कविकलश अक-
बरास घेऊन भीमगडच्या
झाडीत गेले फिरंगी यास स-
ला केला १

शके १६०६ रक्ताक्षी संवछरे
वैशाखमासी शाहा अलम विज्या-
पुराजवल शेक्स म्हणून
गाव आहे तेथे बैसला १

( पान १७ बाजू १ )

पुरवणी शके १६०६ रक्ताक्षी संवछरें

विजापुरकरानी मोगलासी
बिघाड केला जेष्ट सुध १५
कबजी रायेगडास आले का-
र्तिक सुध ११ काथळागड मो-
गलानी घेतला पौष वद्य ४
शाहादीखान पुणाहू ( न ) दउड
करून बोर घाट उतरोन गा-
गोलील अला कविकलेशे
जाऊन भाडण दिल्हे फिरो-
न घाटावरी घेतला

कार्तिक सुध २ मानाजी मोरे
व गंगाधरपंत वासुदेवपंत
राहुजी सोमनाथ यासी संभा-
जी राजे यानी कैद केले १
पौशमासी येकोजी राजे
यानी तजावरी देह ठेविला १
माघ मासी कुडाल चा बादे-
शाई खेम सावत पारखा जा-
ला त्यास फिरंगी यानी असरा
दिल्हा १

शके १६०७ क्रोधन संवछरे
राहिमखान बहादुरखान रणम-
स्तखाम येऊन विजापुरास वेढा
घातला

वैशाखमासी भागानगरकरी
विजापुरास मदतीस तीन हजार
स्वार तीन लक्ष होन खर्चास
दिल्हे १
शाहा अलमे व बहादुरखान
येसे जाऊन भागानगर लुटिले
त्या

जेष्टमासी अवरंगजब अ-
मदानगरीहून कुच करून
सोलापुरास अले विजापु-
रावरी मोहिम केली १
अशाढ मासी संभाजी
राजे याणी विजापुरचे म-
दतीस कबजीस पा

( बाजू २ री )

च महिनियात मादृणावरी हाला
करून मारिले त्याचा भाऊ अकं-
णा मारिला कोड रुपये देऊन
मोगलासी सला केला १
ठविले ते जाऊन पनाळा
राहून फोजा रवाना केल्या १

शके १६०८ क्षये नाम संवछरे
अशाढ मासी अवरंगजब सोळा
पुराहून येऊन विजापुरासी लगट
केला

आश्वीन सुध ७ सोमवारी वि-
जांपूर अवरंजबे घेतले सु-
लतान सिकिंद्र भेटला यासी
नजरबद केले सरजाखान
व बहलोलखानाचा लेक
यासी पंच हजारी दिल्ही १
चैत्र मासी मिरज मोगली घे-
तली केसोपंत का ( ल ) गुण
सुध १० करनाटकात गेले १
केसो त्रिमंल कार्तिक मासी
करनाटकात रवाना केले
माघ मासी कुतुब शाहा
बसवपटण अदिकरून भा-
गानगर अवरंगजबास दिल्ही
कासिमखानाचे विद्यमाने ते
च मासी अवरंगजब भागा-
नगरास येऊन वेढा घातला
करनाटकात व देशात दुका-
ल पडिला फालगुणमासी अ-
कबर जाहाजात बसोन विरा-
नात गेला १

( पान १८ बाजू १ )

शके १६०९ प्रभाव संवछरे

अशाढ सुध १० बगलूर म्है-
सुरकेरी मदत अणून कासीम-
खानास फौजेनिसी घेतले १
अश्वीन सुध १ कासिमखाने
किलेद्दारासी भेद करून
पिलगोडे घेतले १
फालगुणमासी ईसमाईलखान
मका व याचमखान नाईक व
नेले कुतुबशाहा
जिवंत च देस्त केला १
पौश मासी अवरगेजब वि-
जापुरास अला शाहादिखा-
नास गाजदीखानी दिल्ही
अदवनी पाठविले तेथे जा-
ऊन वेढा घातला १
सर्जाराव जेधे समेत भाउ

सादी महमद येऊन कंची सोडिली १
फालगुण मासी अजमशाहा
याणी बेलगाव घेतले व कि-
तेक किले घेतले १

व लोक राजमाचीस राजश्री
निळोपत प्रधान याजवल
सेवेसी होतें १
भाद्रपद सुध १२ अवरंग
जब भेदें करून भागान-
गर घेतले

शके १६१० विभव संवछरे

चैत्र सुध प्रतीपदा हरजी
माहडिक त्रिणामलीहून कची-
वर गेले १
कार्तिक मासी कविकलश
याजवरी सिरखे पारखे जाले १
कलश पळोन खिलणीयांवर
गेला ते च

अश्वीन मासी विजापुरास
माहामारी अली १
मार्गसीर्ष मासी संभाजी राजे
याणी कलशाच्या बोले प्रल्हा-
दपंत व सरकारकून व किते-
क लोकास धरिले ते च मा-
सी औरंजगजेब विजापुरी-
त

( बाजू २ री )

मासी संभाजी राजे रायेगडी-
हून कलशाचे मदतीस आले
संगमेस्वरी सिर्कियांसी युध्य
करून त्यास पळऊन खेलणी-
यास आले १
माघ वद्य ७ शुक्रवासरी संभाजी
राजे व कविकलश रायेगडास
जावयास संगमेस्वरास अले
असता सेक निजाम दौड क-
रून येऊन उभयेतांस जिवंत
च धरून नेले वरकड लोक
रायेगडास गेले १
फालगुण वद्य १३ त्रयोदसी
हरजी माहाडिक याणी केसो
त्रिमल यांस संभाजी राजे याचे

लापुरनजीक भीमातीर ये-
थे आले १
फालगुण शुध ३ राजारा-
मास रायेगडचा किलेदार
चांगोजी काटकर व येस-
जी कक याणी माघ वद्य ३०
अहदखाना हून काढून
बाहेर आणून मंचकी बैस
विले मानाजी मोरे व वरकड
सरकारकून धरिले होते
ते सोडिले ज्याचें कायेभा-
ग त्यासी देऊन राजाराम
राज्य करू लागले येसजी
व सिदोजी फर्जंद यास कडे-
लोट केले १

विरपीत वर्तमान येकोन त्रिम-
णामली धरिले १

फालगुण वद्य ३० अवरंग-
जेब तुलापुरी संभाजी राजे
कविकलश यास जिवे
मारून सिरच्छेद केले १

( पान १९ बाजू १ )

शके १६११ शुक्ल संवछरे

चैत्र शुध १५ अवरंगजेब
झुलपुकारखानास पाठऊन
रागडास वेढा घातला चैत्र
वद्य १० शुक्रवारी राजाराम प-
लोण प्रतापगडास गेले १
अस्विन वद्य ८ गुरुवारी रा-
जाराम पनालियाहून स्वार
होऊन कार्तिक वद्य ११ वेलुरास
आले तेथून चंदीस आले १
कार्तिक मासी रायगडास ( स )
ला करून मार्गसीर्ष सुध २ रवि-
वारी रायगड मोगलास दिल्हा
संभाजी राजे याचे पुत्र सिवाजी
राजे यास तुलापुरास ओरंगजेब
यासी नेले पातशाहे त्यास हल्क
हाजारी केले शाहू राजे नाव ठेवि-
ले ते वर्षी कुंल गड मोगलें घेतले १

भाद्रपद शुध १४ केसोपंतास
हरजी माहाडिक याणी सोडि-
ले
अस्विन वद्य ११ हरजी मा-
हाडिक यांणी देह सोडिला
पौश वद्य ४ शनवार याचे
पानायेड ईस्मालखान मका व
ईत्यादिक मोगलाचे च्यार ह-
जार स्वार पारखे होऊन
निलोपंत पेशवे यांच्या विद्य-
माने येऊन राजारामास भे-
टले चेन पटणी भेटले १
वैशाख मासी सर्जाराव
जेधे देशमूख ता। भोर
ता। रोहिड खोरें यास
भाऊ समेत वतनावरी
जावयास अज्ञा दिल्ही
कारीस घरास अले १

( बाजू २ री )

शके १६१२ प्रमोद संवछरे

वैशाखमासीं जुलपुकारखान
अला मग याचे पानायेड व चं-
दाउर त्र्यबकराये व राजारा-
माची जेमेसी घाटावर गेली होती
ती निघोन खाली अली कांही
काम केले नाही १

भाद्रपद श्रुध ४ जुलपुकारखान
येऊन चंदीस वेढा घातला
राजाराम निघोन करनाटकास
गेले
मार्गसीर्ष शु ३ नेमाजी
सिदे व माणकोजी पाढरे

वैशाख वद्य द्वादसी सातारियास सर्जाखाने वेढा घातला होता त्यावरी राजश्री रामचंद्र पंडित सचीव व राजश्री शकराजी पंडित राजाज्ञा व संताजी घोरपडा व धनाजी जाधव जाऊन लढाई करून च्यार हजार घोडी व हती अठ पाडाव जाले सर्जाखान पाडाव जाला लाख रुपया घेतला अणी सोडिला प्रतापगड व वाईप्रातीचे किले राहिडा राजगड तोरणा हे किले राजश्री रामचद्र पंडित व राजश्री शकराजीपंत याणी घेतले १

व नागोजी माने मोगलाकडून पारखे होऊन दोन हजार स्वार घेऊन राजारामाकडे अले मोर्चा उठऊन चक्रपुरी बैसले

माघ मांसी राजाराम चंदीस गेले अवरगजब गलगलियास अले १

मार्गसीर्ष मासीं सर्जाराव जेधे देशमुख ताा भोर हे मावलच्या देशमुखाबाा तुलापुरास जाऊन पातशाई कौल व सिरपाव घेऊन अले बाा वे काजी दादाजी व सिवजीपंत व बाबाजीपंत

(२० बाजू १)

## शके १६१३ प्रजापती संवछरे

काम बकस शहाजादे अस्तखान जुलपुकाराचे मदतीस चंदीस अले पौश मासी दाखल जाली १

किले पनाला मोगलापासून घेतला राजश्री रामचंद्रपती राजश्री परशरामपंता बाा हशम पाठऊन घेतला १

## शके १६१४ अंगिरा संवछरे

मार्गसीर्ष मासीं शुध १५ धनाजी जाधव चंदीस राजारामाचे मदतीस राजश्री शंकराजी पंती रवाना केलें त्या णी जाता च पश्चमेची चौकी मोगलाची मारून ईस्माईल मका धरिला १

पांचसें घोडी दोनी हाती पाडाव केले मार्गसीर्ष वद्य १संताजी घोरपडा पंधरा हजार स्वारान-

पौश वद्य ११ जुलफिकारखान सला करून चंदीचा वेढा काढून वद्यवसार गेला १

असतखान कामबकास हुजुर गेले १

फालगुन मासीं बहिरजी घोरपडा व याचपनायक राजारामावरी यागी होऊन गेले ते याचपा नायेक सान गड घेतले अणी तेथे च राहिले

सी राजश्री रामचंद्रपती रवाना
केले ते चंदीस अले येते वेलेस
कचीजवल अलीमर्दाखान दस्त
केले पंधरासें घो-

तेच मासी संताजी घोरप-
डा जाऊन त्रितनापलीस वे-
ढा घातला तेच मासी रा-
जाराम हि खासा गेले त्रिचना
पली

( बाजू २ री )

डे व हती ६ पाडाव केले
मार्गसीर्ष वद्य ३ जुलफीका-
रखानें चंदीचा मोर्चा उठ-
ऊन जाऊन कामबकशास
कैद केले १

वरी मोहीम केली ते च वर-
सी मोगलीं पनालियास वेढा
घातला १

शके १६१५ श्रीमुख संवछरे चैत्र वद्य १३
त्रितनापलीकरासी व राजारामासी सला जाला
अणी चंदाउरीं शाहजी राजे यांची व राजा-
रामाची भेट जाली वैशाख मासीं संताजी
घोरपडे राजारामासीं हि बिघाड करून देशास
गेले त्यावरी धनाजीस नामजाद केले १
जेष्ट मासी याचक नायेक बहिरजी वेलुरा-
जवल होते तेथे राजारामे जाऊन त्यासी
झगडा केला १
मार्गसीर्ष मासीं याचक नायेक जुलपुकारास
भेटला चाकर जाला माघ मासी जुलफिकार-
खान व पलसीहून चंदाउरावरी चाली केली
फालगुन मासी बहिरजी

( पान २१ बाजू १ )

शके १६१५ श्रीमुख संवछरे मार्गशीर्ष मासी
बहिरजी घोर ( प ) डे यांचें समाधान केले आणि
हुजर आणिले ते चंजावरचे मदतीस पाठविले
कार्तिक मासीं राजश्री रामचंद्रपंत आमात्य
व राजश्री शंकराजी पंडित सचीव व धनाजी
जाधवराउ याणी जाऊन पनाळाचा
वेढा उठविला १
शके १६१६ भाव संवछरे सन सीत
तिसैन अलफ

राजश्री शंकराजीपंत सचीव
याणी राजश्री संताजी घोर-
पडे यांसी बोली केली कीं फौ-
जेनसी जाउन साहेबकाम
करावे राजश्री स्वामीजवळ
जुदे धाउन येती मर्यादेने राहोन
वेढा उठवावा बेमानी करू न-
येसे बोली करून शफत घेतली
बाा राजश्री येसाजी मलार मु-
तालीक दिल्हे त्या बाा फौज हण-
मतरांव निंबाळकर सर लश्कर
व सर

वैशाख मासी जुलपुकारखान
चंदावरास गेले त्याणी चा-
लीस लाख चक्र देवून
सला केला १
आस्वीन शुध १कुळ चंदी
खालील देश कबज करून
जुलपुकारखान आस्वीन
सुध सप्तमीस वेढा घालून
बैसला याचा पाईडास ध-
रून सिरछेद केला आणि
तेथून जाऊन जनदेव मु-
लुक व किले घेतले चंदी
जेर

( बाजू २ री )

दार मिलोन पंचवीस हजार
स्वार दिल्हे माा निलेच्या सदरेस
बसोन उभयतानी दिवाण कारभार
करून बेईमाने वर्तावे येसी बोली
करून कार्तिक मासी रवानगी
केली त्याणी फौज भारी करून
भांडियांच्या आवाजाचे कुच
करून मजल दर मजल करनाट-
कात गेले १
राजश्री शंकराजीपंत सचीव
राजगडास आले त्याणी राज-
श्री पंताजी सिवदेव चां-
बुजी कदम भोरपकर व वरकड
किल्याचे जमाव व दामाजी
नारायेण याचा जमाव देऊन
कारीस रवाना केले वेढा घा-
लून किला जेर केला दोघ्यास
निरोप देऊन फिरोन घेतला
राजश्री त्रिंबकपंत व मोरोपंत
वरकड लोक

केली १
किले कारीगडावर राजश्री
त्रिंबकपत मुतालिक होते
त्यासमागमे राजश्री यादो
सामराज व राजश्री माहा-
दाजी बाजी होते ते समई
रायानी बहुळकर याच्या
हाते भेद करून जुनरकर
दोघे मोगलाकडील येऊन
किला सिड्या माळा लाऊन घे-
तला यादव सामराज व
माहादाजी बाजी कबिले प-
श्चम दरबाजे याने घेऊन
भोरपेस गेले राजश्री त्रिंब-
कपंत व मोरो नारायेण
दोघ्याणी धरीले आबाजी-
पंत लवेचा सबनीस होता
तो पडिला वरकड सिपाई
गिरजोजी निबाळकर दि-
नकरराव लोक पडिले १

( पान २२ बाजू १ )

पुरवणी शके १६१६ भाव संवछरे सन सीत तिसैन

अलफ

कबिल होते ते सोडविले
राजश्री पंत सचीव कारनीस
जाऊन रायाजी बहुलकरास
मार देऊन बाले किंल्या राज-
गडी अटकेंत ठेविला १

शके १६१७ युवा संवछरे

जुलफीकारखाने वेळुरास
वेढा घातला १
पौष श्रुध ११ ते दिवसी
संताजी घोरपडे याणी खान
जापीखान व कासीमखान
सिटीयाजवळ डोडेरी म्ह-
णऊन गाव आहे तेथे
कैद केले कासीमखान तर
मेला खानाजादखानास लाख
रुपये

मार्गसीर्ष मासी धनाजी जाधव
कर्णाटकात जाऊन वेलुरास
जाऊन वेढा उठविला १
पौष मासी हिंमत बाहादुर संता
जी घोरपडियाने बसावापटणाज-
वळ मारिला जेष्ट मासी औरंग-
जेब गलगलाहून उठो ( न )
चनपुरीस राहिले १

(बाजू २ री )

घेऊन वाट दिल्ही १

शके १६१८ धाता संवछरे

चैत्रमासी औरगजेबें
गाजदीखानास बेदरावरी
वागिनगीरीयावर रवाना १
केले १
जेष्ट वद्य ४ भोम वासर
घटिका ४। पले ९धनिष्टा
४३ विश्कंभ योग २९।९
रात्रौ घटी १८।१० राजा-
रामास पुत्र जाला नाव
सिवाजी राजे ठेविले

चैत्र मासी राजारामाच्या
दर्षणास संताजी घोरपडे
चंजीस गेले जेष्ट मासी बि-
घडोन कची आलीकडेस
भाडण जाले धनाजी जाधव
पलोन देशास आला अमृत-
राव निंबाळकर पडिला संता-
जीची फते जाली १

शके १६१९ ईश्वर संवछरे

चैत्र मासी संताजी घोरपडे सातारे प्रांते आले त्यावर गाजदीखान नामजाद आला १

आषाड मासी संताजी घोरपडे यासी नागोजी माने याणी माहादेवाजवल दगा देऊन मारिले १

( पान २३ बाजू १ )

पुरा शके १६१९ ईश्वर संवछरे

श्रावण वद्य ११ सोमवारी राजारामानी कर्ण मोगलाईत पाठविला १

मागसिष सुधं ५ मोगलानी चंजीस वेढा घातला १

# शक १८३७ तील संशोधनाची हकीकत

१ गेल्या साली मी खालील स्थलीं हिंडलों:—

| | |
|---|---|
| १ उरवडें | १२ सातारा |
| २ जंजिरा | १३ धावडशी |
| ३ दिव | १४ कळंब |
| ४ श्रीवर्धन | १५ वेचलें |
| ५ आसनगांव कुमठें | १६ करंदी |
| ६ पळसदेव | १७ बहुली |
| ७ पाली | १८ तळबीड |
| ८ चाफळ | १९ गोवारें |
| ९ उरल | २० कऱ्हाड |
| १० मरळी | २१ कान्हूर पठार |
| ११ दिवशी | २२ कण्हेर आकलें |

ह्या बावीस स्थलीं दर वर्षातल्या प्रमाणें कागदपत्रें, शिलालेख, आणि मराठी व संस्कृत पोथ्या ज्या उपलब्ध झाल्या त्यां पैकीं कांहीं वर टिपणें मंडळा पुढें गेल्या वर्षी वाचली व कांहीं वर निबंध व टिपणें धुळयाच्या रामदास व रामदासी मासिकांतून प्रसिद्ध केलीं, बाकी राहिलेल्या पोथ्यां वर जें लिहावयाचें तें माझ्या हस्तें किंवा इतरांच्या हस्तें पुढील सालांत मंडळद्वारा व मासिकपुस्तकद्वारा व स्वतंत्रग्रंथद्वारा लिहितां येईल. कागदपत्रांसंबंधानें व पोथ्यां संबंधानें एक बाब नमूद करून ठेवितों—ती ही की क्वचित् स्थलीं कधीं कधीं अस्सल कागदपत्र व पोथ्या मालकां कडून ऐन जिन्नस मिळतात, व अनेक ठिकाणी मालक

पोथ्यांच्या व पत्रांच्या नकला करून घेऊन जाण्यास सांगतात. हा दुसरा प्रकार जेथें घडतो, तेथें पोथ्या व पत्रें यांचा संग्रह तात्काल तेथच्या तेथें नकला किंवा फोटो करून घेतल्या बिगर होण्या सारखा नसतो फोटोनें म्हणा किंवा हातानें म्हणा, एक नकला तरी करून घ्याव्या किंवा संग्रहाचा नाद सोडून तरी द्यावा. पैकी पत्रांचे व पोथ्यांचे फोटो घेऊं म्हटले, तर तें काम दर वर्षी हजारो रुपयांनी हि भागण्या जोगे नाही. राहातां राहिल्या नकला–पण तें हि काम लहानसहान खर्चाचे नाही. दर वर्षींचा माझा असा अनुभव आहे की शेकडो पोथ्या व कागद-पत्रें, नकला करून घेण्या पुरतें मनुष्य बळ नसल्या मुळें, हस्तगत करण्याचा हव्यास निरुपायानें सोडून द्यावा लागतो. उदाहरणार्थ, यंदाचें च वर्ष घ्या. कऱ्हाड येथील कोळेवाडीकर देशपांडे व काजी या दोन घराण्यांचे कागदपत्र व पोथ्या दहा पांच दिवस पाहात होतो. पैकी कोळेवाडीकर देशपांडे यांच्या संग्रहास असलेल्या पोथ्यातून अद्याप पर्यंत अज्ञात असलेल्या ग्रंथांची च तेवढी मी निवड केली–ती ही आपल्या पुढे आहे. पोथ्या ऐनजिनशी देऊन टाकण्याला मालक तयार नाहींत. त्यांच्या नकला करून घेऊन जाण्यास त्यांची हरकत नाहीं. आपल्या पुढें ज्या पोथ्या आहेत, त्यांच्या नकला करण्यास दररोज आठ तास काम करणाऱ्या एका लेखकाला तब्बल दोन वर्षें पुरणार नाहीत. ही च कथा कऱ्हाड येथील काजीच्या कागदपत्रां संबंधानें सांगावयाची आहे. कागद शिव-कालाच्या अगोदरचे व नंतरचे असे मिळून दोन अडीचशे आहेत. त्यांच्या नकला करून घेण्यास आठ तास खपणाऱ्या लेखकाला दोन महिने पुरणार नाहीत. साताऱ्च्या महाराजाचें हि दफ्तर पाहिलें. व त्यांतून शिवकालीन व इतर–कालीन कागदपत्रांची निवड केली. ती इतकी भरली कीं त्यांच्या नकला करून घेण्यास दहा कारकून दोन वर्षें सतत खपले पाहिजेत. तेव्हां, इतर–कालीन कागदपत्र तुर्त जसे चे तसे साताऱ्च्या दफ्तरात ठेऊन देऊन फक्त शिवकालीन पत्रांच्या नकला करून घेऊन मूळ पत्रें मालकाला परत करण्याच्या बोलीनें जीं आणिलीं त्याचा रुमाल हा आपल्या पुढे आहे. हा एक रुमाल नकल करून घेण्यास एका भरपगारी लेखकाला चार महिने जेमतेम पुरतील. तळबीड येथील मोहित्याचे कागद लिहून काढण्याला दोन लेखक एक महिनाभर खपत होते. आपल्या मंडळाचे सभासद रा. पोतनीस यांनी आपल्या संग्रहांतील एक गाडा भर कागद व पोथ्या मला उदारपणानें देऊन टाकल्या म्हणून बरें झालें. नाही तर नकला करून घेऊन जाण्याचा जर त्यांनीं हट्ट धरला असता, तर त्या सबंद गाडाभर पोथ्यांच्या व पत्रांच्या नकला करण्यास एका लेखकाला शभर वर्षें लागतीं किंवा शंभर लेखकांना एक वर्ष लागतें ह्या वर्षीच्या संग्रहाचा च हा अनुभव आहे, असें नव्हे. दर वर्षाचा च हा मासला आहे. शेकडों कागद व पोथ्या नकला करून घेण्यास मनुष्यबळ नसल्यामुळें सोडून द्याव्या लागतात, ह्या सोडून दिलेल्या

पोथ्यांत व पत्रात शेकडो पर्जे असे असतात की, त्यांच्या संग्रहा विना इतिहास-रचनेंत मोठे मोठे खंड पडतात. तात्पर्य, नकला करण्यास व त्या जागच्या जागी व तेथल्या तेथे करून घेण्यास शोधका जवळ मनुष्यबळ हवें. गेल्या वीस पंचवीस वर्षांच्या अनुभवावरून असे निश्चित विधान करता येते की, मला एकट्याला च कमीतकर्मी सतत वर्षोनवर्ष लिहिणारे चार लेखक हवे.

२ वर्षोनवर्ष चार लेखक नोकरीस ठेवावयाचे म्हणजे एक द्रव्यबळ तरी पाहिजे किंवा इतिहासाच्या अपरंपार भक्तीनें लिहिण्याचे काम फुकट व मोफत करणारे लेखक तरी पाहिजेत. पैकी मोफत काम वर्षोनवर्ष करणाऱ्या लेखकांची बाब दुर्मिळतेस्तव सध्या आपण बाजूस ठेऊं. पृथ्वीवर अल्पस्वल्प (?) हि कृतयुग जोपर्यंत उगवले नाही तोंपर्यंत द्रव्यबळाच्या पक्षाचा च तेवढा परामर्श घेणें युक्त आहे. असें द्रव्यबळ गेल्या वर्षी मुंबईविश्वविद्यालयाकडून मला मिळालें रक्कम पाचशे रुपयांची होती. तिचा वाटेल त्या योग्य तऱ्हेनें विनियोग शिवकालीनइतिहासशोधार्थ मी करावा, अशी विश्वविद्यालयाची परवानगी होती. फक्त तो विनियोग कसा केला तेवढें विश्वविद्यालयाला तपशीलवार कळवावे, एवढी च काय ती अट होती आणि ही अट कांही गैरवाजवी नव्हती. दिलेला पैसा सत्कारणी कसा लागला, हे समजून घेण्याची इच्छा कोणत्या हि सात्विक दात्याला सहज च असणार . त्या इच्छेबरहुकूम पांच-शे रुपयाची विल्हेवाट लावण्याचा प्रयत्न मी कसा केला, तें निवेदन करतो. गेलीं वीस वर्षें मला जी मुख्य अडचण भासे ती बरोबर हिंडणाऱ्या लेखकाची. आजपर्यंत लेखक बरोबर घेऊन जाता कां येत नसे, तर त्यांना देण्याला मजजवळ पगार नसे. विश्वविद्यालयाचे पाचशे रुपये हातीं आल्या बराबर, चार खदे लेखक मिळविण्याच्या खटपटीस मी लागलों खऱ्या लेखकाची, माझी व इतर सर्व शोधकांची हि कल्पना अशी आहे. ( १ ) लेखकाला पेशवाईतील मोडी पत्रे वाचतां यावी. ( २ ) लेख-काला शिवकालीन व शिवपूर्वकालीन पत्रे वाचता यावी ( ३ ) लेखकाला बरेच फारसी शब्द व त्याचे मराठी अपभ्रंश माहीत असावे. ( ४ ) लेखकाचे अक्षर लिहिणाऱ्याला बिनचुक वाचतां येईल असे असावें. ( ५ ) लेखकाला अस्सलबरहुकूम नकल, एक हि कान्हा, मात्रा, अनुनासिक, किंवा अक्षर, कमी किंवा जास्त न काढता, करण्याचे वळण असावे. ( ६ ) लेखकानें अवघड ठिकाणी आपल्या पदरचा शब्द न घालतां, मूळ जसें चे तसें, नकलेंत वठविलें पाहिजे. ( ७ ) लेखकाला मराठ्यांच्या इतिहासाचे, काव्याचें, व महाराष्ट्रभूचे ज्ञान असावें; म्हणजे विशेषनामांच्या नकला ता बरोबर करील. ( ८ ) लेखकाला छापील पुस्तकांतील शुद्धलेखन चांगलें माहीत असले पाहिजे असली अष्टपैलू एक नव्हे चार लेखकरत्नें शोधून काढण्याच्या खटपटीस मी ताबडतोब लागलों. ट्रेनिंगांतलें तीन परीक्षावाले, इंग्रजी कालेजांतले बी ए, एम्. ए., पेन्शनर मराठी मास्तर वगैरेंना चारचार आठ आठ

दिवस निरनिराळ्या काळचे कागद व पोथ्या लिहावयाला देऊन पाहिल्या. परंतु, असा अनुभव येऊं लागला की, बी ए असो की, एम्.ए., असो, ट्रेनिंगवाला असो की, पेन्शनर असो त्याला निदान दोन वर्षें रुळविल्या खेरीज त्याच्या हातून शहाजोग नक्कल होणे मुष्किलीचे आहे वर्ष दोन वर्षे नाना प्रकारच्या गद्य व पद्य नकला हातून होऊन गेल्या खेरीज, विश्वसनीय असा लेखक पैदा होऊ शकत च नाही. वाटेल तो मनुष्य उठेल आणि एकदम नकला करूं म्हणेल, तर तो आपली फाजिती क्षणांत करून घेईल. सशास्त्र नकला करणे व ग्रंथ उतरणें मोठें जोखमीचें काम असून, इतिहाससंशोधकांची सर्व मदार ह्या सशास्त्र लेखकांच्या श्रमा वर आहे. खर्चाला थोडेसे पैसे हाती आले खरे, परंतु ते हाती येऊन न येऊन सारखे च झाले. कसोशीनें अस्सल बरहुकूम नक्कल करणारे लेखक, चार जाऊं द्या एक हि मिळे ना. मिळालेले पैसे लेखक तयार करण्यांत खर्चिले पाहिजेत असा प्रसग आला. नांव घेण्या जोगा लेखक दोन वर्षांखाली तर तयार होणें मुष्कील. तेव्हां, असा पहिला कयास केला की, संशोधनाला साहाय्य म्हणून जें द्रव्य मिळेल तें प्रथम होष्यमाण कारकुनांना तयार करण्या करिता व पोसण्या करितां खर्च केलें पाहिजे. ट्रेनिंगवाल्यापेक्षां ग्राज्युएट किंवा अंडरग्राज्यूएट सुधारणाक्षम जास्त असतो व सांगितलेलें काम जास्त लवकर व शिताफीनें उचलतो. असे ग्राज्युएट किंवा अडरग्राज्यूएट लेखक उमेदवारीस जेव्हां ठेवावे, तेव्हा हे काम नीटपणें रेटेल. अंडरग्राज्युएटाला पंचवीस व ग्राज्युएटाला चाळीस रुपये दरमहा दिला तर पाचशे रुपयांत दोन अंडरग्राज्युएट किंवा एक ग्राज्यूएट जेमतेम एक वर्षभर कसा तरी पोसता येईल. एक तरी योग्य लेखक तयार करण्याच्या कामी हे पाचशें रुपये खर्चावे असें माझ्या मनांत आलें पण तें हि मनातल्या मनात च जिरले. कारण, हे पाचशे रुपये पुढील वर्षी मिळतील च व पांच पंचवीस वर्षें मिळत राहातील च असा भरंवसा नव्हता. शिवाय, ज्या ग्राज्युएट किंवा अडरग्राज्युएट किवा ट्रेनिंगवाल्या इसमाला उमेदवार ठेवावयाचा, तो असा प्रश्न करी की, तुमच्या पाशी उमेदवार म्हणून वर्षभर मी राहिलों, तर जन्मभर मी राहीन अशी द्रव्यसामुग्री तुमच्या जवळ कोणती आहे ? अशी हमी उमेदवार मागूं लागले. ती हमी देणे अर्थात च अशक्य होतें. तेव्हा हे उमेदवार तयार करण्याचे काम मला निरुपायानें सोडून द्यावें लागलें.

२ सशास्त्र नकला करणारे उमेदवार तयार होणें कालावधीचें काम आहे. म्हणून यद्यपि ते सोडून दिलें, तत्रापि, मिळतील ते च लेखक बरोबर घेऊन संशोधनाला जावें, आस्ते आस्ते ते लेखक सुधारतील अशी कित्येकांची सल्ला पडली. पांचशें रुपयांत ही सल्ला कितपत अंमलांत आणता येईल याचा हि एक दोन प्रसंगी अनुभव घेऊन बघितला. नकल करण्यास चार पांच लेखक व मी स्वतः असे एका दूरच्या डोंगराळ गांवी जाण्याचा बेत केला. आज पर्यंत मी जो प्रवास केला आहे तो पायी केला असून, निर्वाह स्वतःचें अन्न स्वतः शिजवून केला आहे.

ह्या खेपेस बरोबर पांच चार लेखक न्यावयाचे होते. त्यांना सतत महिनोगणती पायीं प्रवास करण्याची संवय नव्हती व इच्छाहि नव्हती. शिवाय, आयतें अन्न खाणाऱ्या पैकी ते होते आणि त्यानीं तरी तसें कां नसावें ? कोठें हि चार पाट्या टाकून जे नोकरी करणार त्यानी आमच्या उद्योगाप्रीत्यर्थ व्यर्थ हाल कां सोसावे ! तेव्हा प्रवासाला बैलगाडी व घोडीं आणि अन्न शिजविण्याकरिता एक आचारी आणि भांडी घासण्या करितां एक हरकाम्या गडी, इतका सरंजाम घेतल्या शिवाय गत्यंतर नव्हतें. पुण्यांतून बाहेर गांवी फिरतीवर आचारी वीस रुपयांखाली मिळत नाही. आणि गडी जेवून आठ रुपयांखाली येत नाही. मिळून एकंदर महिना स्वारीखर्च येऊं लागला तोः—

| | | रु. |
|---|---|---|
| ४ | कारकून प्रत्येकी १५ रुपये प्रमाणे | ६० |
| १ | गाडी दर रोज २॥ रुपये प्रमाणे | ७५ |
| १ | आचारी महिना २० रुपये प्रमाणे | २० |
| १ | गडी महिना ८ रुपये प्रमाणे | ८ |
| | | १६३ |
| | | एकूण महिना |

यांत कागद, शाई, टपालखर्च महिना रुपये १० मिळून १७३ रुपये अथवा गोळा बेरीज १७५ रुपये महिना खर्च येईल असा अदाज झाला. म्हणजे पाचशें रुपयांची रक्कम फार तर तीन महिने कशी तरी पुरली असती. आणि इतकें हि करून बरोबर येणाऱ्या चार कारकुनांनी, शिवकालीन खर्डे किंवा तीनशे वर्षां-पूर्वील पोथ्या तर सोडून च द्या, अगदी अलीकडील पेशवाईतील हि साधीं पत्रे बिनचुक नक्कल केली असती की काय या विषयी शंका च होती. तेव्हां हा हि मार्ग पत्करण्याचा हव्यास मी सोडून दिला आणि विश्वविद्यालयाने दिलेली पांचशे रुपयांची रक्कम तशीच ठेऊन दिली. विचार असा की तिचा अन्य तऱ्हेनें उपयोग जमल्यास करून घ्यावा.

३ तात्पर्य, संशोधनार्थ स्वारी काढावयाची म्हणजे ( १ ) रुळलेले कारकून वर्ष दोन वर्षें अगोदर तयार केले पाहिजेत आणि ( २ ) नंतर प्रवासखर्च व जेवण-खर्च ह्या कारकुनांचा चालविला पाहिजे, इतके च नव्हे तर पांचपंचवीस वर्षें त्यांची नोकरी टिकेल व कदाचित् त्यांना पेन्शन हि देतां येईल, अशी हमी घेतली पाहिजे. संशोधनार्थ स्वारी काढावयाच्या कामी अशा ह्या अडचणी उद्भवल्या त्या आपल्या पुढें मांडल्या आहेत. आता कारकन वगैरे ठेवण्याच्या भरीस न पडता, मी स्वतःच प्रवास करण्याच्या कामी या पैशाचा विनियोग केला असता, तर इतकें उघड आहे की, मला किंचित्, कदाचित् बरें च स्वास्थ मिळून, माझी पायपीट कमी झाली

असती. बाकी, पांचशें रुपये जवळ नसतांना जितक्या नकला मी करीत असे, त्याहून म्हणजे जास्त नकला पांचशें रुपये कडोसरीला लावून मी करूं शकलों असतों, असें नाही. तेव्हा, ह्या हि मार्गानें ह्या पाचशे रुपयांनी माझें सामर्थ्य वाढलें नाही. कदाचित् कोणी म्हणेल की ह्या पांच शे रुपयांत फोटोग्राफीचे सामान मी विकत घ्यावयाचें होतें. पण त्या हि म्हणण्यात मला विशेष अर्थ दिसत नाही. चांगला इतिहासकामाला योग्य असा क्यामेरा च घेण्याला पाच शें रुपये लागतात. प्लेट्स व रसायणें यांचा खर्च वेगळा च. शिवाय क्यामेराचें लचांड बरोबर बाळगावयाचें म्हणजे, निदान दोन गडी सतत बरोबर वागविले पाहिजेत. म्हणजे दरमहा वीसपंचवीस रुपयांचा खर्च आला. तात्पर्य, विश्वविद्यालयानें दिलेले हे पांच शें रुपये मला कोणत्या च तऱ्हेनें उपयोगी पडतनात. जो जो म्हणून मार्ग स्वीकारावा त्या त्या मार्गाला हे पांच शें रुपये कोते पडतात.

४ विश्वविद्यालयानें हे पांच शें रुपये फक्त शिवकालीन शोध करण्या करितां दिलेले आहेत, हेंहि मला सदा लक्ष्यात ठेवावे लागे. शिवकालीन शोध म्हणजे शिवाजीच्या पूर्वीच्या वेळच्या व किंचित् नंतरच्या काळांतील समाजाच्या अनंत हालचालींच्या इतिहाससाधनांचा शोध. यांत शिवकालीन शिलालेख, इमारती, किल्ले, गड, कोट, तलाव, कालवे, घाट, देवळें, समाधि, घरें, झोंपड्या, मठ, कारखाने, वगैरेंचा हि शोध येतो. हा शोध करावयाचा म्हणजे, Photography, Architectural drawing, वगैरे कलांचे अभिज्ञ लोक साहाय्यार्थ घेतले पाहिजेत त्या हि कामी हे पांच शे रुपये एक महिना भर पुरतील की नाही, तें सांगवत नाही. वस्तुतः विश्वविद्यालयाकडे तीन साडेतीन हजार रुपयांची मागणी, सर्वतो प्रकारचा विचार करून, मंडळाच्या अध्यक्षांनी केली होती ती सबंध मागणी जर विश्वविद्यालयाने पुरविली असती, तर शिवकालीन इतिहासाच्या शोधाला फार मदत झाली असती. इतर शास्त्रांच्या शोधाला हि पैसे द्यावयाला लागणार ह्या सबबीवर, विश्वविद्यालयानें शिवकालीन इतिहासाच्या शोधाला फक्त पांच शे रुपये दिले आणि बजाविलें की अगदी च मदत नाही, ती थोडीशी तरी व्हावी, म्हणून हे रुपये दिले आहेत. ह्या देणगीच्या सद्धेतूबद्दल मी विश्वविद्यालयाचा फार आभारी आहें. मला विश्वविद्यालयाला इतकें च नम्रपणें कळवावयाचें आहे की दिलेली रकम शिवकालीन इतिहासाच्या कोणत्या हि एका शाखेच्या शोधाचा उपक्रम हि करण्यास पुरेशी नाही. देणगी फलप्रद व्हावी अशी इच्छा विश्वविद्यालयाची असणार हें उघड आहे. त्या अर्थी ती मूळ मागितलेल्या तीन साडेतीन हजार रुपयांची मिळाल्यास व ती पांचपंचवीस वर्षें मिळेल असें आश्वासन दिल्यास, कामाला हुरुपाने हात घालतां येणार आहे. काम यथास्थित चालण्यास, वार्षिक साडेतीन हजार रुपये हवेत. पैकीं विश्वविद्यालयाचे पांचशें रुपये वार्षिक वजा केले, तर बाकीचे तीन हजार कोठून तरी

उभे केले पाहिजेस. राजेरजवाडे व धनिक लोक यांना इतिहासशोधाचा उपयोग निदान विश्वविद्यालयाला जेवढा होणार तेवढा खास होईल, हें सांगावयाला नको. तेव्हां, त्यांच्याकडे साहाय्यार्थ दाद मागण्याची खटपट आपल्या मंडळाच्या द्रव्योपमंडळानें करावी अशी माझी सूचना आहे.

वि. का. राजवाडे

## गेल्या दिवाळींतील संशोधन

यंदा गुरुवर्य राजवाडे यांजसमागमें दिवाळी संशोधनांत घालवावी असा मनोदय होता. गोदाकांठी जावें असा पहिला विचार ठरला पण माझे बाळमित्र व आपल्या मंडळाचे सभासद श्री. गोपीनाथ बाळकृष्ण पोतनीस उरवडेकर यांचे गांवी येण्याचा त्यांचा फार दिवसांचा आग्रह फलित होण्याचा योग येऊन रा राजवाडे व माझे संशोधक मित्र रा. पांडोबा पटवर्धन यांच्या समागमांत उरवड्यास गेलों.

उरवडे गांव भोर हद्दींत असून मोठ्या नामी जागीं वसला आहे. शेजारींच राळेमाचीचा भव्य व सिंहगडाशी स्पर्धा करणारा डोंगर आहे. पोतनिसांच्या बखळ झालेल्या वाड्याच्या देवडीवरील दिवाणखान्यांत दप्तराचे रुमाल फळ्यावरून चेपून ठेविलेले दृष्टीस पडले. उंदरांच्या लेंडीपुष्पाचा खच त्यांवर पडलेला असून पावसाच्या पाण्यानें दप्तरें अभिषिक्त झालेली आढळली. एकंदर रुमाल सुमारे २०० असावा. याखेरीज संस्कृत प्राकृत प्रसिद्धाप्रसिद्ध पुष्कळ पोथ्या मोठ्या खर्चानें लिहवून घेतलेल्या आपल्या जीर्णोद्धारकर्त्यांच्या स्वागतार्थ तेथे सज्ज होत्या. या संग्रहांत मुक्तेश्वराची पर्वें आहेत, मोडींत लिहिलेल्या कृष्णामाहात्म्याची पानें आहेत, भागवताचे अध्याय आहेत, मल्हार रामरावकृत राजनीत्यादि प्रकरणे आहेत, रामहृदय, सूर्यहृदय इत्यादि स्तोत्रें आहेत, धर्मग्रंथ आहेत, मोडी किस्से आहेत, असें विविध भांडार आहे. असा हा संग्रह फार मोठा आहे. हा नुसता गळाठा आहे, हा दाखवावयाला व द्यावयाला लाज वाटते असें श्री. पोतनीस पुनः पुनः म्हणत. मित्रवर्य गोपीनाथपंतांचे वडील रा. बाळकृष्णपंत यांस कागदपत्रांचा चांगला च नाद होता व सर्वानर्थमूलक गृहकलहाचा अग्नि या घराण्यांत न भडकता तर आजच्या पांचपट संग्रह हाती लागला असता. पोतनीस म्हणजे सातारकर छत्रपतींच्या खास मर्जीतले व म्हणून च शिवकालीन कागदपत्रें येथें हटकून मिळावीं असा कयास होता. परंतु सामराज नीळकंठ रोझेकर– रांझेकर नव्हे– यानें इकडील मुठेखोऱ्यांत कुळकर्ण संपादन केल्याची हकीकत देणारा एक कागद मला व दुसरा रा. राजवाडे यांस शिरके व शाहाजी महाराज यांचा कांही वतन-

संबंध माहीत करून देणारा येवढे च दोन शिवकालीन कागद येथे मिळाले। साम-राज नीळकंठ 'मतिमत्प्रधानां'च्या पूर्व चरित्राचा मात्र थोडासा भाग सांपडला.

दीनकर्वांच्या ज्या ग्रंथाधारें आपल्या पुढें 'अंबाबाई उदोनाथ' हे टांचण मी वाचले व १५६८ तील जे शिवकालीन नकल पत्र आपल्या पुढें ठेविलें तें ह्याच संग्रहांतील होय. इतर हि कित्येक टांचणें या संग्रहाधारें मंडळापुढें मीं वाचली आहेत. तीन पेट्या भरून हा संग्रह मी जतन करून ठेविला आहे. पोत-नीसांची ४।५ घरें गांवांत आहेत. हे 'पंच बाजी'च्या वंशातले; तेव्हा १।२ कागद त्यांच्या घराण्याची पूर्व हकीकत देणारे सांपडले.

या दप्तराचें मुख्य महत्त्व त्यांतील जमाखर्ची रुमालांवर आहे. उरवडे, वेग्रे वगैरे गांवच्या हिशेबाचे सालोसालचे ताळेबंद येथे १००।२०० रुमाल आहेत. त्याची तपासणी बारकाईने केली तर उरवडे गाव विठ्ठल यशवंताकडे आल्यापासून या खेड्याची व घराण्याची बरीच उपयुक्त माहिती कळेल. शिवाय तत्कालीन जमा खर्ची व वसुलादि पद्धतीचे सूक्ष्म ज्ञान होईल. श्रीमंत पोतनीस रुपाळूपणें हे सर्व कागद आमचे हवाली करण्यास तयार आहेत; पण सरस्वतीमंदीर उभे राहीपर्यंत यांचा स्वीकार करणे लांबणीवर टाकणें भाग पडत आहे.

यानंतर या च गांवचे दिघे-देशपांडे याचे घरीं बऱ्याच शिवकालीन काग-दांच्या नकला व्यवस्थित पुस्तकरूपानें बाधून ठेविलेल्या आहेत-यांच्या आधारें ग. देशपांडे पिता पुत्र यानी कांही माहिती केसरींतून पूर्वी प्रसिद्ध केलेली आहे-त्या-तल्या कित्येक मित्रवर्य पटवर्धन व मीं यांनी उतरून ग. राजवाडे यांचे हवाली केल्या.

प्रसिद्ध प्रभुवीर सखाराम हरी यांचे बंधु बाबुराव हरी गुप्ते आंबेगांवकर यांचे वंशज येथें च राहातात. त्यांचे २।४ रुमाल पाहून शिवगीता वगैरे १।२ पोथ्या व कांही सनदांच्या नकला घेऊन आंबेगांव पाहिला

उरवड्यास पोतनीसांच्या वाड्यांत नळ बांधून जवळून च सुंदर पाणी आणलें आहे व त्याचे हौद बांधलेले पाहून जुन्या वैभवाची आठवण झाली.

नंतर लवळें पौड येथें गेलों पण प्राप्ति कांही झाली नाही.

याच गावी माझे मित्र, मंडळाचे सभासद व चितो विठ्ठलांचे संबंधी, केशव विठ्ठलांचे वंशज रायरीकर राहतात. त्यांचा सर्व संग्रह हि पाहिला. आगीत पुष्कळ संग्रह पूर्वीच जळाल्याचें कळल. या संग्रहांत 'श्री शंभु महादेव माहात्म्य' संस्कृत काव्यग्रंथ भोसल्यांच्या शिखर सिंगणापुरचें वर्णन करणारा मिळाला. त्याची सर्व धाटणी पौराणिक आहे त्याचा परिचय पुढे मागें करून देण्याचा विचार आहे. येथें च प्राकृत लीलावती सप्रयोग व सोदाहरण लिहिलेली राजवाडे यांस मिळाली. इची परीक्षा माझे गणिती मित्र प्रो. गोखले सांप्रत करीत आहेत.

येणेंप्रमाणे १५ । २० दिवस पोतनिसांचा पाहुणचार घेऊन नतर आज तागायत अनेक कष्टातून त्यानी रक्षिलेल्या भगव्या झेड्याला प्रणाम करून घरी आलों आश्चर्य वाटलें कीं, पुण्याजवळ ८ । १० कोसांतल्या एकाच गांवांतून जर इतके पेटारे आणता आले तर अद्याप किती संग्रह अज्ञात असावा.

**दत्तो वामन पोतदार**

# माझें संशोधनवृत्त

## ( शके १८३७ बद्दल )

गतवर्षाच्या संशोधनात्मक वृत्तकथनाचे प्रांतपरत्वें आठ विभाग करिता येतात. संशोधनवृत्ताचा पहिला भाग म्हटला म्हणजे

## सोलापूर

जिल्ह्यातील प्रवास हा होय. या जिल्ह्यात फक्त दोन च ठिकाणी काम ते जातां आले. बरोबर माझे सन्मान्य मित्र व मंडळाचे एक आस्थेवाईक सभासद ग. रा. अनतराव फडणीस हे होते. खुद्द सोलापूर येथे श्रीशिवछत्रपतीचे वडील बंधु संभाजी राजे यांचे घराण्याचा वंशवेल मिळाला; व श्रीक्षेत्र पढरपूर येथे श्रीधरस्वामी नाझरेकर यांचे वंशजाकडे मिळालेल्या कागदपत्रांवरून श्रीधर-स्वामीच्या निधनकालासंबंधीच्या वादग्रस्तप्रश्नाचा कायमचा निकाल करितां आला श्रीधरस्वामीचे लहान मोठे बरे च ग्रंथ व त्याचे चिरंजीव दत्तोबा यांची बरीच कविता श्रीधराचे पंढरपूर येथील विद्यमान वंशजाचे संग्रही आहे. ती सर्व संग्रहित करून श्रीसमर्थ व मोरोपंत यांचे काव्यग्रंथांप्रमाणे च श्रीधरकवीच्या काव्यग्रंथांची एकादी सर्वमान्य आवृत्ती कोणा तरी काव्यभक्ताने काढावी, अशी माझी सूचना आहे.

## पुणें जिल्हा.

प्रवासाचा दुसरा भाग म्हटला म्हणजे पुणें जिल्हा होय. खुद्द पुण्यास च किती तरी ऐतिहासिक कागद पत्र मिळवितां येण्यासारखे आहेत हे गतवर्षी माझे प्रतीतीस आले चिंचवडचे देवांसंबंधी आणखी बराच शिवकालीन व इतर पत्र-व्यवहार गतवर्षी माझे हाती लागला. गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचे पुणे येथील विद्य-मान वंशज श्री. रा. गोविंदशास्त्री पटवर्धन याजकडून ' गगाधर शास्त्र्याचें आत्म-वृत्त' व इतर कांहीं कागद मिळाले. ऐनेकर गोळ्याची ज्योतिषासंबंधीची असल सनद हि पुण्यास च मिळाली. या शिवाय शके १७३९ च्या क्रांतिकारक प्रसंगाच्या आंत बाहेर उदयास आलेल्या अशा दोन चार घराण्यांतील हि कागद सहजगत्या

मिळाले कै. बंडुनाना रानडे यांचे चिरंजीव रा रा. सदाशिव विष्णु रानडे यांनीं आपल्या जवळील संग्रह दाखविला. शके १७३९ तील छत्रपतीची बहुमोल बारनिशी पुण्यासच श्री. पोतनीस यांजकडे मिळाली या पत्रव्यवहारावरून शके १७३९ च्या सुमारास महाराष्ट्राची समाजस्थिति कशी होती व महाराष्ट्राच्या राजकीय क्रीडांगणांत निरनिराळे खिळाडू कोणकोणते डाव खेळत होते या विषयावर बराच प्रकाश पडेल. या जिल्ह्यातील गारदौंडापासूनची सर्व पट्टी ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाची आहे. शिवरायाच्या पादस्पर्शानें पुनीत झालेला हा प्रांत संशोधनाच्या दृष्टीने हि तसाच महत्वाचा आहे. शिवकालीन मुत्सद्दी बहुशः या च भागांतील होते. शिवरायांनी व त्यांजबरोबरीच्या मुत्सद्यांनी याच प्रांतात बरे च डावपेंच लढविलेले आहेत. अशा ह्या प्रांतात गारदौंडापासून प्रवासास सुरवात केली. दौंडास रामचंद्रबावा शेणवी यांचे कागद मिळावेत या हेतूनें खटपट केली. मलठण येथें राजगुरु दादाजी कोंडदेव यांचे विद्यमान वंशज रा. रा. गोविंद माधव कुळकर्णी यांजकडे दादाजीचे घराण्याचा वंशवेल मिळाला. दादाजी कोंडदेवाचे काही वंशज बडोद्याकडे आहेत त्यांजकडे या इतिहासप्रसिद्ध घराण्यांतील कागदपत्राचा शोध झाला पाहिजे. पाटस येथें शितोळे देशमुख घराण्याची एक शाखा नांदत आहे. येथील कागदपत्र पाहिले. येथील तटू घराण्यांतील कागद मिळाल्यास शिवकालीन इतिहासरचनेस थोडी फार मदत होण्यासारखी आहे. खानवट, जिंती, शेडगाव–पेडगांव या गांवी हि थोडा फार शोध केला. पेडगाव ऊर्फ बहादुरगड हा गाव मोंगल रियासतींत वैभवाचे शिखरास चढलेला होता. हा गांव सध्यां पूर्ण मोडकळीस आलेला असून, सभोंवार अतोनात निवडुंग वाढलेला आहे. ह्या गांवास निवडुंगाचे पेडगांव हे नाव अन्वर्थक होईल. चंद्रचूडांनी गणपतीस इनाम दिलेलें व हरिपंत तात्या फडके ह्यांचे मृत्युस्थान म्हणून इतिहासांत प्रसिद्ध असलेले गणपतीचें सिद्धटेक या गावी हि तपास केला. शिवाय वीर–वाल्हे येथे रा. केशवराव अजहत देशमुख याचे घरचे दप्तरखान्याची चालना केली. येथें च हणमंते घराण्यांतील नारायण हणमंते यांस बाणेरें गाव थोरले शहाजी महाराज यानी इनाम दिल्याची सनद उपलब्ध झाली. हणमंते यांचा वंशवेल, पुणें जिल्ह्यांतील शिवकालीन वसुलाचे व इतर थोडे फार महत्वाचे कागद, व तारीखवार अशी पेशव्यांच्या राजवटीसंबंधानें त्रुटित टिपणें ही हि याच दप्तरांत मिळाली. तळेगांव–ढमढेरे येथें यंदा आणखी काही कागद मिळाल्यानें ढमढेरे घराण्याचे कागदपत्रांत थोडी भर पडली. गोविंद भगवंत पिंगळे यांचे पुणे येथील वंशजांकडे पिंगळे व गोविंदराव काळे असे दोघे उभे आहेत अशी एक तजवीर मिळाली. हा सांप्रतच्या पुणे जिल्ह्यांतील प्रवास होय. गुरुवर्य रा. विश्वनाथपंत राजवाडे, सन्मित्र रा. दत्तोपंत पोतदार व श्री. पोतनीस यां समवेत भोर इलाख्यांतील 'पंच बाजी' च्या उरवडे गांवी, व सखाराम हरी यांच्या आंबेगांवी चार पांच दिवस घालविले. उरवडें आंबेगांव

येथील संशोधन गुरुवर्य रा. राजवाडे यांच्या बरोबर त्यांच्या देखरेखी खालीं झालेले असल्यामुळें, त्या सफरीचा फक्त नामोल्लेख करण्यापेक्षां जास्त कांही लिहिण्याची जरूरी नाहीं.

## नासीक जिल्हा

प्रवासाचा तिसरा भाग म्हटला म्हणजे नासीक जिल्हा हा होय. खुद्द नासीक, सुरगाणेकर देशमुख यांचें संस्थानांतील दोन चार गांवें, वणी—दिंडोरी भागांतील सप्तशृंग गडाखालील चार दोन ठिकाणे, साल्हेर-मुल्हेर नजीकचा टापू या प्रांतांत थोडे फार संशोधन केलें. या प्रांतांतून बरी च अप्रसिद्ध कविता मिळाली. खानदेश जिल्ह्यांतील चाळीसगांवानजीकचे भागांतील प्रवास विषयाचे सोयीकरितां नासीक जिल्ह्यांत मोडण्यासारखा आहे.

## नगर जिल्हा

चौथा भाग म्हणजे नगर जिल्हा होय. नगर येथें नगरच्या निजामशाही संबंधीचें एक जुनें टांचण, पेशवाईत नगरचे विभाग कसकसे होते याबद्दलचा एक महजर, नगरचा किलेदार कवीजंग याचे घराण्यांतील एका शाखेकडे रा. पंडित वकील ह्यांचे सहाय्यानें मिळालेला नगरचा किलेदार व पेशवे यांमधील शके १६८१।८२ मधील राजकारणाचा पत्रव्यवहार, नगरच्या जुन्या हकीकतींचें मिळालेलें एक जुने विश्वसनीय टिपण इत्यादि कागद मिळाले. रा. तांडुळवाडकर यांजकडे एक जुनी तसबीर मिळाली. पांडेपेडगांवकर देशपांडे यांजकडील दप्तर श्री. नानासाहेब मिरीकर जहागीरदार यांचे द्वारां पाहण्याचा योग आला.या दप्तरांत शंभरांवर जास्त इतके इतिहासोपयोगी महजर मिळाले. त्यांत कित्येक शिवकालीन आहेत. या महजरांचा अतोनात उपयोग होणार आहे. समाजरचना व व्यवहारपद्धति या बाबीकडे महजरांचा उपयोग करणारे महजरांचे भोक्ते रा. रा. भट वकील यांजकडे हे महजर देण्यात आले आहेत. पेडगांवकरांचे या दप्तरात महत्वाच्या अशा कित्येक जुन्या पोथ्या हि हाताशी आल्या. विवेकसिंधूची शके १४९६ तील अगर त्यानंतर थोड्या च काळांतील एक जीर्ण प्रत यांचे च दप्तरांत मिळाली. विष्णुदास नाम्याची पहिली चार अनुपलब्ध पर्वें हि नगरास च मिळाली. भिंगार हा गांव नगरपेक्षां जुना. तेथें देशमुख व मुळे या मंडळींकडील काही दप्तरें संशोधिली. मुळे घराण्यांतील कागदपत्र तपाशीत असतां, चंद्रावळीकर्ता नागेशकवी व श्रीसमर्थशिष्य स्वानुभवदिनकरकर्ते दिनकर हे या च मुळे-घराण्यातील होत. असें समजलें. मुळे याचे पूर्वज नामांकित ज्योतिषी होते, त्याबद्दलच्या सनदा हि मिळाल्या. नगर व भिंगार या ठिकाणच्या संशोधनवृत्ताच्या बाबतीत एक आनंददायक अशी गोष्ट येथें नमूद करून ठेवणें इष्ट व जरूर दिसतें कीं, नगर येथील माझे जुने स्नेही रा. रा. परशुरामपंत आपटे, दत्तोपंत मोने, राम-

भाऊ देशपांडे व विशेषतः नगर जिल्ह्यांतील संशोधक श्री. नारायण यशवंत मिरीकर, जहागीरदार यांची संशोधनाचे कामी मदत जाहलेली आहे. श्री. नानासाहेब मिरीकर हे गतवर्षी च आपल्या मंडळास सभासद लाभले, व माझी अशी खात्री आहे की, श्री. मिरीकर व त्यांची नगर येथील इतिहासप्रिय स्नेहीमडळी नगर प्रांतांतील संशोधन आपल्या माथीं मारून घेऊन, नगरास धुळेकरांप्रमाणे च पुढें आणतील. श्री. नानासाहेब हे नगर शहराचा व जिल्ह्याचा इतिहास जुन्या व नव्या कागदपत्रांच्या आधारें लिहीत आहे, ही हि गोष्ट उत्साहजनक च आहे. शेवगांव येथें म्हणण्यासारखें कांहीं मिळालें नाही. तथापि तेथील रा. रा. प्रल्हादराव देशपांडे, वकील यांनी शहाशरीफचे दर्ग्यासंबंधीच्या सनदेची असल बमोजीब नकल मोठ्या कृपेनें पाठविली. या सनदेवरून शहाशरीफ ही व्यक्ति काल्पनीक नव्हे, ऐतिहासिक च आहे, ही गोष्ट उत्तम प्रकारें सिद्ध झाली. शहाशरीफचा हा दर्गा नगरास दायरे-दर्गा या नांवानें अद्याप प्रसिद्ध आहे. कित्येक लेखकांनी लिहिल्याप्रमाणें तो नगरचे किल्यांत मात्र नाहीं. नगर जिल्हा व निजामसरकार याचे सरहद्दीवर असणाऱ्या गोठाण अगर घोटण गांवीं एक यादवकालीन जीर्ण देवालय पाहण्यास सांपडलें. यानंतरचा माझा प्रवास

## निजामसरकारचे हद्दींत

गोदेच्या तीरातीरानें झाला. या प्रवासास पांचवा भाग म्हणतां येईल. श्रीक्षेत्र पैठण, वेरूळ, दौलताबाद, औरंगाबाद, जालना, पारद, पाथ्री, आसई, सातवणें इ. ठिकाणीं थोडें फार संशोधन केलें. श्रीक्षेत्र पैठण येथें जुन्या ज्ञानेश्वरीचा शोध केला. पैठणास श्रीनाथवंशजांचे संग्रहीं शके १५५१ पूर्वीची जुनी प्रत नाहीं, असें आढळून आलें. नाथसंस्थानचे कागदपत्रांत अगर त्यांचे वंशजांचे दप्तरांत श्रीनाथाचें हस्ताक्षर नाही ! नाथसंस्थान हें पेशव्यांच्या अमदानीत उदयास आलेलें आहे. नाथ घराण्याचा वंशावेल मिळाला तो मंडळास सादर केला. पैठण येथील दुसरें मोठें संस्थान म्हणजे शिवदिननाथांचे. मी गेलो त्या वेळी तर या सस्थानची अत्यंत शोचनीय स्थिति झालेली आढळली ! संस्थानांत बरा च कवितासंग्रह असला पाहिजे, व तो तसा होता हि. संस्थानचे नुके च कैलासवासी झालेले पुजारी रा. विष्णुपंत घुगरी यांजकडे असलेला संग्रह हि महत्वाचा आहे. तो त्यांचे वारसांमार्फत मिळविण्यास पैठणकरांची मदत घेतली पाहिजे. संस्थानासंबंधीं शिवदिननाथांपासूनचा वंशावेल काय तो मिळाला. आतां हें संस्थान श्री. बाळासाहेब पंत प्रतिनिधि औंधकर यांचेकडे आलेलें आहे. त्यांनीं मदत केल्यास बरें च कार्य होण्यासारखें आहे. तिसरें संस्थान श्रीकृष्णदयार्णवाचें. मठांतील बहुतेक कागदपत्र नाहीसे झालेले आहेत. कृष्णदयार्णवांनीं केलेल्या कवितेच्या मूळ प्रती संस्थानांत राहिलेल्या नाहींत. तरी पण विद्यमान मठपति यांनीं कृष्णदयार्णवाची बहुतेक त्रुटित कविता माझे हवालीं केली. याशिवाय पैठणास

तेथील क्षेत्रोपाध्ये काषळे यांजकडे भोंसल्यांच्या गांवांची एक उपयुक्त यादी मिळाली. कावळे यांचे घराण्यांत भोंसल्यांचे मूळ पुरुषापासून स्वदस्तुरचे लेख आहेत, असें त्यांच्या वहीवरून दिसलें. अस्सल लेख निराळे असल्यामुळें, ते बारकाईनें पाहिले पाहिजेत. पैठणास रा. रा. नेवासकर जोशी वकील, ज्योतिर्विद रा. रा. तोडेवाले, चणकवाडीकर जहागीरदार इत्यादि गृहस्थांची फार मदत झाली. औरंगाबाद येथें औरंगजेबाची बायको दिलरसबानू इच्या कबरीच्या बाहेरच्या दरवाजावरील दोन लेख मिळाले . या शिवाय तेथें थत्ते, जाधव, चिंचोलीकर जहागीरदार यांकडे कागदपत्रांचा शोध केला. किले अरकमधील अलमागिरीमहाल, नवखंड्या ( मूळ तख्ताची जागा ), औरंगाबाद हें शहर ज्या खडकी गांवाचे ठिकाणीं वसलें त्या गांवांतील खडकेश्वर इत्यादि ऐतिहासिक इमारती पाहिल्या. वेरुळ येथें भोंसल्यांचे विषयींचे कागदपत्राचा शोध केला. वेरुळ परगण्याची देशमुखी नाना फडणिसांकडे आली, व तिचा उपभोग परंपरेनें नानांचे वंशज अद्याप घेत आहेत, ही गोष्ट वेरुळास नवीन कळून आली.

रोजा येथें मुसलमानांचे अवलिया व औरंगजेब, अजिमशहा, असफजाह, त्याचा मुलगा नासिरजंग इत्यादि ऐतिहासिक पुरुषांच्या कबरी पाहिल्या. दौलताबाद हा इतिहासप्रसिद्ध किल्ला पाहिला, व जनार्दनस्वामिच्या समाधिस्थानाचें दर्शन घेतलें. आसई येथें तेथील रणभूमि पाहिली. पारद येथील लोखंडयांची मोडकळीस आलेली गढी अवलोकिली. हें च अक्कलकोटकर भोंसले यांचें मूळ गांव. जालना व पाथ्री हीं मुसलमानी रियासतींत नांवारूपास आलेलीं गांवें म्हणून तेथें हि शोध केला.

सातवणे गांवीं रामचंद्र गणेश कानडे या मराठेशाहींतील सेनापतीचें घराणें नांदत असल्याचा सुगावा लागल्यामुळें, तेथें जाऊन शोध केला. तेथें त्यांचे घरीं कानडे घराण्याचे वंशवेलापेक्षां जास्त कांहीं फलनिष्पत्ति झाली नाहीं. पुण्यांतील कानड्यांचा वाडा—ज्यास हल्लीं कोनकरांचा असें म्हणतात—तेथें कोनकरांकडे कानड्यांचे कागदपत्रांचा शोध केला पाहिजे. निजामसरकारचे हद्दींत या शिवाय निजामचा दिवाण विठ्ठल सुंदर परशुरामी व नागोराम भागवत वांबोरकर या दोन घराण्यांचा शोध लागला. विठ्ठल सुंदराचे कागदपत्र आपल्या मंडळाचे सभासद व हैद्राबाद येथील प्रसिद्ध वकील नामदार केशवराव यांचे द्वारां मिळण्यासारखे आहेत.

## सातारा जिल्हा

सातारा जिल्हा हा प्रवासाचा सहावा भाग होतो. या वर्षी सातारा जिल्ह्यांत फारसा हिंडलों नाहीं. तरी पण त्या मानानें ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाच्या अशा कागदपत्रांची उपलब्धी या च भागांत झाली. खुद्द सातारा येथें तेथील उत्साही वकील शेट डोसाभाई माणिकजी यांचे द्वारा साताराचे शेवटचे छत्रपती श्री शहाजी

महाराज यांचे दत्तक चिरंजीव श्रीमंत व्यंकाजी महाराज ऊर्फ आबासाहेब यांचे आद्ले घरचे बंधु श्री. बापूसाहेब भोंसले शेडगांवकर यांजकडे सातारकर महाराजाची एक हस्तलिखित बखर मिळाली. औरंगजेबानें शिवाजीस लिहिलेलें एक अस्सल फर्मान ( पत्र ) सातारा येथें च शेट डोसाभाई वकील यांचे संग्रहांतून मिळालें. औरंगजेबाचें शिवाजीस आलेलें एक अस्सल पत्र, या दृष्टीनें या फर्मानाची किंमत किती आहे, हें लिहिण्याची जरूरी नाही. या शिवाय शके १७३९ च्या धामधुमीसंबंधानें क्रांतिकारक असा बरा च पत्रव्यवहार सातारा येथें मिळाला. शुभसूचक छापखान्याचे उत्साही मालक रा. रा. चितळे यांनी शेवटचे श्रीमंत बाबासाहेब पेशवे, श्री. प्रतापसिंह महाराज छत्रपती, रणशूर व इमानी बापू गोखले यांच्या रंगीत, प्रेक्षणीय व हातानें काढलेल्या अशा ऐतिहासिक तजबिरा, ऐतिहासिक प्रेमानें माझ्या हवाली केल्या. सातारचे आसपास तर्फ कुडाळ या भागात तेथील देशमुखी वतनाचे कांही कागद मिळाले. वाई प्रांतांत वांई प्रांताच्या कदीम माहितीचे कांही कागद एका देशपांड्यांकडे मिळाले. यांत शिवकालीन व विशेषतः राजारामकालीन कागद, व दिव्यासंबंधीं माहितीचे कागद मुबलक आहेत. औरंगजेबास फितूर झालेला सूर्याजी वा॥ फिरंगोजी पिसाळ याची काही अस्सल पत्रें हि मिळालीं. रहिमतपूर येथे या खेपेस पेंढाऱ्यासंबंधीचे अप्रसिद्ध असे करारमदार मिळाले.

## कोंकणाची सफर.

प्रवासाचा सातवा भाग म्हणजे कोंकणाची लहानशी सफर होय. या सफरीस फक्त १० । १५ दिवस मिळाले, यामुळें विजयदुर्ग, राजापूर, निवेली, अणसुरे, मिठगावणें व आमचें मूळ गांव जानशी या ठिकाणांपेक्षां जास्त कोठें जाता आलें नाहीं.

## म्हैसूरप्रांत

प्रवासाचा आठवा व शेवटचा भाग म्हणजे म्हैसूर संस्थानांत केलेला वीसपंचवीस दिवसांचा दौरा हा होय. या वेळी म्हैसूर हद्दींत संशोधनार्थ जाण्याचा मुख्य हेतू म्हणजे महाराष्ट्रराज्यसंस्थापक शिवाजी महाराज याचे पिते राजे शहाजी यांचें निधनस्थान निश्चित करणें हा होता. उपलब्ध व प्रकाशित अशा साधन सामुग्रीवरून हें ठिकाण म्हैसूर संस्थानांतील बसवपट्टणचे हद्दींत असलें पाहिजे, एवढें निश्चित होतें. परंतु नक्की ठिकाण अनिर्णित होतें. अशा स्थितींत तिकडील मराठे मंडळीशीं या हेतूनें पत्रव्यवहार सुरू केला. कांहीं मराठे मंडळींनीं शहाजी महाराजांच्या व त्यानंतरच्या कालात तिकडील भागांत वसाहत केलेली आहे. परंतु कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें म्हणा, अगर तदनंतर लोटलेला काल व स्थित्यंतरें यामुळें म्हणा, तिकडील मराठे मंडळी तत्रस्थ मंडळीशीं भाषा, चालीरीती इ. बाबतींत

पर्णत्वानें एकरूप झालेली आहे. समाधानाची व अभिमानाची गोष्ट म्हटली म्हणजे या मंडळीस शहाजी महाराज व विशेषतः शिवाजी महाराज यांच्या नुसत्या नांवानें अद्याप हि स्फुरण चढते. मराठे व शिवाजी महाराज या शब्दांत अशी च कांहीं जादू भरलेली आहे! वर सांगितल्याप्रमाणें शहाजी महाराजांच्या निधनस्थानाचे बाबतींत चन्नागिरी येथील मराठे मंडळीशीं मीं पत्रव्यवहार सुरू केला असतां, पत्र-व्यवहार करणारा कोणी शिवाजी महाराजाचा वंशज असला पाहिजे या समजुतीनें, त्यानीं पत्रोत्तर पाठवितांना पत्त्यावर 'पटवर्धन भोसले, शिवाजी महाराजांचे वंशज, पुणें' एवढा च पहिल्यानें पत्ता लिहिला! शहाजी महाराजांच्या व शिवाजी महा-राजांच्या संबंधानें चौकशी करणारा इसम त्यांचा वंशज असला पाहिजे, अशी त्यांची प्रथमतः कल्पना झाली. या त्यांच्या विचित्र शंकेचें पुढे समक्षतेनें निरा-करण हि झालें. माझी महत्वाकांक्षा फलित होऊन, अखेर शहाजी महाराजांच्या निधनस्थानाचा निर्णय करण्याचे श्रेय मला च मिळालें. या कामी चन्नगिरी येथील मराठे मंडळी पैकीं प्रमुख रा. सिद्दोजीराव पाटील घाटगे, व रा. हेमाजीराव सूर्यवंशी; त्याचप्रमाणें तेथील गव्हर्नमेंट ॲंग्लो-व्हर्न्याक्युलर स्कूलचे मुख्याध्यापक रा. एच्. नारायणराव यांची फार मदत झाली, हे येथें नमूद करून ठेवण्यास परम संतोष वाटतो. होदेगिरी येथील शहाजी महाराजांच्या समाधिस्थानाशिवाय हरिहर, बेंगलूर, श्रीरंगपट्टण, म्हैसूर, बेदनूर ऊर्फ नगर, व शिवमोघा, इत्यादि ठिकाणी थोडें फार संशोधन करण्यास सापडलें. हरिहर येथील शके ११४५ मधील पोला-ळदेव यानी बांधिलेले देवालय, बंगलोर येथें तेथील तमाश-बंगला (museum) व किल्ला; म्हैसूरास तेथील देवीचें देवालय व इतर स्थानें, श्रीरंगपट्टण येथें तेथील इतिहासप्रसिद्ध किल्ला, टिपू बहादर हा लढाईंत पडला तें ठिकाण, व त्याचप्रमाणें हैदर व टिपू यांच्या कबरी या पहाण्यांत आल्या. श्रीरंपट्टण येथील टिपू बहादर याचा बंगला प्रसिद्ध असून, तेथील चित्रे प्रेक्षणीय आहेत. या शिवाय चार दोन लहान खेडी घेतली. म्हैसूर संस्थानचे हद्दींत मराठ्यांच्या इतिहाससंशोधकांस शोध करण्यास हवी तितकी वाव आहे. म्हैसूर दरबारीं हल्लीं कानडी लिपीचा सर्रास उपयोग होतो हे खरे, तथापि, चाळीस वर्षांखाली तेथील सर्व दफ्तर मोडीतच होतें. हें दफ्तर व त्याचप्रमाणें तेथील जुनें दफ्तर कोणा संशोधकास पहावयास मिळेल तर मराठ्यांच्या इतिहासांतील एका भागावर उत्तम प्रकाश पडेल. सर विश्वेश्वर अय्यांसारखे इतिहासप्रिय व कार्यकर्ते संस्थानचे दिवाण असल्यामुळें, तेथील दफ्तर पहाण्यास मिळेल, असा भरंवसा वाटतो. दुसरें, म्हैसूर संस्थानांत ठिक-ठिकाणी मराठ्यांच्या वसाहती आहेत. त्यांचा आपल्या कामाकडे उपयोग करून घेतां आल्यास शहाजीकालीन व शिवकालीन कागदपत्रांचे ढगिच्याढगि उजेडांत आल्याशिवाय रहाणार नाहींत. म्हैसूर आटोपून तंजावर, जिंजी, वेलोर, सोंदे वगैरे

ठिकाणी जाण्याचा मनोदय होता, परंतु आंखलेला वेळ म्हैसूर प्रांतांतील वरील ठिकाणांनीं च खाल्यामुळें, तो बेत तहकूब करावा लागला. येणेंप्रमाणें माझा संशोधनात्मक वृत्तांत सालाबादप्रमाणें चतुर्थसंमेलनप्रसंगीं मंडळास सादर करीत आहें. मंडळाचे विद्वान् सभासद याचा स्वीकार करतील अशी आशा आहे.

**पांडुरंग नरसिंह पटवर्धन**

## संशोधन-वृत्त

गेल्या वर्षी खानदेशांतील एदलाबाद, जळगांव, कानळदे या ठिकाणी व ठाणें जिल्ह्यातील वसई वगैरे ठिकाणीं अल्पसें संशोधन केलें एदलाबादचे देशमुख व कुरंभट्टी यांजकडे जुन्या पोथ्यांचा बरा च संग्रह उपलब्ध झाला. त्यासंबंधानें मंडळापुढें वेळोवेळी टांचणें वाचलेली आहेत. श्रीज्ञानेश्वर शिष्य सत्यामलनाथ यांचा '**ललित-प्रबंध**' नामक ज्ञानेश्वर चरित्रात क्रांति घडवून आणणारा अपूर्व ग्रंथ एदलाबादेस देशमुखांच्या येथें च मिळाला. भंडाऱ्यांची व बिंबराजाची बखर वसई येथें मिळाली. ती काल मंडळास सादर केली च आहे

**स. मा. दिवेकर**

# राजवाडे यांचे दुर्मिळ ग्रंथ

( प्रो. विजापुरकर याजकडून देणगी )

**संकीर्ण लेखसंग्रह**—ले. रा. वि. का. राजवाडे यात कादंबरी, रामदास इ. विषयांवर फार च विचारगंभीर व बिनमोल निबंध आहेत. पुनः मिळणार नाहीत.

*फक्त दहा च प्रती आहेत.

तूर्त किं. रु. ६.

( रा वि का. राजवाडे या कडून देणगी )

**मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १**-संपादक-रा. वि का राजवाडे—यांत पानिपतच्या घनघोर रणसंग्रामाविषयी अत्यंत महत्त्वाचा अस्सल पत्रव्यवहार आला आहे. खेरीज रा. राजवाडे यानी सुमारे १०० पाने प्रस्तावना लिहून विचिकित्सक पद्धतीने महाराष्ट्रातील या ऐतिहासिक प्रसगाचे केलेले नमुनेदार व बोधप्रद विवेचन सोबत जोडलें आहे. त्यानें पुस्तकाची उपयुक्तता वाढली आहे एम. ए. च्या विद्यार्थ्यांस मुंबई विद्यापीठानें हे लाविलें आहे. मूळ किंमत रु. ३; हल्लीची किंमत रु. २५

* प्रती फक्त २५

**मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड-४** संपादक-रा. वि. का. राजवाडे—यात 'नारायणव्यवहारशिक्षा' नांवाचा सवाई-माधवरावांकरितां प्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणवीस यांनी लिहविलेला सुंदर ग्रंथ छापला असून खेरीज पेशव्यांची एक शकावली वगैरे महत्त्वाची प्रकरणे आहेत. सदरहू खंडाला शिवकालीन इतिहासाबद्दल विस्तृत विवेचन करणारी अद्वितीय प्रस्तावना रा. राजवाडे यांच्या प्रतिभासंपन्न लेखणीतून उतरलेली जोडली असल्यामुळें ग्रंथ अपूर्व जाहला आहे. प्रती सुमारें १०.तूर्त प्रत्येकी किंमत रु. ६.

## मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें-खंड ७

यांत निजामदरबारांतील पेशव्यांचे वकील गोविंदराव काळे यांच्याकडील महत्त्वाचा पत्रव्यवहार छापला आहे. तो पेशवाईच्या इतिहासाचा अभ्यास करण्यास फार च उपयोगी आहे. किं. रु. ३

# सूची


श्री

श्रीएकनाथ, १५५;-चा गाथा, १५५; -चा मृत्यु, १७२;-चें देवालय,५४; -च्या राउळांत मंगळवेढ्याची सनद होने, ६५

श्रीधरस्वामी नाझरेकर, वंश, २१५;-चे ग्रंथ, २१५

श्रीवल्लाल, ३१

श्रीभार्गवरामसंस्थान, १४३

श्रीमाहूर-भवानी, १४८

श्रीमुक्ताबाई-गाथा, १५५

श्रीमंत व शिंदे यांची भेट, ८७

श्रीरंगपट्टण, २२१;-कराचें भांडण, १९७

श्रीवर्धन, कायस्थवसाति, ३९

श्रीविठ्ठल, ५६

श्रीशिव, ३१

श्रीशंभुमहादेवमाहात्म्य, २१४

श्रीसमर्थ, २१५

श्रीसिद्धनाथरामदासी; त्यांचें वय, ८१

अ

अक्कंणा-मृत्यु, २००

अकब्बर पातशहा, ३०; ३२

अकब्बर शहाजादा कलुशास भेटतो, १९९; इराणांत जातो, २००

अक्कलकोटकर भोसल्याचें मूळगांव, २१९

अकर्माशी प्रजा, २४

अकोलें, ७०; १९२

अजयासिंग परदेशी, १२१

अजमशहा, औरंगाबादेस येतो ( १६०१ कार्तिक ), १९६;-बेलगांव घेतो ( १६०९ फाल्गुन ), २०१;-ची कबर, २१९

अजमीर, १९४

अजीज बिन जाफर भांड नासीककर, १४८

अटक-नदी, ८४

अठरा मयूख, १०२

अडूर, मौजे, १३१

अणसुरे, २२०

अदकारी, ४०

अदवनी वेढा ( १६०९ पौष ), २००

अध्यात्मवाद्याचें मत, १०६

अनंतराव फडणीस रा०, २१५

अनाजी जनार्दन, पन्हाळा घेतो ( १५९४ फाल्गुन व. १३ ), १९०;-राजाराम-महाराजांस मंचकारोहण करवितो ( १६०२ वैशाख शु. ३ ),-ची पन्हाळ्यावर स्वारी(१६०२वैशाख शु.), पकडला जातो ( १६०२ ज्येष्ठ ), १९५; सुटतो व मजमू मिळते ( १६०२ अश्वीन ), १९६; पुन्हां पकडला जातो व मृत्यु ( १६०३ भाद्रपद ), १९७

अनुलोम, शरीरसंबंध केव्हां घडे,-ज परस्पर शरीरसंबंध,-ज संकर पोट-समाज, ३; प्रतिलोमसंकर, ७

अनार्य, मूळचे, एतद्देशज, त्यांचीं नांवें, ३; ४४; नंतरचे, बहिर्देशज, त्यांचीं नांवें, ३;४४;–च्या दोन निरनिराळ्या जाति, ५;–ची संस्कृति,८;–चा हिंदूंतील समावेशनाचा विशेष संस्कार, ३;–चा समाज, ५२
अपरार्क, त्याच्या टीकेचा काल, १०१; १०२
अप्पाजीराव देशपांडे कोळेवाडीकर, ७१
अफगानिस्तान, ४९;–ची मूळची संस्कृति व समाज कां नष्ट झाला, २१
अफजलखान, १८२;–च्या प्रदेशावर महाराजांचा कहर ( १५७०–१५८० ) महाराजांची कागाळी सांगण्यास विजापुरीं जातो ( १५८० ) ७८; हेजीब पाठवितो (१५८१ कार्तिक ), १८२;–चा वध ( १५८१ मार्गशीर्ष शु. ७ गुरुवार ), १७६; १८३
अबदुल रहमान जमादार, १२८
अमदानगर नौसीरखान–शिवाजी महाराज युद्ध ( १५७९ ज्येष्ठ ), १८१; –हून अवरंगजेबाचें कूच ( १६०७ ज्येष्ठ ), १९९
अमदाबाद, १२०
अमीरबेग, १२६
अमेरिका, ७; १२; १३; १८;–न् इंडियन्, १६;–नांशीं जपान्यांचा शरीरसंबंध न होण्याचें कारण, १३;–त हिंदूंना कायमच्या वसतीच्या बंदीचें कारण, १३;–तील जातिसंस्था, २४
अमृतराव,१५१;–निंबाळकर पडतो,२०६
अयोध्या, ८५
अर्क किल्ले ( अलमागिरी महाल ), २१९
अर्जुन, ३०
अर्जोजीराव ढमाले, ७९; हवलदार किल्ले धनगड, १३८
अरब जात ५
अर्वाचीन कोश ( गोडबोले ), १५५; १५६
अल्जीरीया, ११
अलिमर्दिखान, २०४
अली ईदिलशहा, १८६;–चें फर्मान १८२; –चा व मोगलाचा सल्ला ( १५८७ ), १८७;–चा मृत्यु (१५९४ मार्गशीर्ष); १९०
अलीगड, २२
अलीबहादूर, ची व महादजी शिंद्यांची चित्तशुद्धता नव्हती, ८५
अलूर, १४५
अवचीतगड तालुका, १२५
अवणी मौजे, ७०
अवरंगजेब, जन्म ( १५४० कार्तिक वद्य १ ),१७७;शि० प्र० तील उल्लेख, २९–३२; काशीविश्वेश्वरदेवालय उध्वस्त करतो, ३२;–चा तुगरा, शिक्का, साग्र नांव, ७५;–ची कारकीर्द, १४७;–ची स्त्री, २१९;–वर श्लोक, ७२; आदिलशहापासून बेदर घेण्याचा तह करतो व बेदरास येतो ( १५७९ चैत्र व० ११ रविवार, ) आणि बेदर घेतो ( १५७९ आषाढ शु. ३ गुरुवार ), दिल्लीस जातो ( १५७९ पौष ), १८१; पहिल्या राज्यारोहणाचा काल ( इ. स. १६५८ जुलै २१ ),–चा जुलुस ( १५८० ज्येष्ठ शु० २ ), ७३;

तक्तीं बसतो ( १५८१ ), १८२; –च्या दुसऱ्या राज्यारोहणाचा काल ( इ. स. १६५९ जून ५ ), ७७;–चें शिवाजी महाराजांस पत्र ( इ. स. १६५९ जुलै १४ ), ७३; २२०; अजमीरावर येतो ( १६०० फाल्गुन व० ), १९४; ब्रह्माणपुरीं येतो ( १६०३ कार्तिक ), १९६; पुन्हां परत ब्रह्माणपुरास जातो ( १६०३ पौष ), १९६; अहमद्नगरास येतो ( १६०५ अश्विन ), १९८; सोलापुरास येतो ( १६०७ ज्येष्ठ ), १९९; विजापुरावर लगट ( १६०८ आषाढ) करून विजापूर घेतो ( १६०८ अश्वीन शु० ७ सोमवार ), भागानगरास वेढा घालून ( १६०८ कार्तिक ), २००, घेतो ( १६०९ भाद्रपद शु० १२ ) २०१; विजापुरीं येतो ( १६०९ पौष ), २००; तुळापुरीं जातो ( १६१० मार्गशीर्ष ), २०१; झुलफिकरास धाडतो ( १६११ चैत्र शु० ), २०२; गलगल्यास जातो ( १६१२ माघ ), २०३; बनपुरीस येतो ( १६१७ ज्येष्ठ ), २०६;–चीं कबर, २१९.

अवरंगाबाद १८८–१९०;१९४;१९८; २१८;२१९

असतखान, चंदीहून परत जातो, २०३

असफजहाची कबर, २१९

असुर, १७;२१;४९;–चा स्वभाव, २०

असुर्या, २०

असेर किल्ले व तुरुंग, १३६

आस्किथ मि०, ८९

अस्तोदयाचल, २८

अहमद्नगर, १२२; १९८; किल्ले, १२७; किल्ले–तुरुंग, १३६ [नगर] २१७; किल्ले, १२५; २१८; पत्रव्यवहार, किल्लेदार, पेशवाईतील विभाग, २१७; प्रांत, शहर व जिल्ह्याचा इतिहास, २१८

अहिल्याबाई, ८६;–चा शाप ९७;–ची स्वार्थत्यागाची तयारी नव्हती, ९५

अहिवंत–वेढा, १९६

अहीरी–करणाटकझगडा, १९४

## आ

आगरा, १८८

आतार,–कडील मंगळवेढे महारहक्क, ५८

आत्या सचीव, गादीवर बसतो,–ची स्त्री सखारामबापूची मुलगी,–ची हकीकत, ९३

आथरुणें, मौजे, ७०

आदिनाथ, ८०

आधिभौतिकसुखवादस्वरूप, १०५

आनंदराम जोशी, १४६

आनंदराव, बहलोलावर जातो ( १५९३ वैशाख ), १९०; बहलोलाशी युद्ध करतो ( १५९५ चैत्र ), खिदरखानाशीं लढाई करतो ( १५९५ फाल्गुन व० ), १९१; वेरोळकोट घेतो ( १६०० श्रावण शु० १४ ), १९४; बाळापूर घेतो ( १६११ रामनवमी ), १९४–१९५

आनंदराव बर्गे, ११७

आनंदीराघोबाचें पुत्ररत्न, ही च मराठेशाहीची दृष्ट, ९६

आपेगांव, १७३
आफ्रिकन समाज, २४
आबटे-गौळी, १४८
आबा चिटणीस, शिंदे-कारभारी, ९३
आबाजीपंत सबनीस, २०५
आयुधजीवीसंघ, १८;-च्या काळी चातुर्वर्ण्यास बसलेला धक्का १९
आर्य, ७; चातुर्वर्णिक केव्हां बनले, ५०; दस्यूंचा वध कां करीत नसत, ८; -बाह्य, ४९;-बाह्यांची हिंदुत्वांत केव्हां गणना होई, ४५;-वंश-संस्कृति-विद्या कशी टिकली, १५; ही संज्ञा कोणास, ५०; हें वंशबोधक उपपद कोणास, ५१; क्षत्रियांचा मत्सरोत्पन्न स्मृतिभ्रंश, १९;-ची चतुष्पथनीति, १४;-ची जडीबुटी, १५; -ची स्वेतरसमावेशनरीति, ८;-चें नवीन समाजसमावेशनतत्त्व, ४५;-चें ब्रीद, ८;-च्या ग्रामस्थापना, ३;-त वर्ण कसे उत्पन्न झाले, २३;-ना आर्यावर्तांत व दक्षिणेंत प्रथम भेटलेले अनार्य, ३;-नीं राक्षसांचा निःपात कां केला, ८; अनार्य सकरजाता कशा झाल्या, ५०; अनार्यसंकरसमाज, ५२; - समाज, ५२; बाह्यांचा समावेश, समाजाची गणना पाखंडांत, ५२;-समाजावरील संकट,-१४; समाजी पृथक्जाती, २२
आर्यावर्त, ३; १५; ४९;-त मूळ काय होतें, ५२
आरुणगांव, १२७
आलफिस्टण,, मंगळवेढेमहारमहजर, ६७
आवढें नागनाथ, १७०
आवजी प्रभु, २०
आशियां (पश्चिम)तील समाज, २०
आसई, २१८; रणभूमि, २१९
आस्ट्रेलिया, १८

अं

अंगद, १७६; १८४
अंजणवेल तालुका, १३४;-न्यायाधीश, १४१
अंत्यज, कोण, ५०; व्याख्या, ५; जाति ५; ८;-जाति सनातनधर्मी ५१; संकर उत्पत्ति, १०; अनार्योत्पन्न समाजाचा सामाजिक मृत्यू टळण्याचें कारण, १०;-ना आर्य कां म्हणत नसत, ५०;-ना आर्य संस्थेंत वृत्ति व तिच्यापासून झालेली सुधारणा, ९; अनार्य युरोपियनांच्या तावडींत सांपडते तर, १०
अंत्य जन्म, व्याख्या, ५
अंदाई पाटलीण, १३१
अंबाबाई उदोनाथ, २१४
अंबेचे श्लोक, ७१
आंबे, १२४
आंध्रभृत्यां (शातवाहनां)चा उदय, १९
आंबरनाक महार, ५५; ६६-६७
आंबले, १४९
आंबेगांव, २१४; २१६

इ

इतिहास,-कार्योपयोगी क्यामेरा, २१२; -भक्त लेखकांची उणीव, २०८-२०९; -संग्रह, ८४; ९०;-संशोधकाची एक मदार, २१०
इराण, ४९; २००; तील मूळ संस्कृति व समाज कां नष्ट झाला, २१
इष्टिकालेख, १७; २०

इस्माइलबेग, होळकराच्या आश्रयास, ९५

इसलामखानरुमी,मृत्यु, १९२

इं

इंग्रज, १२४; १३५;–शीं कायस्थखट-पटी, ३८; जात, ५; मंगळवेढेमहा-रमहजर, ६७;–समाज, शरीरसंबंध, १२;–अंमल, ५२;–अंमलांतील हिंदु हें नांव, ५१; कायदा, १०९; रिया-सत, १०१

इंग्लंड, १३४

इंग्लिश, ८४; अमेरिकनइंडियनांची वास-लात कशी लावतात, ७; ग्रंथकाराचें सवाईमाधवराव–स्वभावप्रदर्शन, ८९-९०; राज्यव्यवस्थेंतील उणिवा, ९६; –कडे महादजी बंगालचौथाई मागतो, ९४;–बद्दल मराठी दरबाराचें धोरण, ९४

इंडियन पीनलकोड, १०७; ११९;–ची रचना १०५;–मधील गुन्हेंवर्गीकरण, १०९

इंद्दीअ, ४९; ( इंद्दीय ), ४९

इंद्रद्वीप, ४९

इंदापुर, ७०; शहाजीराजांची जाहागीर, ६७; मोकासा शिवाजी महाराजांस अर्जानी, ६८

ई

ईदिलशहा ( शिकंदर )–मोंगल सल्ला ( १६०१ माघ ), १९५

ईभराम ईदिलशहा–मृत्यु ( १५५१ चैत्र ), १७७

ईसमाईलखान मका, कंची सोडतो ( १६०९ फाल्गुन ), २००; राजाराम महाराजांच्या चाकरीस ( १६११ पौष व० ), २०२

ईंगलीयाची सोयरीक ( १५७९ वैशाख शु. १२ ), १८१

उ

उच्च संस्कृतीचा विध्वंस, ११

उज्जनी, ८६

उत्रोली ता।, १८२;१८३;

उदेभान, १८८

उदो उदो, ८१;–नाथ, नाथ जगदंबा, –नाथ म्हणजे च जगदंबा; ८०

उद्योत ग्रंथ, ३३

उपाध्ये; ७२

उमदतुलमुल्क, दक्षणसुभा,७६-७७

उमा, ८०

उमाजीराजे, संभाजीराजांचा पुत्र, १८०

उरण, मौजे, ता। वाळवें प्रांत पन्हाळा, १५४

उरवडें, ७९;२१३;२१४

ऊ

ऊट (एक बाब), ६९; ७१

ऋ

ऋणदानादि व्यवहार, १०८;११७;१४०

ऋषिनंदन कवि, ७२

ए

एक नवरा जिवंत असतां दुसरा करणें, १३०

एकवर्णी, सुधारक, ४८

एचू, नारायणराव रा०, २२१

एदलाबाद, २२२; देशमुखदफ्तर, २२२

एलजी पवार, १२५

ऐ

ऐतिहासिक व्यक्तींचें चरित्र कसें लिहावें ८३

ऐनेकर गोळे, २१५

ओ

ओसर तर्फ, १३९

ओंकार भट, १२०

ओंकारेश्वर, पर्जन्याबद्दल अभिषेक, ९५

औ

औंध, ऊर्फ साकरगड, ७१

क

कटगूण, गांव, ११५

कटारी, गांव, ११८

कडबा (एक बाब), ६९;७१

कडवाडी, १९२

कनकगिरी, शहाजीराजांची अटक ( १५७० श्रावण वद्य ), १७९

कनिष्ट, जातीतून वरिष्ट जातींत जाण्याचा क्रम मागें पडण्याचें कारण, ४३

कनेरसर, १४८

कर्ण, मोगलाईत जातो ( १६११ श्रावण व० ११ ) २०७

करणाटक, २०२; २०५; २०६; –कारभारी १९६; ९१; प्रांतीं शिवाजी महाराज मसलतीस जातात ( १५८० अश्वीन ), ७८; ७९; मसलत ( १५७१ ) १७९; शामजी नाईक कैद ( १६०३ भाद्रपद ), १९७; केसोपंत येतो ( १६०८ फाल्गुन ), २००

करणीक, व्याख्या, ४०

कर्माच्या बरेवाईटाची कसोटी, १०६

कऱ्हाड, कासार–लिंगायतकजिबा, १४६; कोष्टी, १४७;–चे देशपांडे, ७१; २०८

कलकत्ता, ९४

कलचूरी,–चा महाराष्ट्रांत अंमल, १०१

कलंच, ७०

कलचोली, ७९

कल्याण, १८३; चा नामजाद हवालदार, १८१; ( भिवडी ), १९६;–चा वेढा, १९७

कल्याणपंत, मृत्यु, १९०

कल्याणी, चा विक्रमादित्य, १०१

कलुशा, ( कवि–कलुश–कबजीबावा ) ३८;–चा सल्ला, १९७;–स कुल अखत्यार मिळतो ( १६०५ पौष ), १९८; शहाजादा अकबरास भेटतो ( १६०५ माघ शु० १ ), रायगडीं येतो ( १६०६ कार्तीक शु० ), गागोलीची लढाई ( १६०६ पौष व० ४ ), मारून विजापूर कराचे मदनीस जातो ( १६०७ आषाढ ), १९९; खेळण्यास पळतो ( १६१० कार्तीक ),–स शेख निजाम पकडतो ( १६१० माघ व० ७ ), २०१;–चा मृत्यु ( १६१० फाल्गुन व० ३० ), २०२

कविजंग,.चा वंश, २१७

काजी–कऱ्हाड, २०८

काजी महबतखान, दौलताबाद घेतो ( १५५४ ज्येष्ठ ) १७८

काठी, ७०

कात्यायन, चें वार्तिक, १८

काथळागड, १९९

कानतखोरें, १८४
कानवई किल्ले, १३६
कानस्टनूटाईन, १३४
कान्होजी नाईक जेधे, स पुत्र (१५४७ कार्तीक), १७७; व शहाजीराजे भेट (१५५७), १७८;–स शहाजीराजा बरोबर कैद (१५७० श्रावण व०) व सुटका (१५७१ ज्येष्ठ शु०), १७९;–ची शहाजीराजा बरोबर मसलत (१५७१ ज्येष्ठ);–चें जावली प्र रण (१५७७ पौष), रायरी प्रकरण (१५७८ वैशाख), १८०; चा विश्वासु माणसें (१५७९ अश्वीन), १८१–१८२; यास फर्मान (१५८१ वैशाख);–राजगडीं येतो (१५८१ वैशाख), १८२;–चें इमान; वतनावर पाणी सोडतो;–ची क्रिया; कबिला तळेगांवीं पाठवितो;–चें अफजल प्रकरण (१५८१ वैशाख - मार्गशीर्ष), १८३ – १८४
कानळदे, २२२
कामबकस शहाजादा, चंदीस जातो (१६१३ पौष), २०३;–ची कैद (१६१४ मार्गशीर्ष व० ३), २०४; चंदीहून परत जातो (१६१४ पौष व०), २०३
कायदा, हिंदु धर्मशास्त्रांतील 'धर्म' याचा अर्थ, ५०
कायस्थ, ३८; ३१; जाति, २३; प्रतिलोम, पंच संस्काराचे अधिकारी, अनलोम, ३४; व ब्राह्मण यांच्या शिक्षणांतील भेद,–त मांसभक्षण,–ची वेदोक्ताची आकांक्षा,–ची शक्ति, शिलाहार व मुसुलमान अमदानी,–४२;–त पिंडाची चाल;–चा सामाजिक प्रश्न सुटत असताना हिंदवी पातशाहीचें नुकसान, ४३चा मंत्रवदुपनयनाचा प्रथम आग्रह अथवा फिर्याद;–ची दुसरी फिर्याद; ३७;–चे सर्व मंडळ संभाजीच्या विरुद्ध;–ची तिसरी फिर्याद, ३८; –चा छत्रपतींना वेदोक्तांत गुंतविण्याचा हेतु;–ची मुख्य, तुरळक व मूळ वसती, ३९; प्रभुपण मिळवितात, धर्मशास्त्र व जातिविवेकाप्रमाणें उपजीविकासाधन,–चे लेखनकर्म मुसलमान अमलांत ब्राह्मणाकडे येते, त्यामुळें त्यांचा असंतोष,–च्या ऐश्वर्याची परासीमा, ४०; कायस्थं न हि विश्वसेत्,–चा कुलकर्णास तुटवडा,–ची भीति,–चा उ० हिंदुस्थानांतील प्रामाणिकपणाचा लौकिक,–नां आर्यांच्या वसाहती दक्षिणेंत होत असतांना कां वगळले, ४१;–ची शिव–शंभू–कारकीर्दींतील मागणी,–च्या वेदोक्ताच्या मागणीचा गर्भितार्थ,–त पाटाची व केशवपनाची चाल, ४२;–चें वेदोक्त समाजापुढें केव्हां आलें, ४४;–ची स्वतःबद्दल खात्री, हे त्रैवर्णिकांचे धर्म आचरण्यास योग्य झाले आहेत, –ची त्रिशंकुवत् स्थिति, ४६–४८
कायस्थ चांद्रसेनीय, हे क्षत्रियोत्पन्न, यांचे अमंत्रक संस्कार, ३४; कोंकणांत केव्हां आले,–ची संख्या, चीं जुनीं व नवीं आडनांवें, ४०;–चा काशींतील समंत्रक यज्ञ, ३९;– स

समंत्रक संस्कार न देण्याचें कारण, ३७;–चा उपनयन अधिकार, ३४; –च्या खटपटी, ३९;–ची वसती,–ची शिव व शिलाहारकालीन लोकसंख्या; ४१
कायस्थधर्मप्रदीप, २७; ग्रंथरचनाकाल, प्रकरणें, ३१–३७
कायस्थाचारदीपिका, ३४
कारनी, २०६
कारवार, ४१
कारी १७५; १८३; १९३; २०२; २०५
कारंजे, शिवाजीमहाराज स्वारी(१५९२) १७६; १८९
कावजी कोंढाळकर, दईरगडवेढा काढतो, १८५
काव्येतिहाससंग्रह, ८४
काश्मीर, ४९
काशी, औरंगजेब उपद्रव, १८८; चांद्रसेनीयांचा समंत्रक यज्ञ, ३८; पटवर्धन व नाना येथें येऊं इच्छितात, ९१
काशीनाथ डिंगरे, १५१
कासार, सोमवंशी क्षत्रिय, १४६; मंगळवेढेमहारहक्क, ५८
कासमिखान, औरंगजेबास अनुकूल, पिलगोंडे घेतो (१६०९ अश्विन), २००; कैद व मृत्यु (१८१७ पौष), २०६
किचनेर, लॉर्ड, ८९
किरिस्ताव, जात, ७
कीन, चा महादजी, ८४
कुडाळ, १८७; १९८; १९९; २२०
कुतुबशहा, अवरंगजेबास भागानगर देतो; (१६०८ माघ) व कैदी होतो (१६०९), २००
कुमार सरदार, १९७
कुरंभट्टी, रा० २२२
केदारजी खोपडा, अफजलप्रकरण, १८२; १८३
केशवराव अजहत देशमुख, रा०, २१६.
केशवराव नामदार, २१९
केशवराव बेद्रकर, मंगळवेढेमहजरसाक्षी, ६५
केशव वर्तक, १२९
केशव विठ्ठल रायरीकर–वंशज, २१४
केसरी, १५५; १७६; २१४
केसो(पंत) त्रिमल, कर्णाटकांत जातो, (१६०८ कार्तिक), २००; धरला जातो (१६१० फाल्गुन), २०१; सुटका (१६११ भाद्रपद), २०२
केसो नारायण नन्हेकर, १८९
केळंजा, १९१
कैकाडी, मंगळवेढेमहारहक्क, ६२
कैलासभुवन, ८०
कोतवाल, चें काम, ११८, ११९
कोपल, किल्ले, १९५
कोरटी, ७०
कोरीगड, १३६
कोरेगांव, (प्रां वाई) १०७
कोलवण, १९८
कोल्हापूर, ४१; १८४; १९७
कोल्हार, १९३; १९४
कोष्टी, मंगळवेढेमहारहक्क, ६०; ६५
कोह्ज, १३६
कोहार, १४३

कोळठण, ७०
कोळेवाडीकर देशपांडे, ७१, २०८
कंची, २०१, २०४, २०६
कंटकशोधनसंस्था, ११८
कंथडीनाथ, १५६
कंबुजीय, १७
कंबोज, १९,-उत्पन्न कुरु १७
कुंजरगड, १८९
कुंभार, मगळवेढेमहार १६, ५९; ६०
कुंभारजवे, १९८
कोंकण, ८८, ९१, ११७, १९६, २२०,-प्रांत, १२७ १३३, १४८
कोंडाजी फर्जंद, १९०
कोंढाणा, १७९; १८६; १८७
कृतयुग, २०९
कृष्णदयार्णव, कविता, २१८
कृष्णराव महादेव, १२८
कृष्णा, १८४,-तीर, ९१;-माहात्म्य, २१३
कृष्णाजी उतरेकर, १२२
कृष्णाजी कंक, १९८
कृष्णाजी भास्कर, ७८; देशाधिकारी व लेखक प्रांत बारा मावळ, ७९
कृष्णाजी सदाशिव, १२९
क्लाइव्ह, १०१

ख

खडकी, औरंगाबाद, २१९
खडकेश्वर, २१९
खर्ड्याच्या स्वारीच्या यशाचें कारण, ९७
खरे, शास्त्री, २१०,८३;८४;९०; ९३;९७
खवासखान, १७७; कुडाळास येतो (१५८६ कार्तीक), १८७; कारमारी होतो (१५९४ मार्गशीर्ष), १९०; बहलोलास धरतो (१५९७ मार्गशीर्ष), १९२
ख्वाजगीवाले, ८२
खानजमा, निजामशहास घेतो, १७८
खानदेश, ४५;९७; १४६; २१७; २२२
खानमहमद, चा मृत्यु, १८१
खानवट, २१६
खानाजादकान, २०६
खिदरखान, १९१
खून, व त्याची शिक्षा, वतनदारानें केला तर, ब्राह्मणाचा आला तर, गुजगायशिरस्ता, ११९-१२०; ब्राह्मणाने केला तर, १२२; कुगणाचें मत, १२३
खेड १२७,१३२
खेडेबारी, १७९
खेत्रोजी बर्गे पाटील, ११७
खेळणा, २०१
खोटा वेष, १३२
खोटी, फिर्याद, १२८-१२९,-बातमी, १३५; साक्ष-१२८; ही नाणी १२९
खोरवची, ७०
खंडेराव काकडे, १३९
खंडेराव बक्षी, १३५
खोटें नाणे, १२९
खंडोजी बिन् धर्माजी खोपडा देशमुख, १८२-१८४
खंडो नारायण कुळकर्णी दीक्षित पैठणकर, ६७
खंडोपंत कुलकर्णी मिरजकर, ६५
खंडोबा, ८५
खंडो शामराव वेलसरे, १८९

खंदा, इतिहास नकलकार कसा असावा, २०९
ख्रिश्चन, बाह्यांचा समावेश, ५२; समाज किती आहे, ५२
ख्रिस्ती, धर्म,-चे पूर्वीचे संबंध, ८५; बाटे, ५

ग

गणधर्म, ४६
गणपती, २२
गणेशखिंड, ८७
गणेशगांव, १९७
गदक, प्रांत, १९२
गदलक्ष्मीश्वर, १८४
गरुड, ८
गलगला, २०३; २०६
गळी गुजर, १२७
गागाभट्ट, २७; ३१; ३२; ३४; १०२ चांद्रसेनीय कायस्थ क्षत्रियोत्पन्न मानतो, ४२; दक्षिणेंत येऊन (१५९५), परत काशीस जातो (१५९६), ३३; वर्णत्रयाला १६ संस्कार सांगतो, ३४;-च्या मते शूद्रांना ५ संस्कार, चांद्रसेनीयाना १२ संस्कार, ३७; मीमासक, श्लोक रचतो, ३२; -च्या पूर्वजानें काशी विश्वेश्वर देवालय बांधलें, ३२
गागाभट्टी, २७
गागोली, १९९
गाजदीखान, बेदरावर आला (१६१८ चैत्र), २०६; नामजाद (१६१९ चैत्र), २०७
गायकवाड, १२४; १८१
गारदी ८९
गारदौड, २१६
गारुडी, मंगळवेढेमहारहक्क, ६५
गिरजोजी निंबाळकर, २०५
गिरमाबाई देशपांडे, १५१
गिरिजा, २८
गुजराथ, २१; प्रांत, १२०
गुप्त, १७; १९
गुप्तनाथ, ८१
गुरव, मंगळवेढेमहारहक्क, ६१
गुऱ्हाळ, ६१
गुलामास फूस लावून नेणें, १२१
गोखले, प्रो०, २१४
गोखले, रा०, ७४
गोठाण-घोटण-, २१८
गोत, १३१; १३९, १४७; खर्च, १४८; छत्रपतिआज्ञा, १५३, सभा, १३४, संस्था, ११७
गोनाडी, ७०
गोदातीर, ४१; २१८
गोदुबाई जेधीण, १९३
गोपाळ, मंगळवेढेमहारहक्क, ६२
गोपाळराव, शिंदे-सेनापति, ९५
गोपाळराव, पटवर्धन, ९१
गोपीनाथ बाळकृष्ण पोतनीस उरवडेकर, श्री०, २१३
गोरक्षनाथ, ८०
गोराई, १७४
गोवध, १३२
गोवळकोंडेकर, ३२
गोवळी, मंगळवेढेमहारहक्क, ६२
गोविंद गोपाळ बर्वे, १३८
गोविंदजी जगन्नाथ देशमुख, १२९
गोविंद भगवंत पिंगळे-वंश, २१६

गोविंद माधव कुलकर्णी रा०, २१६
गोविंदशास्त्री पटवर्धन श्री०, २१५
गोविंदराव आपाजी, १३८
गोविंदराव काळे, ८७, ८८,-चें पत्र, ८७,-चें मराठेशाहीविषयींचें म्हणणें, ९६
गोविंदराव गायकवाड पक्ष, ८९
गंगथड, ४१
गंगा कळावंतीण, १३६
गंगाधरपत, १९९
गंगाधरभट कर्वे, १३९
गंगाधर शास्त्री पटवर्धन, आत्मवृत्त, व त्याचे वंशज, २१५
गंगा नदी, २८
गंगेत घोडे नहाले, ८४
गंभीरराव, ९९
गांवकऱ्यांची जबाबदारी, ११६
गांवखेड, १३३
गांवज्या भिल, १२७
गोंधळी मगळवेढेमहारहक्क, ६२
ग्राम, कोणाचें बनलेले असते, २, सभा, ३, संस्था, ३, ५; ७, ८; १९, २२
ग्रामण्य, परकीय अंमला खालील, ८२
ग्रीक, ४९
ग्रीस, ११
ग्रंथाच्या मूळप्रतीची योग्यता, ८२
ग्रांटडफ, ८४; ९०; ९१,-चें सचीव-प्रकरणी निराधार म्हणणे, ९२

घ

घागरगांव, १२२
घासी बिन् धनराज नाईक, १४३
घिसाडी, मगळवेढेमहारहक्क, ५८

च

चक्रपूर, २०३
चणकवाडीकर जहागीरदार, रा०, २१९
चतुर्भुज सावकार, १२८
चतुर्वर्गचिंतामणी, ३२; १०२
चतुर्वर्ण, ५
चन्नगिरी, २२१
चाकण, १८५; किल्ले, १२५; तुरुंग, १३६
चाणक्य, अर्थशास्त्र, १०३-१०४
चातुर्मासे, ८२
चातुर्वर्ण्य, कशाचा परिणाम, ३,-ची वृथा निंदा, ९-१०,-ची व्यवस्था, १०९; अभिमान्याचे आजचे कर्तव्य व तें टाळलें तर होणारा परिणाम, ४८-४९
चातुर्वर्णिक, हिंदूंची वसाहत, ४१; आर्यजाति सनातनधर्मीय आहत, ५१, आर्यांतील पाखांडें, ५०
चार जाति, केव्हां बनल्या, ५
चालुक्य; १७, १९;-चा महाराष्ट्रांत अंमल, १०१
चाळीसगाव, १५२; २१७
चिटणीस, कृत शाहूमहाराज ( दुसरे )-बखर, ९३; कृत श्लोकबद्ध रामायण; ७२
चितळे, रा० २२०
चिदंबर, १९३
चिपळोण, १३५
चिमाबाई, १५१
चिरणी, १४३
चीन, ११; व जपान येथील ३ प्रकारचें समावेशन, समावेशनाचा प्रश्न न उद्भवण्याचें कारण, बाह्यांच्या वसा-

हर्ती न होण्याचे कारण, २; समाज, २८
चुडामण परदेशी, १२१
चेनपटण, २०२
चोरी, ११५; व दरवडा, १२६–१२८
चौगांव, १३३
चौथाई, ८९; १२०
चंदन किल्ले, १३६; १३९
चंदरराऊ, रायरी प्रकरण, १८१
चंदी ( चंजी ), १७९; १९३; १९६; २०२–२०७;–चा साहेबसुभा, १९४
चंद्रगुप्त, १८; सम्राट, १०४
चंद्रचूड, इनाम, २१६; घराणें, ८४ दफ्तर, ९४; ९७; पत्रें, ८७
चंद्रमौळी, ८०
चांगोजी काटकर, २०१
चांडाल ६
चांदजी कदम भोरपकर, २०५
चांदजी नाईक जेधे, १८६
चांदवड किल्ले, १३६; १३८
चांभार, मंगळवेढेमहारहक्क, ५९;६०
चिंचवड, १९०;२५५
चिंचोली, १४५
चिंचोलीकर जहागीरदार रा०, २१९
चिंतामण जोशी सरवदा, ११८; १४३
चिंतामणराव अप्पा, ३८
चिंतो विठ्ठल–वंश, २१४
चिंतो हरी, १२९

छ

छत्रपती,–कडे अर्ज, १४३;–कडे थळ पत्र, १४४;–चा जबाबदारी, १५३; –ची १७३९ ची बारनिशी, २१६; –चें ग्रंथालय, २७

ज

जईतजी काटकर, १९६–१९७
जकात, मंगळवेढेमहारहक्क, ६०
जग्या मारवाडी, १३४
जनकोजी शिंदे, ८९, खोटा, १३२
जनदेव मलूक, २०५
जनार्दन नारायण मृत्यु ( १६८५ आषाढ. ) १९८
जनार्दन स्वामी,–ची समाधी, २१९
जपानी समाज, २४
जबरीनें लग्न लावणें, १३०
जमना कळावंतीण, १३६
जयसिंग, १८७
जरदुष्ट्र, १६
जवार, १९०
जसवंतसिंग, १८७; १८८
जळगांव, २२२
जाउली, १८२; कशी घेतली, १८०;
जाधव, रा०, २५९
जाधवराय–मोयरीक, १८१
जाति, धंद्याची वतनदार, २; व्याख्या, पदवी, कशानें प्राप्त होते, संस्थेचें कार्य, ४,४५, शेवटला राशी, ५; भ्रष्ट, ७,-संस्थेचे समाजरक्षणकार्य, संपत्काली व आपत्काली काय करत्ये; वरील युरोपियनीय आक्षेप, १६; –चे चार वर्ण, १७,–संस्था, २१; –संस्था निर्माण केव्हां झाली,४;११; –संस्थेचे फायदे,११, १४,–संस्थेच्या उपयुक्ततेची खरी परीक्षा, १५; –संस्था मोडली तर, १६;–लखोटबंद, २४;-निर्णयप्रकरण, ३३; –स्पर्धेचें संकट,४२;–च्या स्थिरीकर-

णाच्या प्रारंभी आर्यां पहील ? सामाजिक प्रश्न व त्याची सोडवणूक, ४४;-ला स्थैर्य कशानें येतें, ४८, -वर्तमान युरोपियनसमाजात नाहीत, अनैच्छिक जन्मसिद्ध पोटसमाज, जातिवाचक शब्द युरोपियनसमाज शास्त्रांत मुद्धलातच नाही, धर्म, ४६, -बद्ध असणं म्हणजे,५१,-भेद,१५०, -ची कांही नावें, ५६, ५७
जात्यभिमान कां जात्युन्नति, ४८
जातिविवेकग्रंथ, ५, २४
जातिविवेकप्रबंध, ४२
जानशी, २२०
जापीखान, २०६
जार्ज दुसरा, १३४
जालना, २१८, २०९,-पूर १९५
जालाल महमद, १५२
जावजी नाईक, १२५
जाहांगीर, १७७
जिनगर, मंगळवेढेमहारहक्क, ६०, ६१
जिवधन, किल्ले १३६
जिवबादादा, ८८;-चरित्र, ८४; ८६
जिवली, १३४.
जिवाजी दामोदर कुळकर्णी, १२६; १२७
जीजाबाई राजमाता, २८, ३१,-ची महाबळेश्वरीं तुळा, १८७;-चा मृत्यु ३३; ( १५९६ चैत्र व० ९ )१९१; -बद्दल लोकमत, ३२;-चा शि. प्र. तील वर्तमानकालीन उल्लेख, ३३
जीव महाला, १८३
जुन्नर, १२८; सरकार,-१५१,-कर; २०५
जुन्या कागदांतील विधानें, ८३
जुलपुकारखान-झु० पहा.
जेजुरी, ९२, १४४; १४९
जेतेजितव्यवहार, ४
जेधे देशमुख, १७५-१७६-चा अर्ज, १९१, १९२;-ची शकावली, १७५;
जेम्स, पहिला, १३४
जेवर, १९४
जेमरी युद्ध, ( १५९९ ), ३३
जैन, ४९;-चा श्रीज्ञानेश्वरग्रथांत उल्लेख, १७२, पाखंड, ५१; पाखंडी, ५०, पृथक् जाति, २२, संप्रदायांत बाह्याचा समावेश, ५२
जोतिबा, ८५
जोती पाटील, नासीककर, ६५
जोधपूर पत्रें, ९५
जोशी वृत्ती, १४५
जंजीरा, ४१
जंबुद्वीप, ४९
जांबगांव, ८६; मौजे, ११५
जिंजी, २२१
जिंती, २१६
ज्योतिष, ४१

झ

झगडपुरी गोसावी, १३१
झुलफिकरखान, रायगडास वेढा घालतो ( १६११ चैत्र शु. १५ ); चंदीस वेढा घालतो ( १६१२ भाद्रपद शु. ४ ); २०२; चंदीचा वेढा उठवून कामबकमास कैद करतो ( १६१४ मार्गशीर्ष व० ), २०४; पुन्हां चंदीस वेढा घालतो (१६१४ पौष व० ),

२०३, चंद्रावरी येऊन ( १६१५ वैशाख ), सल्ला करतो ( १६१५ वैशाख ), २०५; पुन्हां चंदीस वेढा घालतो ( १६१५ अश्विन ), जनदेश मुलुक घेतो ( कित्ता ), २०५; चंद्रावरी येतो ( १६१५ माघ ), वेळरवेढा घालतो ( १६१७ ), २०६

ट

टकले, ३८
टाकळी, १३६
टिपू, लढाई, ८७; वरील स्वारीच्या वेळचा चंद्रचौथाई सूट, ९२,–बद्दल मराठी दरबारांतील धोरण, ९८,–चे मृत्युस्थान,–ची कबर,–चा बंगला, २२१
टिळक, रा० सनातन धर्माचे लक्षण बांधतात ५१

ठ

ठमाबाई, १२१
ठेगो मगो, १४७

ड

डामहल, १२६
डावीज, ७०
डोडेरी, २०६
डुंगळे अमदानी, ९८
डोंगरइट, १२७
डोंगरवसवा, १२६
डोंबारी, मंगळवेढेमहारहक्क, ६२

ढ

ढमढेरे, घगणे, २१६,–कडे जेध्याचा कबिला येतो, १८४
ढमाले, १८४

त

तगर, ४०
तट्टू, २१६
तवरगिरी, ३२
तळचीड, २०८
तळेगाव, कसबे, १५१; १८३,–ढमढेरे, २१६
ताजखान, १८८
तान्या देवळ्या कुणबी, १३१
तान्हाजी, मृत्यु ( १५९१ माघ व० ९ शुक्रवार ), १८८–१८९
तानाशहा ऊर्फ अबदुल हसन, तक्तारोहण ( १५९४ ज्येष्ठ शु० ५ ) १९०
तान्हळे, १४७
तिरोली, लढाई ( १६०५ चैत्र ), १९८
तीसगांव, १२२, १२६, १२७; १४७
तुकोचा, ८०
तुकोजी होळकर,–ची नानाच्या माळ्याची इच्छा, ८७,–ची स्वार्थत्यागाची तयारी नव्हती,–ची बेशिस्त वागणूक, ९५
तुळापूर, २०१–२०३
तुळजापूरकर भुत्ये, १४८
तुळाजी आंग्रे, जजिऱ्याम नेण्याचा कट, १२५, फितूर, १३७
तेली, मंगळवेढेमहारहक्क, ६०
तोडेवाले, रा०, २१९
तोरणा, २०३; कायस्थ वसती, ३९; खालील मावळे ४१;
तंजावर ( चंद्रावर ), १९३; २०२; २०४; २०५; २२१, येकोजीराजे मृत्यु, १९९

तांडुळवाडकर, रा०, २१७
तांबट, मंगळवेढेमहारहक्क, ६२
तांबोळी, ( कित्ता ) ५८;५९
त्रिचनापल्ली, १९७; २०४
त्रिणामली, २०१
त्रिपदी, १०४
त्रिपुरारी, ८०
त्रिमणामल, २०२
त्रीपती, १९३
त्रिंबक, १९६; –गड, १८९; –किल्ले, १२५
त्रिंबकपंत डबीर, आग्र्यास अटक ( १५८८ श्रावण व० ३० ), सुटका ( १५८९ चैत्र व० १२ ), १८८, मृत्यु ( १५९९ चैत्र व० १२ ), १९३
त्रिंबक कृष्ण, १४१
त्रिंबक गणेशभट, १३८
त्रिंबकपंत मुतालीक, २०५
त्रिंबकेश्वर, १३६
त्र्यंबकराय, २०२

थ

थत्ते, रा०, २१९

द

दईरीगड, १८५
दउंड, १९९
दत्ताजी शिंदे, ८९
दत्तोपंत पोतदार, रा०, २१६
दत्तोपंत मौन, रा., २१७
दत्तोबा नाझरेकर, २१५
दमण, ४१
दयाजीराव सर्जेराव जेधे, १७५
दराचें रान, १८२
दलेलखान, १८९
दवन, १९०
दस्यूंचे जातिरूप गट, ९
दक्षिण ( दक्खन ), ७; ७६; ८६ –तील वैश्यउच्छेद २१
दादजी काकडे, १८९
दादाजी कोंडदेव, सुभेदार शहाजी जहागीर, ६७, ६८, १७६;–चा वंश, २१६
दादाजी कृष्ण लोहोकरे, १८१; –स अटक ( १५७० श्रावण);–ची सुटका ( १५७१ ज्येष्ठ ), १७९; –स वस्त्रे मिळतात,१८०; कल्याणचा नामजाद हवालदार होतो ( १५७९), १८१, १८३,–चा कबिला, १८४
दादाजी बापूजी, १८१
दाभोळ, मोत्याची वृष्टि, १९६
दामाजी नारायेण, २०५
दामाजीपंत, मंगळवेढे कमावीसदार; सरकारी कोठारें लुटवितो, रसद, ५४–५६; ६७; –च्या हातची देणगी, ६५,–च्या ( खुद्द ) हातचा महजर, ५४, ६४,–च्या महजराची उजळणी कधी झाली, ५४;–च्या हातचीं कलमे, ५६;–च्या कारकीर्दीतील दुष्काळ,–च्या वेळची वसुलाची रीत, ५५
दायरेदर्गा, २१८
दारकोजी भोसले, १९०
दारू, पिणें, १३५
दिघे, देशपांडे, २१४
दिनकर मुळे, स्वानुभवदिनकरकर्ता, २१७

दिनकरराव ( गिरजोजी निंबाळकर ? ) २०५
दिलरसबानू, कबर, २१९
दिल्ली, १७६, १८१; १८२, १८८, १९०;–कर्डाल कारभार, ८६,–चा खंडो पाटील,५६,–चा पातशहा, ८४, १७७;–ची पत्रें, ९५,–ची पातशाही मराठेपातशाहीमध्यें अंतर्भूत होते, ८४
दिल्लीश्वर, २९; ३१; ३२
दिलेरखान, सुभा ( १५९९ भाद्रपद ) होतो, १९३,–कडे संभाजीराजे जातात ( १६०० पौष शु० १० ) १९४; विजापुरास वेढा घालतो ( १६०१ अश्वीन ), १९५, दिल्लीस जातो (१६०२ श्रावण ), १९६, विषप्राशन करतो ( १६०५ अश्वीन ), १९८
दिवाण, चें काम, १००
दिवाणी व्यवहार, हल्लीचे, १००, पूर्वीचे, १०३; ११७
दिव्य, १५४;–चे कागद, २२०,–ची पद्धति, ११६
दीन–कवि, ७९, ८१, २१४, परंपरा, ८०
दुखापत–गुन्हा, १२४
दुर्गादास, १९६
दुष्काळ ( १६०८ क्षय, फाल्गुन ), २००
देव, रा०, ८१
देवगड, १३३
देवगिरी, ४१;–चे यादवघराणें, १०२
देवघाट, १९८
देवजी परात कोळी, १३०; १३९
देवधर्म, हिंदुधर्मांतील 'धर्म' याचा अर्थ, ५०
देवगाव हिंगणे, ९५
देवरुख, १३३, १८८; येथें जनार्दन नारायण मृत्यु, १९८
देवळाली, १२६
देशपांडे, ४०
देशमुख, मंगळवेढेमहारहक्क, ५७
देसाई, ४०
दौलत चाचुराव, १२५
दौलतराव शिंदे, लग्न जांबगांवी, ८६
दौलताबाद, २१८,–किल्ले, १२५;२१९, –तरुग, १३६,महबतखान घेतो, १७८
दंडपारुष्य, १००; १०१; १०३; १०७, ११४; ११५; ११७, ११९
दंड–शिक्षा, १००,–स्थानें, ११४,–चे प्रकार,११३,–च्या संज्ञा व कोष्टक, ११४
द्वितीय संमेलन, १४०

## ध

धनगड किल्ले, १३६; तुरुंग, १३९
धनगर, मंगळवेढेमहारहक्क, ६२,६६
धनाजी जाधव, ची सर्जेखान मोहीम ( १६१२ वैशाख व० ) २०३; चंदीस जातो व इस्माईल मका धरतो ( १६१४ मार्गशीर्ष ), २०३; नामजाद होतो ( १६१५ वैशाख ); –ची पन्हाळामोहीम(१६१५ कार्तीक ), २०४; वेळूरवेढा काढतो ( १६१७ मार्गशीर्ष ) व देशास येतो ( १६१८ ज्येष्ठ), २०६
धर्मराज्य, १०२; १५३

धर्मसभा ( आजच्या ), २४
धर्मस्थियसंस्था, १०४
धर्मस्थियन्यायसभा, १०४
धर्माजी भालिंगा, १२५
धान्य,-चीं कांहीं नांवें, ५८
धामणी, १४८
धार्मिकसमावेशन, १
धुळें, ८१; २०७;-कर, २१८
धोडप, किल्ले, ११७; १२५; तुरुंग, १३६;
धोंडजी माळी, १३०
धोंडो गोपाळ केळकर, १३९

न

नबाब,-चा बेत, ९२; बेदरास येणार, ९३; येतो, ९४
नरसा किंकर, ७२
नरसिंगराव गोविंद, १३९
नरहरी दिवाकर, ७९
नरहरी रत्नाकर, १३६
नळदुर्ग, १९३
नवखंड्या २१९
नागपूर, ४१
नागभट चरित्र, १५४
नागरिकत्व,-च्या हक्काची लायकी, ६
नागेश कवि मुळे, २१७
नागोजी बिन् सर्ज्याराव जेधे, यालगेद लढाई व मृत्यु ( १५९८ पौष ), १९२; १९३
नागोजी माने, राजाराम महाराजांच्या चाकरीस येतो ( १६१२ ) मार्गशीर्ष ), २०३; संताजी घोरपड्यास मारतो ( १६१९ आषाढ ), २०७
नागोराम भागवत, २१९
नातू, कै० ९२
नातेंपुतें, १४७
नाथसंप्रदाय, ८०
नाना कुळकर्णी पंढरपूरकर, ६५
नाना कुळकर्णी कासीकर, ६५
नाना फडणीस, ८४-८६; व पाटीलबावा यांची निखालसता, जांबगांवीं अहेर पाठवितात, ८७;-वरील मत्सरयुक्त आरोप, ८८; व पाटीलबावांचें भांडण जुंपलें, त्यास रंग चढतो, नाना बारा वर्षांचा हिशेब मागतात, त्यांना उत्तर पटत नाहीं, ८९;-ची सवाई माधवरावांशीं वास्तविक वर्तणूक व 'देर्णे' करविणें, ९०;-चें काशीयात्राप्रकरण ( १७९२ आक्टोबर ३१ ) ९०-९१;-ची उणीव, ९१, भाऊस शिंद्याचा डौल सांगतात व बेदरचौथाईप्रकरण, ९२; आत्या सचीवप्रकरण, ९३; भाऊस ताकीद देतात,-वर मौनतदौला मारेकरी घालतो,-ची निस्वार्थता, व पाटीलबावा यांचें निखालस ऐकमत्य, ९४; व महादजी सलोखा, ९५; पाटीलबावाच्या समाचारास जातात, ९६, वेरूळ परगण्याचे देशमुख, २१९
नानासाहेब पेशवे श्रीमंत, ८४; ८७ ८९
नामदेव, गाथा, १५५;-चा काल, १७२
नामशूद्र, ५
नारायणगड, किल्ले, ११६; १२५
नारायणजी पाटील ११७
नारायणभट व्यास, १२०

नारायण यशवंत मिरीकर रा० २१७; २१८
नारायणराव पेशवे श्रीमंत, १२४; कायस्थ फिर्याद व निर्णय आणि त्यामुळे झालेला भयंकर परिणाम, ३७; ३८
नारायण हणमंते, २१६
नारो कृष्ण दरवे, ११८
नारो राम, १५१
नासीक, १९४; २१७;–चे ब्राह्मण दारू पितात १३५
नासीरजंग कबर, २१९
निजाम, ८६; १२४; अह्ली एका नाटकाचा उपनायक, ९१;–कडून पाटीलबावा २५ लाख रुपये खातो,९२; –बद्दलचें धोरण व त्याचा भित्रा दरबार आणि त्याचे सखेदाश्चर्य ९४
निजामपूर, १९८
निजामशाहा, लुखजी जाधवरावास मारतो, १७८
निजामशाही, ८७; २१७
निमजगा, ६९
निरगुड, ७०
निरवागी, ७०
निराजी राहुजी, १८८
निवेली, २२०
निळकंठ भट्ट, १०२
निळोपंत पिंगळे, पेशवाई मिळते(१६०२ अश्वीन वद्य ), १९६; प्रधान, २०१; पेशवे २०२
निळोपंत मजमदार, पुरंधर घेतो (१५९१ फाल्गुन व० १२ ), १८९
नेतोजी पालकर, सुटता ( १६६७ मार्च २७ ) १७६; ऊर्फ मुर्शिदकुलीखान, १७६;–ची शुद्धि ( १५९८ आषाढ व० ४ ), १७६; १९२
नेमाजी शिंदे, २०२
नेरली, १४५
नेवासकर जोशी, रा० २१९
नौसिरखान, १८१
नंद, १८, ' नंदांतं क्षत्रियकुलं', ३४
निंबाजी कुळकर्णी, १३६
निंबाजी झगडा, १३०
निंबोणे, ११६
न्याय, ४१; न्यायाधीश, २७
न्हावी, मंगळवेढेमहारहक्क, ५८, ६०

प

पचेड १२०
पटवर्धन, ८४; दफ्तर, ८३
पट्टा, १९५; किल्ले, १३६
पठाण बिनू मलिक दाउद भांड, १४८
पदमासिंग, १९८
पनाळा किल्ला, वेढा ( १५८२ चैत्र ), १८५; अण्णाजीपंत घेतो ( १५९४ फाल्गुन व० १३ ), १९०; संभाजीराजेचा मुक्काम ( १६०१–१६०२ ), १९५, कबजी रैहतो ( १६०७ आषाढ ), २००; राजाराम महाराज मुक्काम (१६११ चैत्र),–२०२ मोंगला पासून परत घेतला ( १६१३, २०३; मोंगलाचा वेढा ( १६१४ ), पुन्हां परत घेतला (१६१५ कार्तिक), २०४
परगणा,–चे दोन अधिकारी, १००

परट, मंगळवेढेंमहारहक्क ५८-६०
परमार, १७
पर्वतीतळें, ९०
परवारें, १२०
पर्शु, १८; २१; ४९;-राम, ३१
परशुरामपंत आपटे, रा०, २१७
परशुराम परदेशी, १२१
परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी,-कवि, ७१; -संस्कृतज्ञ होता,-शिवपार्वती धावा करतो, ७२;-ची राजारामकालीन कामगिरी, ७२;-पनाला घेतो ( १६१३ ); २०३
परशुराम भाऊ पटवर्धन, पुण्यास येतो, सरकारावर देणें काढतो, ८८; देण्याबद्दल बोलणें, नानाचें ऐकतो, ८९; काशीचा त्रागा, ९०-९१
परसु बिन जावजी, १३५
परळी, वैजनाथ १७०
परेळी, किल्ले, शिवाजी महाराज घेतात (१५९५ चैत्र व० १० ), १९०; मुत्सद्यांची कैद ( १६०३ भाद्रपद ), १९७
पल्हव, १८।१९
पवार, १३९
पळसे, १४९
पाखंड, जाति, कशा बनल्या, ५०; ५२
पाखंडी, हिंदू कोण, हिंदूसमाज, न्यायाधीश, ५३
पाखांडे, १२ व्या शतकांतील उद्भवण्याचें कारण, २३
पाटस, २१६
पाटील, मंगळवेढेंमहारहक्क, ५७
पाटेगोनिया, १८
पाडळी, ११७
पाणिनी, सूत्रें, १८
पातशहापूर, १९६
पातशाही सनदा, ८६
पातरेकर, १२६
पार्थी, २१८; २१९
पानमळा, मंगळवेढेंमहारहक्क, ६२
पानमावळ, १९२
पाबल, १४९
पार, १८३; १८४
पारगांव, १२२
पारद, २१८; २१९
पार्वती, ८०;-नाथसंप्रदाय,-ही च उदोंनाथ, ८१
पारशी, जात केव्हां बनली, तिचा धंदा, ५; जातिबद्ध असून हिंदू कां नाहीत, ५१; समाज, १६; पंचायत, ५३
पारसनीस, रा. ७२
पारसीक, १८; १९; २१; ४९
पाल, १३६, १४८
पाली, १९६;-किल्ले, १३६; १३९-गड, १९४
पालेस्तैन, १६
पावनगड, १२५
पाश्चात्यधर्मशास्त्र, विधिनिषेध, १०४; -चा पाया, १०५
पासलकर, १८४
पितिंगा, १३६
पिलगोडे, २००
पिलाजी बिन् आत्माजी अंबरे, १४३
पीरमिय्या, १८८
पुक्कस, ४५

पुणें, ८८; ११८; १२१; १३८; १३९; १८५; १८६; २११; २१५; २१६; शहाजी राजेजहागीर, ६७; १७९; शहादीखान मोहीम १९८; १९९; मंगळवेढेंमहारमहजर, ६७;–चे मुत्सद्दी ८६; निजाम प्रकरण; बाजी मोरेश्वर प्रकरण ९२;–चा दुष्काळ; ९४; –ची कोतवाली, १३५; नागेश्वर, १४६;–चे रामशास्त्री न्यायाधीश, १४२; प्रांत,१४४;१७६;कोष्टी,१४७; गोत, १४७; जिल्हा,२१५; कोनकर, कानडे २१९

पुरंधर, ७९; १८९;–किल्ले,१३१;–तुरुंग, १३६; १७२;–येथें संभाजीमहाराज, जन्म १८१;-वेढा, १८७

पुला वल्लद तुळा राउत मांग, १२७

पुष्कळांचें पुष्कळ सुख, १०५–१०६

पेठ भातखळे, १२१

पेण, ११८; १४३; १४७; १८६

पेमगिरी, १७८

पेरू वंश, ७

पेशवाई, ८९;–ची इभ्रत, ९७;–चें निरनिराळें वळण, ९४;–तंटा, १५४; माथसंस्थान, २१८

पेसवे, ८५; ८७; ८८; १२४; १४३; –यास बादशाहीसनद अर्पण, ८६; –रोजमिशी, १४१; २१६

पैठण, १७३; कृष्णदयार्णवसंस्थान, २१८; तटांतील ब्राह्मण, १३६;थळ-१४४; गोसावी–मानभव कजिया, १४६; देवाचें राउळ, ५४; नाथसंस्थान, २१८; मंगळवेढेंमहारसनदे ६५; ६७; शिवदिनसंस्थान २१८; –चे क्षेत्रोपाध्ये कावळे, २१९

पोटजाति, कशा उत्पन्न झाल्या, २४; –मोडण्याची प्रवृत्ति,–ना व संकर जातींना मूळवर्णांत परत घेण्याची वेळ आली, ९३

पोतनीस, ७८; उरवडेकर, ७९

पोतनीस, रा०, २०८;२१४–२१६

पोलाळदेव, २२१

पौड, ३९; खोरे, १४७

पौराणिक, काल, ४९;–भूगोल, ४९

पंच, संस्था, ११७–११८

पंचबाजी, २१४; २१६

पंचम, व्याख्या, ५

पंचमहापातकी, १०९; शिक्षा, १०९

पंचाईत, १४१;१४६; अधिकार, १४३; कजिये, १४९; १५१

पंचीकरणमहावाक्यटीका, ७९

पंडितराव, २७,७२;

पंडीत वकील रा०, २१७

पंढरपूर, ८२;२१५

पंजाब, १७;८५; आर्यसमाज, ५१

पंताजीपंत वाकेनवीस, १९४

पंताजी सिवदेव, २०५

पांडवगड, १३६

पांडुरंग, १५१

पांडेपेडगांव, २१७

पांडोबा पटवर्धन, रा० १७५; २१३; २१४

पिंगळे तसबीर, २१६

पिंजारी, मंगळवेढेमहारहक्क, ५८; ५९

पेंढारीकरार, २२०

प्रतापगड, २०२; २०३; अफजल-प्रकरण, १८२–१८४
प्रतापराऊ, ( गुजर ) औरंगाबादेस जातो ( १५९० श्रावण ), १८८; बहलोलावर जातो ( १५९३ वैशाख ), १९०; पुन्हा बहलोलासी युद्ध ( १५९५ चैत्र शु० ), निवटीचें युद्ध व मृत्यु ( १५९५ माघ व०१४ ) १९१;–ची मुलगी राजारामराजांस दिली ( १६०१ फाल्गुन व. १० ), १९५
प्रतापसिंह महाराज, कायस्थ खटपटी, त्यांच्या फिर्यादीचा अनिश्चितनिकाल; वेदोक्त, ३८;–च्या पदच्युतीकरितां बाईच्या ब्राह्मणांचें अनुष्ठान, पदच्युतीचें कारण, ३९;–ची तसबीर, २२०
प्रतिलोमज, शरीरसंबंध, केव्हां घडे, संकरपोटसमाज, ३
प्रभात, ७४
प्रभु,–पणाचाहुद्दा;–नांव केव्हां प्रचारांत आलें;–पणाची पदवी व मिळकत मुसुलमानी अंमलात जाते;–वरघाटीं येतात;–चिटणीशी,–सबनिश्या मिळवितात;–चे सध्यांचे धंदे;–पण म्हणजे देसाईपण, ४०
प्रल्हादपंत, १९५
प्रल्हादराव देशपांडे, रा०, २१८
प्रवरासंगमनेर, १२१
प्रश्न,–च्या विचिकित्सेचे २ मार्ग, १५६
प्रार्थना समाज, ५२; पृथकजाति, २२

फ

फकीरमहमद नूरमहमद आतार, १४८
फडके, ८४
फतेखान, १७८; विषप्रयोग, १८२
फाटक, १४२
फाशेपारधी, मंगळवेढेंमहारहक्क, ६५
फिरंगाण प्रांत, १०२; १५०
फौजदाराचे काम, १०१; ११९
फौजदारी, गुन्हे, ११८, व्यवहार, १०० १०३
फंद फितूर, १२४
फ्रान्स, १३५
फ्रेझर, ८४; ९४; ९६
फ्रेंच, ८४; पिनलकोड, १३५; समाजक्रांति, १३

ब

बकाजी पाटील, ११७
बचाजी रघुनाथ, १२५
बचाजी शामराज १२०
बडोदें, २१६
बदअमल, १३९
बदकर्म, १३०; १३१
बदामी, हल्ला, ८८
बनपुरी, २०६
बनावट दस्तऐवज, १२९
बऱ्हाणपूर, ८६; १२८; १५०; १९६
बल्होलखान, ३१;–मृत्यु ( १५८० श्रावण ) १८२
बलुचिस्थान, मूळची संस्कृति व समाज कां नष्ट झाला, २१
बसवापटण, २०६;२२०;इदिलशहा घेतो १७८; औरंगजेब घेतो, २००
बहलोलखान, –चा रांगण्यास वेढा, ( १५८९ वैशाख ), १८८; धरला जातो (१५९३वैशाख)१९०; बिजापूर

लढाई ( १५९५ चैत्र शु० ) १९१; –स खवासखान धरतो (१५९७ मार्गशीर्ष शु० ), १९२; हलगी लढाई ( १५९८ ज्येष्ठ व० ), १९२; मृत्यु (१५९९ पौष ), १९३–१९४;–चा लेक पंचहचारी, २००

बहादूरगड, २१६

बहादूरखान, सालेरी वेढा ( १५९३ ज्येष्ठ ), १८९; हलगी लढाई, १९२; लालदरगेकोट घेतो ( १५९९आषाढ) तगीर होतो ( १५९९ भाद्रपद ), १९३; सुभा ( १६०२ आषाढ ), १९६; भागानगर लुटतो ( १६०७ वैशाख ), १९९

बहिणाबाई, ८०; ८१

बहिरजी घोरपडा, २०३; २०४

बहिरजी भोपतराव, १२५

बहिष्कार, १३६

बहुजनसमाज न्यायपीठ, ५३

बहुळकर, २०५

बक्षीगिरी, ८८

बागवान; मंगळवेढेमहारहक्क, ६०

बाजी जेधे, जन्म, १७७

बाजी बल्लाळ न्यायाधीश, १४१

बाजी बिन् नाभाजी पाटील, १५४

बाजी मोरेश्वर, सचीव कारभारी होतो; साचिवाचा छळ करतो;–स शिक्षा, ९२; ९३

बाजीराव ( दुसरे ), श्रीमंत, कायस्थखटपटी, ३८; तसबीर, २२०

बाजीराव गोविंद बर्वे, १३८

बाजी सर्जाराऊ, १८३

बाजी सोनार, १२६

बाजेपटी, ६९; ७१

बाणेरे, २१६

बादजी काडे, १९६

बादेशाही खेम सांवत, १९९

बापरुकमादेवीवरूविठ्ठलु, १७४

बापु गोखले तसबीर, २२०

बापूजी, १३०

बापूजी बिन् आवजी नाईक जेधे, १२१

बापूजी जुनरकर, ६५

बापूसाहेब भोसले शेडगांवकर, श्री०, २२०

बायाजी नाईक पुंडे, १९०; १९२

बाबाजीपंत, २०३

बाबुलगो, ७०

बाबूराव हरी, १२५; कैदी, १३७;–च्या मातोश्रीचें श्राद्ध, १३९; गुप्ते आंबेगांवकर वंश, २१४

बारदेस, १९८

बारामती, ८१; १२७, शहाजीराजेजहागीर, ६७; कोष्टी, १४७

बारा मावळ, ७८

बाल्हीक, १९

बावडेकर इतिहास, ८४

बावल्या वसवा भूमी, १२६

बाह्य, ४९; जाति, ५; पाखंडांत शिरतात, ५२;–नां हिंदू हें अभिधान केव्हां प्राप्त होई, ६

बाळ महाजनी खोत, १३३

बाळाजी आवजी, २७; ३०–३२; गागाभट्टाकडून कायस्थधर्मदीप रचवितो, ३३;–ची मंत्रवदुपनयनाची फिर्याद; गागाचें म्हणणें कबूल करतो; –स चिटणीशी मिळते ( १५७० ),

३७; कैद व मृत्यु (१६०३ भाद्रपद), १९७
बाळाजी खंडो, १२९
बाळाजी धोंडदेव, १३४
बाळाजी नाईक सिलिंबकर, १८१; १८३
बाळाजी महादेव कारकून, १३३
बाळाजी हरी जोगळेकर, १३१
बाळापूर, १९५
बाळासाहेब पंत प्रतिनिधी, श्री०, २१८
बाळोजी कराले, १२५
बाळोजीपंत लांडे, १३५
बीड, ८६
बीरवाडी, १४८
बुऱ्हान निजामशहाचा खून, १७८
बुल्होलखान, मृत्यु ( १५९९ ), ३३
बुलाखी, १८५
बुवाजी बिन् मोहब्बत आतार, १४८
बेकार आर्यास उपरी आर्य करून घेण्याची रीति, ३
बेदनूर, २२१
बेदर, २०६; दामाजहिकीकत, ५५; दामाजीचा महजर, ५४; मंगळवेढें-महार महजर, ६६; औरंगजेब घेतो, ( १५७९ आषाढ शु. ३ ), १८१; सरकार चौथाईअंमल, ९२;-चा काजी इमाम, ५६
बेलगांव, २०१
बेलदार मंगळवेढेंमहारहक्क, ५९
बोचेघोलीघाट, १८३
बोर, १४८
बोरगांव, ७२; प्रा शिराळें, १५४
बोरघाट, १९९
बोहरी, जात, ७; हिंदू कां नाहींत, ५१
बौद्ध, पृथकजाति, २२;-संप्रदायांत बाह्यांचा समावेश, ५२
बंकापूर, १९१
बंगलूर, २००; प्रांत, १७९; तमाशा बंगला, २२१
बंगाल, ८५; १०१; चौथाई, ८६; ब्राह्मो समाज, ५२
बंडूनाना रानडे, कै०, २१६
बांडे ( दे ), १९८
बांदल, १७६; रायरीप्रकरण जावली-प्रकरण १८०;अफजलप्रकरण१८२-१८४;-चा अर्ज, १९१-१९२
बिंबराज, हकीकत, १००; बखर, २२२
बुंदेलखंड, सेनधर घराणें, १०२
ब्राह्मणाचा हट्ट, ४६,-च्या हातून धर्म-शासन जाण्याचें कारण, ४७-४८; पोटजाति, २२; वर्णांत प्रविष्ट होण्याचे साधन, ४; हल्लीचे, ४८;-नीं शोध लाविलेलीं शास्त्रें, १७
ब्राह्मो, ५२; पृथकजाति, २२

भ

भक्कर, ७७-७८
भक्तमंजरीमाला, ८१;-ची मूळप्रत, ८२; -चें महत्व, ८३
भगवंत बहिरव थत्ते, १२९
भगवंत राजा, १०२
भगवंतराव, १५१
भगवा झेंडा, २१५
भगवान कुणबी, १२०
भट, रा० २१७
भरतखंड, ५;४९

भरतभूमि, २
भवरा, १९८
भवाणजी पाटील पुणेकर, ६५
भवानीबाई, जन्म ( १६०० माघ ), १९४
भाईचंद गुजर, १२७
भाऊ काळोजी भोई, १३३
भाऊसाहेब पेशवे श्रीमंत, ८७
भागवत, ३४; १०६; २१३
भागानगर, १९०; १९२; १९३; १९९; २०१
भातवडी, १७७
भार्गव, २९
भारतवर्ष, ८; ४९;–तील जातिबद्ध समाज, ५१;–तील ब्राह्मण, १०
भारती पेशवाई, ८८
भास्कर कवि, ७२
भास्कर नारायण, १२५
भास्करानंदन कवि, ७२
भिऊबाई, १३०
भिडे रा०, कृत अष्टप्रधान, ८४
भिवंडी, १४८;–चा हवालदार, १८१
भीमथड, ४१
भीमगड, १९९
भीमातीर, २०१
भुतें, जादुगिरी, १३२–१३५;–करितां स्वतंत्र खातें, १३३;–चे इंग्लंडातील व जर्मनीतील शेवटचे खटले, १३४
भूपालगड, १९४
भूमिगतद्रव्य, १३२
भूमीकप (१६०० माघ व० ११), १९४
भोडगो, ७०
भोर, १८०; २१३; इलाखा, २१६; ता, १९३; २०२; २०३; संस्थान, ९२
भोरप, २०५; गौळी, १४८
भोवरगांव, ११८; १४२
भोसले, १२४; २१४;–च्या मूळपुरुषापासूनचे स्वदस्तुरचे लेख, २१९;–च्या गांवांची यादी, २१९
भंडारी, बखर, २२२;–ची पूर्वपीठिका, १००
भंवरखेडे, ९९
भांडारकर, डॉ०, १५५
भिंगार, २१७

## म

मआसिर–इ–अलमगिरी, १७६
म. इ. सा. खंड, ७४; ११५; १३२; १७५; १७६
मछेंद्रनाथ, ८०
मत्स्याकृति ताम्रपट, ९७–९८
मदनवाडी, ७०
मध्य आफ्रिका, १८
मनु, २३; ४६;–स्मृति, १०७; ११३; १२८; काल १०१;–कालीं कनिष्ट जाती यांची वरिष्ट जातीत उन्नति होण्याची रीति, ४३
मनुस्मृति, दंड, ११४; ब्रह्महत्येस दंड, १२३; संकरवर्णोन्नति प्रद्धति, ४
मरळ, १८४
मराठी इतिहासांतील अपूर्व गोष्ट, ९६
मराठी पानशाही, ९४; ची दुष्ट, ९६
मराठी मुलुख, ४१
मराठी राज्यसंस्थापकाचा हेतु, ८९
मराठी रियासत, १०२–१०३; ११४; ११७; कर्जवसूली, १५० खून–शिक्षा, ११९; गोवध, १३२; चोरी, १२८;

